# लेखकाचें निवेदन

प्रस्तुत ग्रंथ मार्चमध्यें प्रसिद्ध करावयाचा असें प्रकाशकांनीं सांगितल्यावर मला एकदम आठवण झाली कीं, माझा पहिला लेख 'चित्रमय जगत्'नें १९२२ च्या मार्च महिन्याच्या अंतीं प्रसिद्ध केला, त्याला आतां पंचवीस वर्षे पूर्ण होत आहेत. या सुदीर्घ काळांतील विद्यादेवीच्या उपासनेचें फळ उपेक्षा, उपहास, उपासमार, अपमान इत्यादींच्या रूपानें प्रस्तुत लेखकाला भरपूर मिळालें आहे. हा ग्रंथहि किती अवघड परिस्थितींत लिहिला गेला, याची माझ्या निकटच्या मित्रांना चांगली कल्पना आहे. गंभीर विषयावर लिहिण्याचा धंदा इतका निष्फळ आहे कीं माझे मित्र श्री. द. श्री. मराठे यांनीं याच विषयावर लिहावयाला घेतलेला ग्रंथ अर्धवट टाकून देऊन अन्य व्यवसायाकडे आपलें मन वळविलें. त्यांनीं आपला ग्रंथ पूर्ण केला असता तर मी या विषयाकडे वळलोंहि नसतों. कारण युद्धारंभापासून युद्धसमाप्तीपर्यंत त्यांना अशी ह्या विषयावर लिहिण्याची संधि मिळाली होती, तशी मला मिळाली नव्हती. पण महायुद्ध जुंपण्यापूर्वीच्या युरोपांतील राजकारणाचें समालोचन मी 'लढाऊ राजकारणां'तून केलें असल्यानें श्री. पाध्ये यांनीं मला दुसऱ्या महायुद्धाचाहि इतिहास लिहिण्याचा आग्रह केला आणि त्यांच्या आग्रहाला बळी पडून दुसऱ्या महायुद्धाच्या पूर्वार्धाची ही संक्षिप्त रूपरेखा मी लिहून काढली आहे.

सैन्यांतील अधिकाऱ्यांमध्यें माझ्या ओळखी नसल्यानें युद्धव्यवसायाला वाहिलेलीं नियतकालिकें मला उपलब्ध नव्हतीं. यामुळें 'केसरी ग्रंथालयां'त मिळणाऱ्या 'फॉरेन अफेअर्स,' 'राउंड टेबल,' 'इंटरनॅशनल न्यूज बुलेटिन' यांसारख्या नियतकालिकांवर आणि मॅक्स वेर्नर, लिडेल हार्ट इत्यादि युद्धविषयांवर लिहिणारे ग्रंथकार यांच्यावर अवलंबूनच मला युद्धाची रूपरेखा निश्चित करावी लागली. या विषयावर साधार ग्रंथ अजून प्रसिद्ध व्हावयाचे आहेत आणि ते पुण्यांत मिळूं लागल्यानंतर कदाचित् पुन्हा एकवार या विषयाकडे वळावें लागेल. आज इथें उपलब्ध असलेल्या माहितीचा उपयोग करून केवळ सत्यसंशोधनाच्या दृष्टीनें हा ग्रंथ लिहिला आहे.

दुसऱ्या महायुद्धाचा इतिहास प्रसिद्ध होणार आहे असें कळल्यावर भारतीय सैन्यांतील एक अधिकारी ले. कर्नल य. श्री. परांजपे यांनीं त्याचें हस्तलिखित प्रकाशकांकडून मागून घेऊन वाचलें आणि त्यानंतर त्याचीं टिपणें काढून प्रस्तुत लेखकाशीं त्यांनीं सविस्तर चर्चाहि केली. या चर्चेचा ग्रंथांत अनेक उपयुक्त सुधारणा करण्याला उपयोग झाला, याबद्दल लेखक त्यांचा ऋणी आहे. खरें म्हणजे या ग्रंथाला प्रस्तावना तेच लिहिणार होते. पण आयत्या वेळीं त्यांना लेखनव्यवसाय करण्याला सवडच मिळाली नाहीं.

असो, या ग्रंथांतील मानचित्रांचे सगळे आणि व्यक्तींचे कांहीं ब्लॉक्स 'केसरी संस्थे'कडून मिळाले. त्याबद्दल आणि तेथील ग्रंथालयाचा उपयोग करण्यासंबंधीं मिळालेल्या सवलतींबद्दल मी त्या संस्थेचा ऋणी आहें. बहुतेक सारे व्यक्तींचे ब्लॉक्स 'चित्रशाळे'च्या चालकांनीं दिल्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत. या ग्रंथाची सूचि व्हीनस बुकस्टॉलच्या चालकांपैकीं श्री. अ. ह. लिमये एम्.ए. यांनीं अगत्यपूर्वक केली आहे. त्यांचा उल्लेख न केल्यास तें चक्क वाङ्मय-चौर्य होईल. छपाईच्या चांगुलपणाबद्दल आणि पुस्तकाच्या शुद्धतेची काळजी घेतल्याबद्दल 'कलागृहा'चे श्री. राजाभाऊ दाते यांचेहि आभार मानले पाहिजेत.

या पुस्तकाचा उत्तरार्ध शक्य तितक्या लौकर लिहिण्याची इच्छा आहे. पण माझ्या इच्छेचा ईश्वरेच्छेशीं समन्वय झाला तरच ती गोष्ट घडून येईल, हें उघड आहे.

पुणें,
वर्ष प्रतिपदा १८६९

अ. ज. करंदीकर

# चार शब्द

मीं सैनिक असल्यामुळेंच बहुधा या पुस्तकास चार शब्द लिहिण्याची कामगिरी मला देण्यांत आली असावी. आणि मींहि सैनिकाच्याच दृष्टिकोनानें या पुस्तकाकडे पाहिलें आहे.

गेल्या महायुद्धाच्या कारणांची यथायोग्य मीमांसा केल्याबद्दल मीं ग्रंथकारांचें अभिनंदन करतों. पुरेशी माहिती अजून उपलब्ध नसल्यानें गेल्या महायुद्धांतील धोरण ( strategy ) व हालचाली ( tactics ) यांचें निःपक्षपातीपणें निदान करणे अजून शक्य नाहीं. परंतु अनेक राष्ट्रांनीं या युद्धांत युद्धाच्या तयारीबाबत ज्या ढोबळ चुका केल्या त्यांवर या पुस्तकानें प्रकाश पाडला आहे. युद्धासाठीं अगोदर तयारी करावी लागते. व नंतर राष्ट्रांतील सर्व सामर्थ्य एकत्रित करून त्या सामर्थ्याचा पूर्ण व योग्य उपयोग करावा लागतो. ही तयारी गेल्या महायुद्धांत अपुरी पडली. याचा परिणाम असा झाला कीं, या तयारींतच बराचसा काळ खर्च पडला. कांहीं राष्ट्रांची तर अगदींच तयारी नसल्यानें अंतर्गत राजकारणांत उलथापालथ होऊन बरीच महत्वाची सामुग्री प्रयोगावस्थेंत वाया गेली

या पुस्तकांत युद्धशास्त्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें बोधकारक अशा अनेक गोष्टी आहेत. आणि आपणांपैकीं प्रत्येकानें इतिहास विषयाच्या या शाखेचा अभ्यास करण्याची वेळ खास आली आहे; एवढेंच नव्हे तर पदवीपरीक्षांच्या अभ्यासक्रमांत युद्धशास्त्राच्या इतिहासाचा अंतर्भाव करण्यांत यावा अशी माझी आग्रहाची सूचना आहे. अखेर, असला माहितीपूर्ण मनोरंजक आणि विचारांस चालना देणारा ग्रंथ लिहिल्याबद्दल मी श्री. करंदीकर यांचें अभिनंदन करतों.

नवी दिल्ली,<br>
ता. १७ एप्रिल १९४७

शं. पां. पाटील थोरात,<br>
ब्रिगेडियर D. S. O.

---

टीपः—ग्रंथकाराची प्रस्तावना छापून झाल्यावर 'चार शब्द' व 'प्रस्तावना' हा मजकूर हातीं आला. आपला अमूल्य वेळ खर्च करून ब्रिगेडियर थोरात व कर्नल परांजपे यांनीं आमच्या प्रकाशनाबद्दल दाखविलेल्या या आपुलकीबद्दल आम्हीं त्यांचे आभारी आहों.

प्रकाशक

# प्रस्तावना

मी पुण्यास गतवर्षी सुटीवर असतांना माझे मित्र श्री. अनंतराव लिमये यांच्यामुळें श्री. अ. ज. करंदीकर यांची ओळख झाली. त्याच वेळीं या पुस्तकाचें हस्तलिखित मला वाचावयास मिळालें.

श्री. करंदीकर हे युद्धशास्त्राचे अभ्यासी म्हणून प्रख्यात आहेत. त्याचप्रमाणें युरोपांतील जर्मन, रशियन इत्यादि भाषांवर त्यांचें प्रभुत्व असल्यामुळें त्या भाषांतील लष्करी वाङ्मय त्यांनीं वाचलेलें आहे. वर्तमानपत्रांतून त्यांनीं युद्ध-विषयक लेख लिहिले असून " लढाऊ राजकारण " व " दुसरी आघाडी " हे त्यांचे दोन युद्धशास्त्रावरील ग्रंथहि प्रसिद्ध झालेले आहेत.

महाराष्ट्रांत कै. कॅ. गणपतराव मोडक यांनीं " प्रतापगडचें युद्ध " या आपल्या ग्रंथानें या विषयास सुरवात केली. हिंदुस्थानांत युद्धाच्या शास्त्रीय अभ्यासाची आणि देशी भाषांतून या महत्वाच्या विषयावर लिहिलेल्या ग्रंथांची किती आवश्यकता आहे हें सांगावयास हवें असें नाहीं. पाश्चात्य देशांत या विषयास व त्याच्या अभ्यासाला स्वतंत्र व मानाचें स्थान आहे. नेपोलियन हा या विषयाचा मोठा अभ्यासी होता, आणि तो आपल्या हाताखालील सेनानींना नेहमीं म्हणत असे कीं, " इतिहासांतील मोठमोठ्या सेनानींच्या मोहिमींचीं पुस्तकें पुनःपुन्हां वाचा."

हिंदुस्थानांत ज्याप्रमाणें गेल्या कांहीं शतकांत इतर विषयांवरील शास्त्रीय अभ्यासाची आबाळ झालेली दिसते त्याप्रमाणेंच याहि विषयाकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. पुण्याच्या इतिहाससंशोधक मंडळांत लष्करी विषयावर एखादें जुनें पुस्तक किंवा हस्तलिखित मिळतें कां तें मी पाहिलें. पण या विषयावर शास्त्रोक्त विचार मांडिलेलें एकहि पुस्तक किंवा चोपडें मला मिळालें नाहीं. महाभारतांतील शांतिपर्वांत भीष्माचार्यांनीं धर्माला केलेल्या उपदेशांतसुद्धां या विषयावर त्यापेक्षां जास्त माहिती सांपडते. हिन्दुस्थानचें राज्य इंग्रजांकडे जाण्याचें मुख्य कारण हेंच झालें.

पाश्चात्य राष्ट्रांत मात्र या विषयावर शेंकडों पुस्तकें व चोपडीं एकसारखीं प्रसिद्ध होत असतात. या विषयावर लिहिणारे लेखक दोन प्रकारचे-युद्धांत प्रत्यक्ष अनुभव घेतलेले सेनानी व टीकाकार. हिंदी लष्करी अधिकारी गेल्या युद्धांत मिळालेल्या अनुभवानंतर या विषयाचा अभ्यास करून या विषयावर ग्रंथ लिहून मराठी वाङ्मयांत भर घालतील यांत मला शंका नाहीं. पण असे अधिकारी थोडे आहेत व दुसरे महायुद्ध नुकतेंच संपलें आहे तेव्हां याला वेळ लागेल. लेखकाचा दुसरा वर्ग टीकाकारांचा. टीकाकार हा प्रत्यक्ष युद्धभूमीवर

असतोच असें नाहीं. तो आपल्या खोलींत बसून नकाशे, आधार ग्रंथ व वेळोवेळीं वर्तमानपत्रांतून व पार्लमेंट वगैरे सभांतून मिळालेली माहिती यांच्या सहाय्यानें आपलीं निदानें बसवीत असतो. याच्या उलट सेनानीजवळ हाताखालच्या अधिकाऱ्यांकडून आलेले शत्रुसंख्येचे वृत्तान्त, साधनें व शत्रूच्या हालचाली वगैरे संबंधीं माहिती व स्वतःचें सैन्यबळ येवढींच साधनें उपलब्ध असतात. टीकाकाराच्या चुकीनें फक्त कागद खर्ची पडतील तर सेनानीच्या चुकीच्या निर्णयानें त्याची अब्रू, सहस्रावधि सैनिक व क्वचित् प्रसंगीं देशाचें स्वातंत्र्यहि खर्ची पडेल.

टीकाकाराचें महत्वहि या विषयांत फार मोठें आहे. लष्करी अधिकारी बहुधा लष्करी रूढींत वाढलेला असतो. त्याचे विचार पुष्कळांशीं लष्करी धोपटमार्गानें चाललेले असतात. टीकाकाराला असले निर्बंध नसतात. तो आपल्या विचारांना बेलगाम सोडूं शकतो. त्याच्या विचारांत जास्त जिवंतपणा, नाविन्य असूं शकतें. लष्करी हालचालींची पूर्ण कल्पना नसल्यामुळें त्याचीं निदानें चुकीचीं असतील पण अभ्यासुला त्यांत कितीतरी बोध घेतां येण्यासारख्या गोष्टी सांपडतात.

श्री. करंदीकर हे असेच टीकाकार आहेत. स्वतःला युद्धाचा यत्किंचितहि अनुभव नसतांना, केवळ युद्धशास्त्राबद्दलची आवड, आणि महाराष्ट्रांतील तरुण पिढींत या विषयाबद्दल ओढ उत्पन्न करण्याची तळमळ, यामुळेंच त्या शास्त्राचा गहन अभ्यास करून त्यांनीं हा साधार व सविस्तर ग्रंथ लिहिला आहे.

कोणत्याहि मोहिमेचा टीकात्मक अभ्यास करावयाचा म्हणजे लेखकानें आपलें मत कोणत्याही एका बाजूला वळूं देतां कामा नये. त्याचप्रमाणें व्यक्तिशः कोणाबद्दल आवडनावडहि असूं देतां कामा नये. युद्धांत सेनानी एक प्रकारें अंधारांत वावरत असतो. युद्ध हें कांहीं रसायनशास्त्रासारखें किंवा गणितासारखें अचूक शास्त्र ( exact science ) नव्हे. शत्रूच्या १० सैनिकांविरुद्ध आपले १५ उभे केले कीं दोहो बाजूंचे दहा दहा मरतील व आपले राहिलेले ५ सैनिक लढाई जिंकितील हें समीकरण या शास्त्रास लागू पडत नाहीं. त्यांत शत्रुसेनानीची धडक, दोन्हीं पक्षांची हिंमत अशा कितीतरी अनपेक्षित रीत्या बदलणाऱ्या घटना असतात. तेव्हां युद्धशास्त्रास शास्त्र म्हणण्याऐवजीं कला म्हणणेंच जास्त सयुक्तिक होईल. असो. युद्ध संपल्यावर किंवा दोन्ही बाजूंची परिस्थिति माहीत झाल्यावर टीकाकारानें टीका करणें सोपें असतें. पण तें योग्य नाहीं. टीका करण्यापूर्वीं त्यानें स्वतःस सेनानीच्या जागीं कल्पून हा

विचार केला पाहिजे कीं, त्या वेळीं जी राजकीय, सामाजिक व भौगोलिक परिस्थिति होती, त्याच्या हातीं जें सैन्यबल होतें, त्यास जीं आयुधें वा यांत्रिक साधनें देण्यांत आलीं होतीं, शत्रूबद्दलची जी उघड अथवा गुप्त माहिती त्यास ज्ञात होती, त्या स्थितींत त्यानें केलेली उपाययोजना चुकीची होती काय ? ती तशी नसेल तर तो दोषास्पद ठरत नाहीं.

टीकाकार ही गोष्ट विसरतात. युद्ध हरलें, माघार घेतली कीं, दोष सेनानींचा अशीच ठाम समजूत करून घेऊन ते चालतात. पण हें नेहमींच खरें नसतें. त्या दृष्टीनें पाहातां श्री. करंदीकर यांनीं पोलंडच्या पुढाऱ्यांची केलेली ‘ संभावना ’ कडक वाटते.

श्री. करंदीकर यांचें हस्तलिखित वाचल्यावर मी त्यांना जेव्हां भेटलों तेव्हां त्यांना म्हटलें, “ तुमचें पुस्तक जर्मन पुरस्कारी वाटतें. ” त्यांनीं ही गोष्ट कबूल केली व म्हणाले, “ इंग्लंडचा अथवा रशियाचा पुरस्कार मला करावयाचाच नाहीं असें ठरविल्यावर तें तसें होणारच. ” त्यांच्या या मताबद्दल मला कांहींहि म्हणावयाचें नाहीं. पण माझ्या दृष्टीनें या पुस्तकांत हा एक दोष म्हणून मला दिसतो. कारण त्यामुळें युद्धाच्या अभ्यासासाठीं अवश्य असा समतोल दृष्टिकोन रहात नाहीं.

या ग्रंथांतील लष्करी हालचालींबद्दलच्या मतांबद्दल मीं प्रस्तावनेंत कांहींहि लिहूं इच्छित नाहीं. कारण दोन्ही पक्षांकडील पुरेशी माहिती अजून उपलब्ध नाहीं. आणि सर्व गोष्टींचा तौलनिक विचार केल्याशिवाय त्याबद्दल ठाम मत देणें चुकीचें होईल. शिवाय या लहान ग्रंथांत लढायांची सविस्तर माहिती असणेंही शक्य नाहीं.

असो. या पुस्तकानें महाराष्ट्रांतील युद्धकलाविषयक तुटपुंज्या ग्रंथसंग्रहांत मोठीच भर टाकलेली आहे. ग्रहमाला, राष्ट्रमाला वगैरेसारखीं प्रकरणें विचारांना खात्रीनें चालना देणारीं आहेत.

पुस्तकांतील कांहीं परकीय नांवांचे उच्चार मराठी वाचकांस अपरिचित वाटतील, पण ते त्या त्या मूळ भाषांप्रमाणें आहेत.

श्री. करंदीकर यांचा हा ग्रंथ प्रत्येकानें अभ्यासावा अशी विनंति करून असा उत्तम ग्रंथ लिहिल्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों.

रावळपिंडी
दि. १८ एप्रिल १९४७

य. श्री. परांजपे
लेफ्टनंट कर्नल

# अनुक्रमणिका


| | | |
|---|---|---|
| १ | ' जर्मन राष्ट्राचा काळाकुट्ट इतिहास ' | १ |
| २ | दुसऱ्या महायुद्धाचीं भविष्यें | १० |
| ३ | एडवर्ड राजांचा राज्यत्याग | १६ |
| ४ | महायुद्धाचें मूळ कारण | २४ |
| ५ | ब्रिटिश राज्यकर्त्यांचें रशियासंबंधींचें अज्ञान | ३१ |
| ६ | ऑस्ट्रियन साम्राज्याचा वारसा | ३८ |
| ६ अ. | युरोपांतील राजकारणांत अमेरिकेचा हस्तक्षेप | ५१ |
| ७ | इंग्लंडचीं पोलंडमधील कारस्थानें | ६१ |
| ८ | अँग्लो-रशियन संधीचीं बोलणीं | ६७ |
| ९ | पोलंडवरील जर्मनीची चढाई | ७५ |
| १० | रशियाचा युद्धप्रवेश | ८४ |
| ११ | डेन्मार्क नॉर्वेवरील स्वारी | ८९ |
| १२ | पश्चिम आघाडीवरील सामसूम | ९७ |
| १३ | पश्चिम युरोपांतील सार्वत्रिक चढाई | १०६ |
| १४ | फ्रान्सच्या पराजयाची मीमांसा | १३२ |
| १४ अ. | इटलीचे राजे व त्यांचे मुख्य प्रधान | १६३ |
| १५ | ब्रिटनची लढाई | १७० |
| १६ | बाल्कन प्रदेशांतील राजकारण | १८३ |
| १७ | नील नदीची लढाई | १९१ |
| १८ | बाल्कन द्वीपकल्पांतील लढाई | २०० |
| १९ | युद्धांतील महत्वाच्या तारखा | २१९ |
| २० | सूचि | २२८ |

# युद्ध नकाशांची यादी


| | |
|---|---|
| (१) यूरोप | १ |
| (२) जर्मनी १९३९ | ४९ |
| (३) पोलंडवर स्वारी | ७५ |
| (४) पोलंडची वांटणी | ८२ |
| (५) नॉर्वे व स्वीडन | ८८ |
| (६) फ्रान्स व जर्मनीच्या सरहद्दी | ९० |
| (७) मॅजिनो व सिगफ्रिड तटबंदी | १०१ |
| (८) फ्रान्स | ११४ |
| (९) बेल्जमवर हल्ला | ११९ |
| (१०) जर्मनीचें वाढतें साम्राज्य | १२२ |
| (११) इंग्लिश खाडीवर हल्ला | १४९ |
| (१२) बाल्कन राष्ट्रें | १८५ |
| (१३) आफ्रिकेंतील लढा | १९३ |
| (१४) क्रीट | २१३ |
| (१५) जर्मन साम्राज्य (१९४१) | २१७ |
| (१६) यूरोप | २१८ |



नार्विक
ट्रॉन्टीम
हेलसिंकी
लेनिनग्राड
मॉस्को
ऑस्लो
स्टॉकहोम
लंडन
हॅम्बुर्ग
ब्रेमन
बर्लिन
कोलोन
ड्रेसडेन
ज र्म नी
प्राग
वॉर्सा
पॅरिस
फ्रा न्स
बर्न
व्हेनिस
ट्रिस्टी
जिनोआ
मार्सेलिस
बार्सेलोना
मार्जोका
कॉर्सिका
मिनोर्का
सार्डिनिया
रोम
नेपल्स
सिसिली
बुडापेस्ट
रु मा निया
बुखारेस्ट
बेलग्रेड
साराजेवो
सोफिआ
ओडेसा
काळा समुद्र
वार्ना
इस्तंबूल
स्कुटारी
अंकारा
स्मर्ना
अदालिया
आर्मेनिया
बाटुम
टिफ्लिस
बाकू
अस्त्राखान
इराण
मोसूल
इराक
अलेक्झांड्रेटा
सीरिया
अलेप्पो
त्रिपोली
बैरुत
हैफा
दमास्कस
जरुसलेम
सायप्रस बेट (ब्रि.)
क्रिट बेट (जर्मन)
माल्टा (ब्रि.)
ट्यूनीस
अल्जीर्स
भू म ध्य स मु द्र

# दुसरें महायुद्ध

: १ :

## ' जर्मन राष्ट्राचा काळाकुट्ट इतिहास '

विसाव्या शतकाच्या प्रारंभापासून आतांपर्यंत जर्मनीविरुद्ध बहुतेक सर्व जगानें दोन वेळां शस्त्र उचललें आणि त्यामुळें उद्भवलेली युद्धें चालू असतांना जर्मनीला समग्र मानवजातीचा शत्रु ठरविण्याकरितां पुष्कळ प्रमुख व्यक्तींनीं आपले मेंदू शिणविले. त्यांच्या प्रभावी प्रचारामुळें जर्मन राष्ट्राच्या दुष्टपणाविषयां बहुतेक साऱ्या लोकांना कांहीं शंका उरली नसावीच ! पण गेल्या दोन महा-युद्धासारख्या जागतिक महत्त्वाच्या घडामोडी केवळ एका राष्ट्राच्या किंवा त्यांतीलहि एखाद्या भागाच्या दुष्टपणामुळें घडून येतात, ही कल्पनाच मुळीं इतिहासशास्त्राच्या सर्वस्वीं विरुद्ध असल्यानें प्रस्तुत इतिहासाच्या प्रारंभींच त्या असद्धेतुप्रेरित प्रचाराची थोडी चिकित्सा केली पाहिजे.

### अमेरिकेचा काळाकुट्ट इतिहास

असल्या विषदिग्ध प्रचारपत्रकांमध्यें इंग्लंडच्या परराष्ट्रीय मंत्र्यांचे एका-काळचे सर्वांत प्रमुख तज्ज्ञ जे सर रॉबर्ट वॅन्सिटार्ट, त्यांनीं लिहिलेल्या ' ब्लॅक रेकॉर्ड ' या पत्रकाला अग्रमान दिला पाहिजे. त्या पत्रकांत त्यांनीं दुर्बळ चिम-ण्यांवर अकस्मात् झडप घालणाऱ्या बहिरीससाण्याप्रमाणें शेजारच्या दुर्बळ राष्ट्रांवर अचानक हल्ले करण्याच्या पापाबद्दल जर्मन राष्ट्राची मनसोक्त निंदा केली आहे ! वॅन्सिटार्टसाहेबांची ही तुलना जर्मन राष्ट्राला कितपत लागू पडते, तें मागाहून पहावयाचेंच आहे. या ठिकाणीं इतकेंच म्हणणें आवश्यक आहे कीं इंग्लंडच्या परराष्ट्रीय विभागांतील तज्ज्ञांचें हें वर्णन अमेरिकेच्या आक्रमक धोरणालाहि अक्षरशः लागू पडतें. बहिरीससाण्याच्या सारखीच एक झडप घालून

अमेरिकेनें मेक्सिकोचे न्यू मेक्सिको, कॅलिफोर्निया, फ्लोरिडा यासारखे विस्तीर्ण प्रांत गिळंकृत केले. त्यानंतर गेल्या शतकाच्या अंतीं म्हणजे ख्रि.श. १८९६च्या सुमाराला स्पेनच्या सत्तेखालील फिलिपाईन द्वीपांतील जनतेनें स्वातंत्र्यप्राप्तीप्रीत्यर्थ आंदोलन आरंभिलें आणि जपानच्या सम्राटांना फिलिपाईन द्वीपें मुक्त करून तीं जपानी साम्राज्यांत समाविष्ट करून घेण्याची विनंति केली. या प्रसंगीं त्या क्रांति-कारकांचा विश्वासघात करून जपानी सम्राटांनीं त्यांचीं पत्रें स्पेनच्या राजाच्या स्वाधीन केलीं. स्पेनच्या हातीं तीं पत्रें पडल्यानंतर लगेच फिलिपाईनमधील क्रांतिकारकांच्या धरपकडीला आणि परक्या राज्यकर्त्यांच्या नेहमीच्या अत्या-चारांना प्रारंभ झाला. स्पॅनिश लोकांच्या अत्याचारांना फिलिपाईन द्वीपांतील क्रांतिकारकांनीं स्वातंत्र्ययुद्ध चालू करूनच उत्तर दिलें. हें स्वातंत्र्ययुद्ध यशस्वी होणें अशक्य नव्हतें. पण फिलिपाईन द्वीपांतील लोकांनीं जपानी साम्राज्यांत समाविष्ट होण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावेळेपासून अमेरिकेची गृध्रदृष्टि तिकडे वळली होती. त्यामुळें त्या स्वातंत्र्ययुद्धाचा निर्णय लागण्यापूर्वींच अमेरिकेनें स्पेनविरुद्ध युद्ध पुकारून फिलिपाईन द्वीपें आपल्या घशांत घातलीं आणि तेथील स्पॅनिश सैन्यासहच क्रांतिकारकांचाहि कांटा काढला.

अमेरिकेनें पनामा प्रांत खाल्ल्याचा इतिहास तर याहूनहि अधिक बोधप्रद आहे. १८५० च्या सुमाराला अमेरिकेनें इंग्लंडशीं संगनमत करून अशी घोषणा केली होती कीं मध्य अमेरिकेंत दोन महासागरांना जोडणारा एखादा कालवा खोदल्यास त्याचें स्वामित्व या संधीवर स्वाक्षरी करणाऱ्या उभय राष्ट्रां-कडे राहिलें पाहिजे. पण लौकरच या प्रकरणीं अमेरिकेचें मत बदललें आणि तिनें इंग्लंडकडून वरील संधि बदलून घेण्याचा प्रयत्न केला. इंग्लंडनें अर्थात् या मागणीला स्पष्ट नकार दिला. त्यानंतर १८८० च्या सुमाराला अमेरिकेनें आपण वरील संधि पाळण्याला बांधले गेलों नसल्याची घोषणा केली. एर्वी तेर्वी अमेरिका तो संधि मोडणारच असें दिसून आल्यानंतर इंग्लंडनें तो संधि कच-ऱ्याच्या टोपलींत टाकण्याला संमति दिली. इंग्लंडची संमति मिळाल्यानंतर लौक-रच अमेरिकेनें मध्य अमेरिकेंतील कोलंबिया देशावर स्वारी करून त्याचा पनामा प्रांत बळकावला आणि तेथें पुढें कालवा खोदला. एखाद्या राष्ट्राच्या परराष्ट्रीय राजकारणावर नैतिक दृष्ट्या टीका करणें म्हणजे वेश्येवर व्यभिचाराचा किंवा तमाशावर अश्लीलतेचा आरोप करण्याइतकेंच हास्यास्पद असतें, हें सामान्य

सुशिक्षित व्यक्तीला सहज समजेल. पण इंग्लंडांतील ढोंगी राजकीय पुढारी या गोष्टीकडे बुद्ध्याच दुर्लक्ष्य करून अप्रबुद्ध लोकांची दिशाभूल करीत असतात, म्हणून या ऐतिहासिक घटनांचा उल्लेख करावा लागला.

## जर्मनीवरील दोन आरोप

जर्मन राष्ट्रावर शत्रुराष्ट्रांनीं मुख्यतः दोन आरोप लादलेले आहेत. त्यांतला पहिला आरोप म्हणजे मध्य युरोपावर प्रभुत्व गाजविण्याची इच्छा आणि दुसरा स्लाव्ह वंशाशीं वैर. या आरोपांचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार केल्यास मध्य युरोप हें शार्लमान्य राजाच्या काळापासून पहिल्या महायुद्धाच्या अंतिम वर्षापर्यंत जर्मन वंशाच्याच सत्तेखालीं असलेलें आढळून येतें. या प्रश्नाचा कोणाला अभ्यास करावयाचा असल्यास त्यांनीं ब्राइसकृत ‘ होली रोमन एंपायर ’ हा ग्रंथ चाळून पहावा. ब्राइससाहेबांनीं जर्मनसाम्राज्याचा १८०६ पर्यंतचाच इतिहास दिला आहे. कारण तेव्हांपासून त्या साम्राज्याची ‘ होली रोमन एंपायर ’ ही पदवी नष्ट झाली आणि त्याला केवळ जर्मन साम्राज्याचें स्वरूप प्राप्त झालें. १८६६ पासून या साम्राज्यावरील ऑस्ट्रियाचें प्रभुत्व नष्ट झालें आणि १८७१ मध्यें बेर्लिन राजधानींत स्वतंत्र जर्मन साम्राज्य प्रस्थापित झालें. तरी सुद्धां हीं दोनहि साम्राज्यें समानशत्रुमित्रत्वाच्या संधीनें बांधलेलीं होतीं आणि आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांनीं त्या संधीच्या अटीप्रमाणें वर्तनहि केलें. याप्रमाणें सुमारें सहस्र वर्षें तरी कमी अधिक प्रमाणानें एका सार्वभौमसत्तेखालीं असलेला मध्य युरोप परस्परविरोधी पांचसात राष्ट्रांमध्यें विभागण्याचें साहस पहिल्या महायुद्धानंतर इंग्लंड, फ्रान्स आणि अमेरिका या त्रिराष्ट्रांच्या नेत्यांनीं केलें. या अविवेकी कृत्याचें पर्यवसान दुसऱ्या महायुद्धांत झालें असल्यास त्याचें इतिहासज्ञांना तरी नवल वाटायला नको.

## पोलंडचा इतिहास

आतां स्लाव्ह आणि जर्मन या वंशांच्या परस्परसंबंधांविषयीं चार शब्द लिहिले पाहिजेत. त्यांतल्या त्यांतहि दुसऱ्या महायुद्धाचें निमित्तकारण जें पोलंड त्याच्याशीं जर्मनीनें केलेल्या वर्तनासंबंधींची वस्तुस्थिति इथें वर्णिली पाहिजे. संयुक्त राष्ट्रांच्या ‘ प्रचारकांकडून पोलंडच्या विभागणीचें पाप जर्मनीला चिकट-

विलें जातें. पण जर्मनीचा अभ्युदय होण्यापूर्वीच पोलंडचें स्वतंत्र राज्य विनशनाच्या निशेकडे चाललें असल्याचें वर्णन सुप्रसिद्ध इंग्रज इतिहासकार फिशर यांनीं आपल्या युरोपच्या इतिहासांत केलें आहे. आपल्या ग्रंथाच्या ७३२ पानावर ते म्हणतात, " १६५० च्या सुमाराला पोलंडची परिस्थिति इतकी वाईट झाली होती कीं तो देश शेजारच्या राज्यांतून वांटून टाकण्याच्या योजनांचा खलहि तेव्हांच चालू झाला होता. " त्याच शतकांत पोलंडचा निकाल लागला नाहीं याचें कारण म्हणजे त्रिशद्वार्षिक युद्धानें तेव्हां जर्मनी अतिशय क्षीण झाला होता आणि रशियाचा उदय अजून व्हावयाचा होता. इतक्या वाईट परिस्थितींत सुद्धां पोलंडच्या सरदारांनीं रशियाशीं युद्ध उकरून काढून मॉस्को जिंकण्याचा प्रयत्न केला आणि सरतेशेवटीं आपल्या आधिपत्याखालील कीफ हें प्रसिद्ध नगर रशियाला देऊन त्यांना १६६७ मध्यें कसाबसा संधि करावा लागला. या युद्धापासूनचा पोलंडचा दुर्दैवी इतिहास इथें लिहिण्याला सवडहि नाहीं आणि तो वाचण्याचा धीर वाचकांना असेल असेंहि वाटत नाहीं. या ठिकाणीं इतकें सांगितलें म्हणजे पुरें कीं पोलंडचे राजकीय पुढारी हे राजकारणाच्या दृष्टीनें जगांतील सर्वांत मूर्ख लोक असल्यानें त्यांच्या सर्व शेजाऱ्यांना पोलिश राज्याचा नव्हे तर पोलिश अराजकाचा शेजार असह्य झाला आणि सरतेशेवटीं रशियानें त्या दुर्दैवी देशावर स्वारी करून त्याचें स्वातंत्र्य नष्ट करून टाकलें. पोलंडचा विस्तृत प्रदेश, एकट्यानें पचविणें रशियाला अठराव्या शतकाच्या अंतीं अवघड असल्यानें त्याला या कामीं ऑस्ट्रिया आणि प्रशिया या जर्मन राज्यांचें साहाय्य घ्यावें लागलें. दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभीं जर्मनीनें पोलंड जिंकल्यावर रशियानें ज्या कारणांकरितां त्या देशाच्या वांटणीत भाग घेतला, त्याच कारणांकरितां अठराव्या शतकांत रशियानें जिंकलेल्या पोलंडच्या विभागणींत ऑस्ट्रिया आणि प्रशिया यांनीहि भाग घेतला. पोलंड, जर्मनी आणि रशिया यांच्या परस्परसंबंधाचें हें संक्षिप्त पर्यालोचन वाचल्यानंतर या प्रकरणीं जर्मनीकडे कितपत दोष येतो, हें वाचकांनीं आपापल्या मनाशीं ठरवावें. कारण इतिहासग्रंथांतून निंदा आणि स्तुति होतां होईल तो टाळावी, असें लेखकाचें मत आहे.

## बाल्कन राष्ट्रांचें ऑस्ट्रियांशीं वैर

पोलंडव्यतिरिक्त इतरहि अनेक स्लाव्हवंशी लोकांचा जर्मन वंशांशीं संबंध आला. त्या संबंधांचा संक्षिप्त इतिहास इतःपर सांगितला पाहिजे. युगोस्लाव्हिया, रुमानिया इत्यादि देशांतील स्लाव्हवंशी लोकांशीं मुख्यतः ऑस्ट्रियाच्या सम्राटांचा संबंध आला. हा संबंध बहुतांशीं शत्रुत्वाचा होता. पण या शत्रुत्वाचें दायित्व ऑस्ट्रियांतील जर्मनांच्याकडे नव्हतें, ही गोष्ट निर्विवाद आहे. युगोस्लाव्हिया, रुमानिया इत्यादि स्लाव्ह वसतीचे प्रांत सोळाव्या शतकांत तुर्कांनीं जिंकले आणि तेथील सैनिकांची आपल्या सैन्यांत भरती करून त्यांनीं ऑस्ट्रियावर स्वाऱ्या आरंभिल्या. या स्वाऱ्या शतकानुशतकें चालू राहिल्यामुळें युगोस्लाव्हिया आणि रुमानिया यांतील ख्रिस्ती जनतेलाहि ऑस्ट्रियाशीं वैर करण्याची संवय लागली. पुढें तुर्कांच्या हातून ते प्रांत मुक्त झाल्यानंतर सुद्धां त्यांनीं ऑस्ट्रियाशीं असलेलें आपलें परंपरागत वैर तसेंच पुढें चालविलें. इतका सारा पूर्वेतिहास कोणी समजून घेतला तर एका विशिष्ट वंशाच्या दुष्टपणामुळें गेलीं दोन महायुद्धें उद्भवलीं, असें म्हणण्यांत कितपत तथ्य आहे तें त्यांना सहज कळून येईल. पण अलीकडील विद्वानांना आपल्या इतिहासाच्या अज्ञानाचेंच भूषण वाटूं लागलें आहे. त्यामुळें वरील चिकित्सेचा तरी कितपत उपयोग होणार आहे, याची लेखकाला शंकाच वाटते.

## स्लाव्ह आक्रमणाचा आरंभ

स्लाव्ह वंशाच्या जर्मन वंशावरील आक्रमणाचा खरा प्रारंभ रशियाच्या सुप्रसिद्ध पीटर राजानें स्वीडनच्या बाराव्या चार्लसचा पुल्टोव्हाच्या लढाईत केलेल्या पराभवापासून झाला. या लढाईचें महत्त्व सर एडवर्ड क्रीसी या इंग्रज इतिहासकारांनीं १८५५ मध्येंच पुढील शब्दांत वर्णिलें आहे. ' पुल्टोव्हा येथें जर्मन वंशांतील स्वीडिश लोकांचा पराजय करण्यापूर्वी स्लाव्ह लोकांना जर्मनांच्या विरुद्ध कोणताच महत्त्वाचा विजय मिळालेला नव्हता. पण सध्यां स्लाव्ह लोकांनीं जर्मन वंशाविरुद्ध जें सार्वत्रिक आक्रमण चालविलें आहे, तें पाहून इतिहासज्ञांचें असें मत होत चाललें आहे कीं जर्मन वंशाचा आतां ऱ्हासकाळ आला असून जगाच्या रंगभूमीवरील यापुढील कार्य स्लाव्ह वंशाकडून व्हावयाचें आहे.' सर एडवर्ड क्रीसी यांचें भविष्य किती तंतोतंत खरें आलें आहे,

हें आज सर्वांना दिसतच आहे. मात्र हें खरें व्हावें यासाठीं इंग्लंडच रशियाला साहाय्य करील, अशी त्यांचीहि कल्पना झाली नव्हती.

स्लाव्ह वंशाच्या जर्मन वंशावरील आक्रमणाला इंग्लंडनें जें साहाय्य केलें तें मुख्यतः राष्ट्रीयत्वाच्या तत्वाच्या निमित्तानें केलें. या राष्ट्रीयत्वाच्या तत्वावर इंग्लंडचा कितपत विश्वास आहे, हें एक दोन उदाहरणांनीं सुव्यक्त होण्याजोगें आहे. जर्मनी आणि ऑस्ट्रिया हे दोनहि देश वंश, धर्म, भाषा, भौगोलिक सान्निध्य, इतिहासपरंपरा इत्यादि सर्व दृष्टया एक असूनसुद्धां त्यांचें एकराष्ट्र होऊं नये, असा इंग्लंडच्या राष्ट्रनेत्यांचा अट्टाहास आहे. फ्रान्स आणि बेल्जम येथील वसतिहि बऱ्याच अंशीं एकवंशीय आणि एकभाषाभाषी असून सुद्धां त्यांचें एकराष्ट्र बनण्याला इंग्लंडला विरोध आहेच. बेल्जम देश फ्रेंच राष्ट्रांत समाविष्ट होऊं नये, याकरितां ऑस्ट्रियाच्या हातीं देण्यालाहि इंग्लंडला कित्येकदां संकोच वाटला नव्हता.

## ऑस्ट्रियन साम्राज्याची आवश्यकता

स्लाव्ह वंशाच्या जर्मन वंशावरील आक्रमणाला इंग्लंडनें जें साहाय्य केलें, तें मुख्यतः राष्ट्रीयत्वाच्या तत्वाला पाठिंबा देण्याच्या निमित्तानें केलें, असें वर म्हटलें आहे. त्याचें इथें थोडें स्पष्टीकरण करणें आवश्यक आहे. चौदाव्या लुईच्या राजवटींत फ्रान्सचा उत्कर्ष झाल्यावेळेपासून शक्तिसमतोलनाकरितां ऑस्ट्रियाच्या सम्राटांना पाठिंबा देण्याचें धोरण इंग्लंडनें स्वीकारलें आणि तेंच धोरण पुढें अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकांतहि तसेंच चालविलें. या दोन शतकांत फ्रान्स आणि रशिया यांच्याशीं वैर आणि ऑस्ट्रियाजर्मनीशीं सख्य असा ब्रिटिश परराष्ट्रविभागाचा सामान्य नियमच बनलेला होता. पण एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत इंग्लंडच्या परराष्ट्रीय राजकारणावर राष्ट्रधर्माच्या पुरस्कर्त्यांचा प्रभाव पडूं लागला आणि त्यामुळें ऑस्ट्रियाच्या साम्राज्याच्या विघटनेला इंग्लंडचें साहाय्य होऊं लागलें. यामुळें फ्रान्सनें इटालीला स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या निमित्तानें १८५९ मध्यें ऑस्ट्रियाविरुद्ध युद्ध पुकारलें, तेव्हां इंग्लंडनें ऑस्ट्रियाला साहाय्य करण्याचें नाकारलें. त्यानंतर जर्मन साम्राज्य संभाळण्याला ऑस्ट्रिया असमर्थ आहे असें पाहून प्राशियानें त्याच्याविरुद्ध युद्ध पुकारून ऑस्ट्रियाव्यतिरिक्त इतर सारे जर्मन वस्तीचे प्रांत आपल्या कब्जेंत

आणले आणि पुढें लौकरच त्यांचें स्वतंत्र जर्मन साम्राज्य बनविलें. तरीसुद्धां अखिल स्लाव्ह वंशाच्या महत्त्वाकांक्षांना आळा घालून पश्चिम युरोपांतील संस्कृतीचें रशियाच्या आक्रमणापासून संरक्षण करण्याचा बराचसा भार ऑस्ट्रियानेंच संभाळला होता. पश्चिम युरोपाच्या सांस्कृतिक आणि आर्थिक सुस्थितीसाठीं ऑस्ट्रियन साम्राज्याची इतकी आवश्यकता होती कीं ऑस्ट्रियन साम्राज्य अस्तित्वांत नसतें तर तें नवीनच निर्माण करावें लागलें असतें, असे उद्गार इंग्लंडच्याच एका राष्ट्रनेत्यानें काढले होते. पण पहिल्या महायुद्धाच्या प्रारंभापूर्वीच इंग्लंडच्या राजनीतिचातुर्याचें दिवाळें निघालें असल्यामुळें ऑस्ट्रियन युवराजांच्या हत्येनिमित्त तेथील सम्राटांनीं सर्व्हियाला अंतिमपत्र पाठविल्याच्या निमित्तावरून इंग्लंडनें ऑस्ट्रियाच्या शत्रूंचा पक्ष उचलला आणि युरोपाच्या शांततेच्या आधारस्तंभाखालीं सुरुंग लावला.

## इंग्लंडची घोडचूक

ऑस्ट्रियाशीं शत्रुत्व आणि रशियाशीं सख्य करण्याची जी घोडचूक इंग्लंडनें पहिल्या महायुद्धांत केली, तिच्या दुष्परिणामांचें भीषण स्वरूप इंग्लंडला दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभापर्यंतहि दिसून आलें नव्हतें. याचें कारण असें कीं पहिलें महायुद्ध चालूं असतांनाच १९१७ मध्यें रशियांतील झारचें साम्राज्य नष्ट होऊन त्याच्या जागीं समाजसत्तावादी बोल्शेव्हिक पक्षाच्या साम्राज्याची स्थापना झाली होती. या राज्यक्रांतीमुळें, पहिल्या महायुद्धानंतर तुर्की साम्राज्याची राजधानी इस्तंबूल आणि बाल्कन द्वीपकल्प रशियाच्या घशांत शिरणें अशक्य झालें. या अनपेक्षित घटनेमुळें ऑस्ट्रियन साम्राज्याच्या विघटनेनंतरहि इंग्लंडचें आपल्या साम्राज्याशीं चालूं असलेलें दळणवळण सुरक्षित राहूं शकलें आणि आपल्या परराष्ट्रीय राजकारणाची गाडी भलत्याच रुळावर गेली असल्याची ब्रिटिश परराष्ट्रीय विभागाच्या सूत्रधारांना जाणीव झाली नाहीं. या जाणिवेच्या अभावामुळेंच दुसऱ्या महायुद्धांत दुसरी घोडचूक करून इंग्लंडनें जर्मनीचा संपूर्ण विध्वंस करण्याचें ध्येय आपल्या डोळ्यापुढें ठेविलें आणि सर रॉबर्ट वॅन्सिटार्ट यांच्या पत्रकांतल्यासारखा काळाकुट्ट प्रचार जर्मनीविरुद्ध आरंभिला. हें धोरण किती चुकीचें होतें, याची इंग्लंडमधील साऱ्या सुबुद्ध व्यक्तींना कल्पना आली आहेच. तरीसुद्धां इंग्लंडनें जर्मनीशीं कोणतें धोरण

# दोस्त राष्ट्रांचे प्रमुख



पि. विन्स्टन चर्चिल



प्रे. रूझवेल्ट

# रशियन नेते



( रशियाचे परराष्ट्र मं



मार्शल झुकोव्ह
( रशियन सेनापति )

कोणत्याही राष्ट्राविषयीं लिहितां येतील, पण असल्या चोपड्यांतून ऐतिहासिक वस्तुस्थितिहि व्यक्त होत नाहीं आणि त्यांनीं स्वराष्ट्राचें नि एकंदर जगाचें कल्याणहि साधत नाहीं. सर रॉबर्ट वॅन्सिटार्ट यांच्या विषारी प्रचारावरून आणि तितक्याच विषारी राजकारणावरून इतकेंच कळून येतें कीं इंग्लंड-सारख्या मोठ्या राष्ट्रांतसुद्धां स्वराष्ट्रांचें कल्याण करण्याच्या बुद्धीपेक्षां बलिष्ठ शेजाऱ्याचें अकल्याण करण्याची बुद्धिच अधिक प्रभावी होऊं शकतें. महा-युद्धांचा इतिहास हा मुख्यतः असल्या द्वेषबुद्धीच्या प्राबल्याचाच इतिहास असतो.

---

: २ :

# दुसऱ्या महायुद्धाचीं भविष्यें

या प्रकरणाला दुसऱ्या महायुद्धाची अपरिहार्यता हें नांव देण्याचा विचार प्रथम मनांत आला होता. पण युद्धें हीं नेहमींच अपरिहार्य असतात, असा आतांपर्यंतचा अनुभव असल्यानें वर दिलेलें नांव निवडलें. कोणतेंहि युद्ध संपल्यानंतर जित राष्ट्राच्या मनांत आपल्या अपमानाचें आणि विटंबनेचें उसनें सव्याज फेडण्याची इच्छा उत्पन्न होणें स्वाभाविक असतें. शाहणे लोक ही इच्छा अवेळीं बोलून दाखवीत नाहींत. पण त्याच इच्छेची पूर्तता करण्याच्या दृष्टीनेंच आपल्या साऱ्या कृति करीत असतात. हा मानवी स्वभावाचा नियम लक्ष्यांत घेऊन पहिलें महायुद्ध संपल्यानंतर लगेच दूरदर्शी लोकांनीं दुसऱ्या महायुद्धाचे अंदाज करण्याला प्रारंभ केला. हे अंदाज मुख्यतः तीन गोष्टीवर आधारलेले होते. त्यांपैकीं पहिली गोष्ट ही कीं जर्मनींतील महत्त्वाचे प्रांत जेत्यांच्या सैन्यांनीं व्यापले असतील तोंपर्यंत दुसऱ्या महायुद्धाचा प्रारंभ होऊं शकत नाहीं. ही कल्पना सर्वस्वीं खरी होती. कारण अर्वाचीन काळांत व्यक्तीला उपलब्ध असणारीं शस्त्रें आणि सरकारी सैन्याला उपलब्ध असणारीं शस्त्रें यांच्या सामर्थ्यामधील अंतर इतकें वाढलें आहे कीं कोणत्याहि प्रस्थापित सरकाराच्या विरुद्ध बंड करणें हें सामान्य जनतेला अशक्य होऊन बसलें आहे. पहिल्या महायुद्धानंतर जर्मनींत तळ देऊन राहिलेलीं इंग्लंड आणि फ्रान्स यांचीं सैन्यें १९३० मध्यें ऱ्हाईन नदीतीरावरील नगरांतून बाहेर पडलीं आणि त्यानंतरच दुसरें महायुद्ध कधीं होणार, या प्रश्नाच्या चर्चेचा खरा प्रारंभ झाला.

## युद्धारंभीं तरुणांचा पुरवठा

त्या चर्चेत एका पक्षाचें म्हणणें असें होतें कीं संधीच्या अटींमुळें जर्मनीला अगदीं मर्यादित सैन्य ठेवण्याला अनुज्ञा मिळाली आहे आणि देशांतील तरुणांना सैनिकी शिक्षण देण्याला मनाई केलेली आहे, तेव्हां पहिल्या महायुद्धांत लढलेले अनुभवी सैनिक वृद्धापकाळामुळें लढाईला निरुपयोगी होण्यापूर्वी म्हणजे

१९३५ पूर्वी जर्मनी नवें महायुद्ध उकरून काढील. याच्या उलट दुसऱ्या पक्षाचें म्हणणें असें होतें कीं गेल्या महायुद्धांत युरोपांतील पुष्कळसे प्रजोत्पादनक्षम तरुण खंदकांत राहून शत्रूंशीं लढण्यांत गुंतल्यामुळें त्या युद्धाच्या अवधींत युरोपची जननसंख्या अगदीं कमी झाली होती. त्या काळांत जन्माला आलेले जे तरुण १९३५ ते ३९ या अवधींत वीस वर्षांचे होऊन युद्धांत भाग घेण्याला योग्य बनतात, ते नेहमींपेक्षां फारच कमी असल्यानें त्या अवधींत युद्धाला प्रारंभ होणें अशक्य आहे. १९३९ नंतर युद्धाला तरुणांचा पुरवठा नेहमींप्रमाणें होऊं लागेल आणि त्याकरितां १९३९ नंतर केव्हांहि महायुद्ध उद्भवूं शकेल. हा अंदाज मी साप्ताहिक 'सकाळ' मध्यें १९३४ सालीं प्रसिद्ध केला होता आणि तो लेख 'लढाऊ राजकारणां'तहि समाविष्ट झाला आहे. हा दुसरा अंदाज ब्रिटिश युद्धमंत्र्यांनाहि मान्य होता आणि त्याप्रमाणें त्यांनीं १९३९ च्या अंतीं आपली युद्धाची संपूर्ण सिद्धता असली पाहिजे, अशी सूचना युद्धविभागाला दिली होती. ही माहिती, १-१-१९३४ या दिवशीं मुंबईच्या लोकमान्याचे सध्यांचे संपादक श्री. पां. वा. गाडगीळ यांना बरोबर घेऊन हिंदी सैन्यांतील एक अधिकारी मला भेटायला आले होते, त्यांच्याकडून आम्हां दोघांना मिळाली. त्या अधिकाऱ्यांनीं सप्टेंबर महिन्यांतच युद्धाला तोंड लागेल, अशीहि आम्हांला सूचना दिली होती. इंग्लंडच्या युद्धविभागाचे कागदपत्र उजेडांत आल्यास वरील माहितीचा खरेपणा इतरांनाहि दिसून येईल, पण तोंपर्यंत प्रस्तुत लेखकाला माहीत असलेल्या घटना त्यानें प्रकट केल्या नाहींत, तर तो इतिहास-देवतेचा अक्षम्य अपराध ठरेल. वर उल्लेखिलेल्या अधिकाऱ्यांना ज्योतिष-शास्त्राचा नाद होता आणि १९४१ च्या सुमाराला ब्रिटिश साम्राज्यावर गंडां-तर येणार असल्याचें मी १९३२ मध्यें प्रसिद्ध केलेलें भविष्य वाचून ते मला भेटायला आले होते.

## जलयुद्धाचा विचार

हा सारा महायुद्ध कधीं उद्भवणार या प्रश्नाचा भूमियुद्धाच्या दृष्टीनें विचार झाला. याच प्रश्नाची जलयुद्धाच्या दृष्टीनेंहि 'साप्ताहिक सकाळ' मधील लेखांत मी चर्चा केली होती. १९२१ मध्यें वाशिंग्टन येथें युद्धनौकानियंत्रण परिषद भरून इंग्लंड, अमेरिका, जपानप्रभृति राष्ट्रांनीं आपापल्या नौदलांतील युद्ध-

नौकांचें प्रमाण ठरवून टाकलें होतें. या नियंत्रणाचा अवधि १९३६ च्या अंता-पर्यंतच होता. तरी सुद्धा १९३६ च्या समाप्तीनंतर लगेच युद्ध उपस्थित होणें अशक्यच होतें. कारण नियंत्रणाच्या दीर्घ कालावधींत निरुपयोगी झालेल्या युद्धनौकांची जागा नव्या युद्धनौकांनीं भरून निघेपर्यंत मोठ्या राष्ट्रांचें जलयुद्ध जुंपणें अशक्यच होतें. या दृष्टीनें विचार केला असतांहि १९४० च्या आधीं युद्ध उपस्थित होण्याचा संभव कमीच होता. इतक्या ढोबळ दृष्टीनें विचार करून युद्धारंभाचें वर्ष निश्चित करणें परराष्ट्रीय राजकारणाच्या तज्ज्ञांना शक्य होतें. तसें तें कोणीं केलें होतें कीं नाहीं, हें दुसऱ्या महायुद्धाचे साधार इतिहास जेव्हां प्रसिद्ध होतील, तेव्हां कळून येईल.

पहिल्या महायुद्धांत एकट्या जर्मनीचा नव्हे तर रशियाचाहि पराजय झाला होता. त्या युद्धांत इंग्लंड प्रथम जरी रशियाच्या पक्षानें लढत होतें तरी १९१७ मधील बोल्शेव्हिक राज्यक्रांतीनंतर इंग्लंडचें रशियाविषयींचें धोरण बदललें आणि १९१८ च्या अंतीं जर्मनी शरण आल्यानंतर इंग्लंडनें बोल्शेव्हिक सर-कारच्या शत्रूंना सर्व प्रकारचें साहाय्य देऊन रशियाशीं न पुकारलेलें युद्ध चालू ठेवलें. या युद्धांत क्रांतिविरोधी पक्षांचा आणि पर्यायानें इंग्लंडचा सपशेल पराजय झाला. एवढ्यानेंच हें प्रकरण मिटलें असतें तर त्यांत पहिल्या महा-युद्धांतील जेत्यांची मानहानीच झाली असती. पण त्याच वेळीं राजकीय दृष्ट्या साऱ्या जगांत मूर्ख असलेल्या पोलंडच्या राज्यकर्त्यांनीं रशियावर स्वारी केली आणि त्या स्वारीमुळें स्वतः पोलंडवरच प्रथम प्राणसंकट ओढवलें. तरीसुद्धां वार्सांच्या युद्धांत रशियाचा संपूर्ण पराजय करण्यांत पोलंडला यश आल्यामुळें रशियाची गणनाहि पराजित राष्ट्रांत होऊं लागली. पहिल्या महायुद्धांतील प्राण-हानीच्या आणि प्रदेशहानीच्या दृष्टीनें रशियाला पराजितांच्या मालिकेंत प्रथम-पदच लाभणें न्याय्य होतें. यामुळें जर्मनीप्रमाणेंच रशियाहि आपल्या पराजयांचा सूड घेण्याचा प्रयत्न करणार, हें निश्चित होतें. मात्र जर्मनीनें शरणागति पत-करल्यानंतर रशियाला आणखी दोन वर्षें लढावें लागलें असल्यानें बोल्शेव्हि-कांना युद्धोपयोगी तरुणांचा पुरवठा जर्मनीच्या मागून दोन वर्षांनीं व्हावयाचा होता. ही गोष्ट लक्ष्यांत घेतली म्हणजे जर्मनीचा युद्धप्रवेश आणि रशियाचा युद्धप्रवेश यांच्यांत दोन वर्षांचें अंतर कां पडलें, याची वाचकांना कल्पना येईल.

## रुग्ण राष्ट्रांची मैत्री

पहिल्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर जर्मनी आणि रशिया या दोनहि राष्ट्रांना इतर राष्ट्रांनीं वाळींत टाकल्यामुळें त्या उभयतांना परस्परांशीं सख्य करावें लागलें होतें. रशियाचे एकेकाळचे परराष्ट्रमंत्री मो. लिट्व्हिनॉफ यांच्या चारित्र्यावरून असें समजतें कीं प्वांकारेच्या मंत्रिमंडळानें १९२३ मध्यें जर्मनीचा रूर प्रांत व्यापल्यानंतर जर्मनीवर पूर्वेकडून स्वारी करण्याला पोलंड आणि झेकोस्लोव्हाकिया हे देश सिद्ध झाले होते, पण रशियाच्या दडपणामुळें त्यांना तेव्हां स्वस्थ बसावें लागलें. उलटपक्षीं १९२६ मध्यें जर्मनीचा राष्ट्रसंघांत जेव्हां प्रवेश झाला तेव्हां रशियाच्या मित्राचा राष्ट्रसंघामध्यें शिरकाव झाल्याबद्दल स्वतः मो. स्टालिन यांनीं आनंद व्यक्त केला होता. १९२२ पासून उभय राष्ट्रांच्या युद्धविभागांचें तर अगदीं मेतकूट जमलें होतें. पण ही दोन रुग्ण राष्ट्रांची मैत्री उभयतांची प्रकृति सुधारल्यानंतर टिकली नाहीं. १९३३ पासून जर्मनीनें पूर्ण-पणें बोल्शेव्हिकविरोधी धोरण स्वीकारलें आणि उलटपक्षीं १९३६ आणि १९३७ या वर्षी मो. स्टालिन यांनीं रशियांतील जर्मनीच्या पक्षपात्यांचा देशद्रोहाच्या आरोपाच्या निमित्तानें सार्वत्रिक संहार केला. या संहारामुळें जर्मनी आणि रशिया यांच्यामधील युद्धाचा मार्ग मोकळा झाला.

वास्तविक पाहतां बोल्शेव्हिकांचें विश्वक्रांतीचें तत्त्वज्ञान साऱ्याच भांड-वलवाल्या राष्ट्रांना घातुक असल्यानें त्या सर्वांना एकजूट करून बोल्शेव्हिकांचा कांटा कधींच काढायला पाहिजे होता. या धर्मयुद्धाकरितां सैन्य पुरविण्याची सिद्धता पराजित जर्मन सेनापतींनीं १९१९ मध्येंहि दर्शविली होती. पण बोल्शेव्हिकांच्या तत्वज्ञानापेक्षांहि जर्मनीच्या युद्धयंत्राची दहशत अँग्लोफ्रेंचांना तेव्हां अधिक वाटल्यामुळें त्यांनीं त्या सूचनेचा अव्हेर केला. जर्मनीप्रमाणेंच जपानहि त्यावेळीं बोल्शेव्हिकांचा उच्छेद करण्याला सिद्ध होता, इतकेंच नव्हे तर जपानी सैन्यानें तेव्हां रशियाचा पूर्व सायबेरिया प्रांतहि व्यापला होता. पण जपानचा नित्य द्वेष करणाऱ्या अमेरिकेला रशियापेक्षा जपानची अधिक भीति वाटत असल्यामुळें तिनें जपानला सायबेरियांतून आपलें सैन्य परत घ्यायला लावलें.

## रशियन साम्राज्याचें अरिष्ट

बोल्शेव्हिकांच्या विश्वक्रांतीच्या तत्वज्ञानाकडे एकवार दुर्लक्ष्य केलें तरी त्या काळीं चालण्यासारखें होतें. पण त्यांच्यासारख्या निग्रही क्रांतिकारकांच्या हातांत पृथ्वीच्या भूपृष्ठाचा षष्ठांश राहिल्यास रशियाचें सामर्थ्य, संकल्पयुक्त पाणी स्वकरांत पडल्यावर चक्रपाणि वामन जितक्या त्वरेनें वाढला तितक्या त्वरेनें वाढेल याची कल्पना अँग्लो–अमेरिकनांना त्याकाळीं मुळींच आली नाहीं आणि त्यांनीं शेजाऱ्यांचा द्वेष करण्याच्या राजकारणांतील सनातन नियमाला अनुसरून जपान आणि जर्मनी यांचा द्वेष मागील अंकावरून पुढें चालू ठेवला. त्यांच्या उलट जपान आणि जर्मनी हे बोल्शेव्हिक रशियाचे शेजारी असल्यानें त्यांना आपल्या नैसर्गिक शत्रुविरुद्ध आज नाहीं उद्या धर्मयुद्धाचा पुकारा करून अन्य राष्ट्रांचा पाठिंबा मिळविण्याचा प्रयत्न करणें भागच होतें. पण त्यांच्या धर्मयुद्धाच्या पुकाऱ्यावर अन्य राष्ट्रांचा विश्वास बसण्याजोगी परिस्थिति बरेच दिवसपर्यंत येऊं शकली नाहीं.

जपानचें सैन्य सायबेरियांतून परत फिरल्यानंतर, आपल्याविरुद्ध धर्मयुद्ध पुकारलें जाईल, ही रशियाची धास्ती थोडी कमी झाली. पण ती पुरती नाहींशी होऊं शकली नाहीं. कारण इंग्लंडचे तेव्हांचे राजे पांचवे जॉर्ज हे बोल्शेव्हिकांचे कट्टे शत्रु होते आणि बोल्शेव्हिक लोकहि इंग्लंडलाच जगांतील भांडवलशाहीचा प्रमुख आधार समजत होते. यामुळें युद्धोत्तर पुनर्घटनेचा काळ संपला कीं इंग्लंड आपल्यावर हल्ला करणार, असें रशियाचे राज्यकर्ते मानीत असत. उलटपक्षीं रशियांत बोल्शेव्हिकांचें बस्तान नीट बसलें म्हणजे त्यांच्या आक्रमणापासून आपल्या आशियांतील साम्राज्याचा बचाव करण्याकरितां रशियाशीं केव्हां तरी लढावें लागणार अशी इंग्लंडची समजूत होती. हा काळ लौकर येणें किंवा उशिरा येणें हें मुख्यतः कोमिंटेर्नच्या प्रचारयंत्राला येणाऱ्या यशापयशावर अवलंबून होतें. १९२७ च्या सुमाराला इंग्लंडांतील युद्धोत्तर संपांची लाट थांबली आणि चीनमध्यें बोल्शेव्हिकांचें वर्चस्व होण्याचा संभव दिसूं लागला. या दोनहि कारणांमुळें इंग्लंड आणि रशिया यांचें युद्ध लौकरच जुंपतें कीं काय अशी भीति तेव्हां उत्पन्न झाली होती. पण पुढें लौकरच रशियाच्या युद्धयंत्राच्या दौर्बल्यामुळें कोमिंटेर्नचें प्रचारयंत्रहि बोथट ठरलें तेव्हां १९२८पासून

जागतिक क्रांतीचा नाद सोडून रशियानें आपलें युद्धयंत्र विश्वविजयी करण्याच्या दृष्टीनें पंचवार्षिक योजना आंखल्या. या योजनांना आलेल्या यशामुळें आपलें युद्धसामर्थ्य पुरेंसें वाढलें आहे असें पाहून रशियानें स्पेनमध्यें कम्युनिस्टांची सत्ता स्थापण्याचा प्रयत्न केला. रशियांतील राज्यक्रांति वयाच्या दृष्टीनें सज्ञान होतांच रशियाकडून जागतिक महायुद्धाचा वणवा पेटविला जाणार, अशी भीति पुष्कळांनीं पूर्वीपासूनच व्यक्त केली होती, ती स्पेनमधील राष्ट्रीय विरुद्ध कम्युनिस्ट यांच्या युद्धामुळें यथार्थ ठरली. भांडवलशाही राष्ट्रांचा कांटा काढल्यावांचून आपल्या बोल्शेव्हिक क्रांतीला सुरक्षितता लाभणें शक्य नाहीं, असा प्रचार बाळपणापासून जिच्या कानीं पडत होता अशी पिंढी सज्ञान झाल्यानंतर तिनें आपल्या शत्रूंचा एकदांचा पुरता निकाल लावण्याचें कार्य स्वीकारणें स्वाभाविकच होतें. याचवेळीं इंग्लंडांत एक लहानशी राज्यक्रांति होऊन त्या राष्ट्राचें बोल्शेव्हिकांसंबंधींचें धोरण एकाएकीं पूर्णपणें बदलून गेलें. पांचव्या जॉर्ज राजांच्या मागून इंग्लंडच्या गादीवर आलेल्या आठव्या एडवर्ड राजांना जो अनपेक्षित राज्यत्याग करावा लागला त्याचें खरें कारण, रशियाशीं कोणतें धोरण ठेवावें या प्रश्नावरून ते स्वतः आणि त्यांचे मंत्रि यांच्यांत वितुष्ट आलें होतें, हेंच होय. या रहस्यपूर्ण कारस्थानाची रूपरेखा पुढच्या प्रकरणांत सांगणें इष्ट होईल.

---

: ३ :

# एडवर्ड राजांचा राज्यत्याग

इतिहासांतील प्रत्येक घटनेचा तिच्यापूर्वी घडलेल्या घटनेशीं कमी अधिक निकटचा संबंध असतो. यामुळें कोणत्याहि घटनेच्या इतिहासाचा प्रारंभ कोठून करावा, हें निश्चित ठरविणें कठिण जातें. दुसऱ्या महायुद्धाच्या इतिहासालाहि हाच नियम लागू आहे. तथापि अनेक इतिहासज्ञांचें मत असें आहे कीं १९३६ पासूनच दुसऱ्या महायुद्धाचा प्रारंभ मानावा. हें मत मलाहि मान्य आहे. विश्वेतिहासाच्या सूत्रधारानें दुसऱ्या महायुद्धाच्या नांदीचे श्लोक म्हणण्याला १९३६ मध्येंच प्रारंभ केला, याविषयीं शंका नाहीं.

## १९३६ मधील क्रांतिकारक घटना

याच वर्षी स्पेनमधील यादवी युद्धाच्या निमित्तानें कम्युनिस्ट आणि फॅसिस्ट यांच्यामधील निर्वाणीच्या युद्धाला प्रारंभ झाला. याच वर्षी रशियांत मो. स्टालिन यांनीं जर्मनीशीं सख्य करण्याला अनुकूल असलेल्या सर्व व्यक्तींचा संहार आरंभिला. १९३६ च्या प्रारंभींच जपानी सैन्यांतील तरुण अधिकाऱ्यांनीं आपल्या मवाळ मंत्रिमंडळाची हत्या करून त्याच्या जागीं युयुत्सु मंत्रिमंडळ नेमणें आपल्या सम्राटांना भाग पाडलें. याच वर्षी चीनमधील कम्युनिस्टांनीं मार्शल चांग सूलियांग यांच्याकडून मार्शल चियांग कैशेक यांना अटक करविली आणि इतःपर जपानपुढें नमतें घेण्याचें धोरण सोडून त्याच्याशीं शक्य तितक्या लौकर युद्ध करण्याचें अभिवचन त्यांच्याकडून मिळविलें. याच वर्षी जर्मनीनें ऱ्हाईन नदीच्या तीरावरील निःशस्त्र केलेल्या प्रदेशांत सशस्त्र प्रवेश केला आणि जपानशीं कोमिंटेर्नविरोधी करार करून रशियाच्या स्वारीची प्रस्तावना केली. याचवर्षी फ्रान्सनें रशियाशीं झालेल्या परस्परसाहाय्याच्या संधीला मान्यता देऊन भावी महायुद्धाचें प्रस्थान ठेवलें. सरतेशेवटीं सांगावयाची गोष्ट ही कीं याच वर्षी इंग्लंडनें आपल्या अधिपतींना पदच्युत करून जर्मनीशीं सख्य करूं पाहणाऱ्या पक्षाचें देशांतील राजकारणांतून जवळ जवळ उच्चाटनच केलें. या

साऱ्याच घटनांचा दुसऱ्या महायुद्धाच्या इतिहासाशीं अतिशय निकटचा संबंध आहे. उदाहरणार्थ, जपानांतील मवाळ मंत्रिमंडळाची सत्ता दीर्घकाल टिकली असती तर कोमिंटेर्नविरोधी करारांत जपाननें भाग घेतला नसता आणि चीनशीं प्राणांतिक वैर उत्पन्न होऊं दिलें नसतें. रशियांतील जर्मनीच्या पक्षपात्यांचा नायनाट झाला नसता तर स्टालिनच्या जुन्या योजनेप्रमाणें जर्मनी आणि रशिया यांनीं युरोपखंडाची आपसांत वांटणीच करून घेतली असती. १९३६ मधील फ्रेंच निवडणुकींत समाजसत्तावाद्यांचें रशियाच्या साहाय्यामुळें प्राबल्य झालें नसतें तर मो. फ्लांदँ यांच्या पुढाकारामुळें फ्रान्सचा जर्मनीशीं परस्परसहायाचा संधि होणें अशक्य नव्हतें. त्याचप्रमाणें आठव्या एडवर्ड राजांना जर पदत्याग करावा लागला नसता तर बोल्शेव्हिकांच्या विरुद्ध सर्व युरोपाची एकजूट घडवून आणण्याचें जर्मनीच्या नेत्यांचें स्वप्न वास्तवसृष्टींत अवतरलें असतें आणि त्याचबरोबर रशियाविरुद्ध सर्व भांडवलवाली राष्ट्रें धर्मयुद्ध पुकारणार असल्याचें बोल्शेव्हिक प्रचारकांचें भाकितहि खरें ठरलें असतें. वर उल्लेखिलेल्या साऱ्या घटनांपैकीं एडवर्ड राजांच्या राज्यत्यागाच्या इतिहासाची सामान्य रूपरेखा तरी आपल्याला इंग्रजी ग्रंथांवरून कळूं शकते. इतर घटनांसंबंधीं इतपत निश्चित माहिती पुण्यांत तरी उपलब्ध नाहीं. तेव्हां १९३६ मधील जगाला महायुद्धाच्या अग्निकुंडाकडे नेणाऱ्या घटनांपैकीं एडवर्ड राजांच्या राज्यत्यागाचा इतिहास तेवढा या प्रकरणांत सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

## एडवर्ड राजांचें जर्मनप्रेम

एडवर्ड राजांनीं राज्यत्याग केला नसता तर कदाचित् इंग्लंड जर्मनीविरुद्ध युद्धांत पडलेंहि नसतें. इंग्लंड आणि जर्मनी यांचें सख्य असावें, अशी त्यांची मनापासूनची इच्छा होती. ते युवराज असतांनाच गेल्या युद्धांत इंग्लंडविरुद्ध लढलेल्या जर्मन सैनिकांना त्यांनीं इंग्लंडला बोलावून त्यांचें स्वतः स्वागत केलें होतें आणि त्यांना अँग्लोजर्मन राष्ट्रांमध्यें सख्य असण्याचे लाभ समजावून सांगितले होते. त्यानंतर इंग्लंडच्या गेल्या युद्धांतील वीरांना जर्मनीला धाडण्यांतहि त्यांनीं पुढाकार घेतला होता. राज्यप्राप्तीनंतरहि त्यांनीं या उपक्रमाकडे दुर्लक्ष्य केलें नाहीं. राज्याधिकार मिळाल्यानंतर परराष्ट्रीय वकिलांचा परिचय करून घेण्याच्या प्रसंगीं त्यांनीं जर्मन वकिलाला अगत्यपूर्वक बाजूला नेऊन त्याच्याशीं

अघळपघळ गप्पा छाटल्या आणि फ्रेंच वकिलाची मात्र नमस्कारावरच बोळवण केली. ही वार्ता लंडनमध्यें पसरतांच सर्व राजकारणी लोक विस्मयचकित झाले.

एडवर्ड राजांचें आपल्या कुटुंबांतील मंडळींशीं फारसें सख्य नव्हतें. इंग्लंडचे सारे धर्मगुरु आणि बाल्डविनच्या मंत्रिमंडळांतील बहुतेक प्रधानहि मिसेस सिंप्सनच्या नादीं लागल्याबद्दल त्यांच्यावर रुष्टच होते. अशा परिस्थितीमुळें एडवर्ड राजांना लंडनमधील वरिष्ठ वर्गात मिसळणें अवघडच झालें होतें. ही संधि साधून बाल्डविनवर कांहीं वैयक्तिक कारणामुळें रागावलेल्या मार्क्विस ऑफ लंडनडेरी या सरदारांनीं राजाच्या पक्षाच्या मंडळींना आपल्या घरीं एकत्र बोलावण्याचा परिपाठ ठेवला. या कळपांतील लोक नेहमीं एडवर्ड राजांच्या मतांचें समर्थन करीत आणि बाल्डविन कंपूची टवाळी करीत. त्यामुळें एडवर्ड राजांना साऱ्या लंडनमध्यें लंडनडेरींच्या कंपूमध्यें मिसळणें आवडत असे. स्वतः लंडनडेरींवर त्यांचा बराच विश्वासहि होता.

## लंडनडेरींचीं कारस्थानें

एडवर्ड राजे गादीवर आल्यानंतर दोन आठवड्यांतच त्यांनीं लंडनडेरींना जर्मनीला धाडलें. लंडनडेरीचा जर्मनींत सुमारें तीन आठवडे निवास झाला आणि हिटलेर, गोएरिंग, नायराट इत्यादि नवजर्मनीच्या विधात्यांशीं त्यांच्या गांठीभेटीहि झाल्या. जर्मनीहून परत आल्यापासून त्यांनीं अँग्लोजर्मन संधीचा प्रचार करण्याला प्रारंभ केला.

यावेळीं इंग्लंडचें परराष्ट्रखातें मि. ईडन यांच्या हातीं होतें आणि जागतिक निःशस्त्रीकरणाच्या रम्य कल्पनासृष्टींत ते दंग झाले होते. या निःशस्त्रीकरणाच्या संबंधीं त्यांनीं एक प्रश्नमालिका जर्मनीला धाडली होती; पण तेथील राष्ट्रनेत्यांत कांटचा शिष्य कोणीच नसल्यानें त्या प्रश्नमालिकेला उत्तर धाडायचें तसेंच राहून गेलें होतें. अशा रीतीनें जर्मनीकडून आपली अवहेलना झाल्याबद्दल मि. ईडन हे लॉर्ड लंडनडेरींच्यावरच रागावले. कारण आपली अवहेलना करायला लंडनडेरींनींच जर्मनीला प्रवृत्त केलें, अशी त्यांची भावना झाली होती. पण या प्रश्नमालिकेला उत्तर न मिळण्याचें खरें कारण हें होतें कीं तेव्हां हेर हिटलेर हे इंग्लंडशीं एक राजकीय संधि घडवून आणण्याच्या उद्योगांत गुंतले होते. १९३५ मध्यें हेर फोन रिब्बेनट्रोप यांना लंडनला धाडून अँग्लोजर्मन नाविक

संधि घडवून आणण्यांत त्यांना यश आलें असल्यानें पुनश्च एकवार त्यांनाच या कामगिरीवर धाडण्याचा हेर हिटलेर यांचा विचार होता. पण या कल्पनेला इंग्लंडची संमतिच मिळेना. मि. ईडन यांनीं सांगितलें कीं रिब्बेनट्रोपसारख्या विशेष दूताशीं बोलण्यापेक्षां आम्ही जर्मनीच्या नेहमींच्या राजदूताशींच सारी बोलणीं करूं. ईडनच्या नकारानंतर रिब्बेनट्रोपनीं आयर्लंडमध्यें लंडनडेरींची भेट घेतली आणि पूर्वेकडे जर्मनीच्या राज्यविस्ताराला सवड दिल्यास अँग्लोफ्रेंच साम्राज्यांना हात न लावण्याच्या अटीवर इंग्लंडशीं संधि करण्याच्या जर्मनीच्या नेत्यांच्या योजना त्यांच्यापुढें मांडल्या. या योजनांचा पुरस्कार इंग्रज लोकांकडून करविण्याकरितां त्यांनीं जूनपासून लंडनमध्येंच तळ दिला आणि त्यांच्या अपेक्षेप्रमाणें राजाच्या मित्रांनीं त्यांचा पुरस्कारहि आरंभिला.

पुढें ऑगस्टमध्यें जर्मनीचे लंडन येथील राजदूत मरण पावले. तेव्हां त्यांच्या जागीं रिब्बेनट्रोपचीच नेमणूक झाली. इंग्लंडच्या मंत्रिमंडळाला त्यांच्या छायेचा विटाळ सोसत नसे. पण एडवर्ड राजांच्या मित्रांना मात्र त्यांच्या आगमनानें अत्यानंद झाला होता. रिब्बेनट्रोप इंग्लंडांतील फॅसिस्ट संघटनेला आंतून साहाय्य करितात, असा त्यांच्यावर ब्रिटिश सरकारचा आरोप होता आणि राजांचे मित्र तर त्या संघटनांना उघडपणेंच साहाय्य करीत होते.

## स्पेनला जर्मनीचें सहाय

रिब्बेनट्रोप लंडनला आल्यानंतर सुमारें दोन महिन्यांनीं इटालीचे तेव्हांचे परराष्ट्रमंत्री आणि मुस्सोलिनींचे जावई काउंट चियानो हे बेर्लिनला कांहीं महत्त्वाच्या कारस्थानांकरितां आले. त्या कारस्थानांची सविस्तर चर्चा ‘ काउंट चियानोंचा बेर्लिन येथील कारस्थानें ’ या ‘लढाऊ राजकारणां’तील लेखांत मी केलीच आहे. त्या कारस्थानांपैकीं इथें आपल्याला आवश्यक असलेला भाग म्हणजे स्पेनमधील यादवींत जनरल फ्रांकोच्या पक्षाला उघडपणें साहाय्य करण्याचा निश्चय इटाली आणि जर्मनी या मित्रराष्ट्रांनीं तेव्हां केला, हा होय. जर्मनीच्या युद्धशास्त्रज्ञांचें म्हणणें असें होतें कीं गेल्या महायुद्धांत आपल्याला स्पेनचें प्रथमपासून साहाय्य मिळालें असतें तर १९१४ मध्येंच जर्मनानें तें महायुद्ध जिंकलें असतें. स्पेन आणि फ्रान्स यांच्या सीमा परस्परांना लागलेल्या असल्यानें ते देश परस्परांचे नैसर्गिक शत्रु होऊं शकतात. सोळाव्या

आणि सतराव्या शतकांतील वस्तुस्थिति तशीच होती. पुढें अठराव्या शतकांत फ्रान्सचया चौदाव्या लुईनें आपल्या नातवाला स्पेनची गादी मिळवून दिली आणि तेव्हापासून स्पेनच्या राजकारणाला वेगळेंच वळण लागलें. पुढें एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत बिस्मार्कनें जर्मन राजघराण्यांतील एका राजपुत्राला स्पेनच्या गादीवर वारसा सांगण्याला उद्युक्त केलें, एवढ्यावरूनच १८७० चें फ्रँकोजर्मन युद्ध घडून आलें. असा या स्पॅनिश प्रकरणाचा पूर्वेतिहास असल्यानें जनरल फ्रांकोला साहाय्य करण्याच्या निमित्तानें समोर ७०००० जर्मन सैन्य स्पेनमध्यें उतरणार आहे, अशी कंडी काउंट चियानोंच्या बेर्लिनवारीच्या पाठोपाठ पिकतांच इंग्लंड, फ्रान्स आणि बेल्जम या राष्ट्रांतून आणीबाणीचा प्रसंग उद्भवला असल्यास नवल नाहीं.

## कोमिंटेर्नविरोधी कराराचा अर्थ

जर्मनांचें हें नवें कारस्थान कसें हाणून पाडावें, या प्रश्नाची चर्चा फ्रेंच आणि ब्रिटिश मंत्रिमंडळांतून १९३६ च्या नोव्हेंबरमध्यें सारखी चालू होती. जनरल फ्रांकोच्या साहाय्याला सैनिक पाठवून जर्मनी स्पेनकडून कदाचित् मोरोक्कोचा कांहीं भाग मिळवील, अशी धास्ती जिब्राल्टरच्या राज्यकर्त्यांना वाटल्यामुळें त्यांनीं २५ नोव्हेंबरला अशी घोषणा केली कीं, स्पेनमध्यें कोणतींहि परिवर्तनें घडून आलीं तरी मोरोक्कोमधील परिस्थितींत कोणताहि बदल घडवून आणण्याला ब्रिटिश सरकार विरोध करील. यापूर्वी २० नोव्हेंबरला लीमिंग्टन येथें भाषण करतांना मि. ॲंथनी ईडन यांनीं फ्रान्स आणि बेल्जम या देशांवर आक्रमण करणाऱ्यांशीं लढण्याला इंग्लंड सज्ज असल्याचा उल्लेख केला होता. पण त्यापूर्वीच १४ ऑक्टोबरला बेल्जमच्या राजांनीं फ्रान्सशीं असलेला आपला संधि मोडून इतःपर आपला देश तटस्थ राहणार असल्याची घोषणा केली होती. बैल गेल्यानंतर झोपा लावणाऱ्या आपल्या प्रधानमंडळाच्या कर्तृत्वशून्यतेचा एडवर्ड राजांना इतका तिरस्कार आला होता कीं, या आणीबाणीच्या प्रसंगीं आपल्या मंत्रिमंडळाविषयीं आपल्याला काय वाटतें, हें विश्वविश्रुत करण्याकरितां ते दक्षिण वेल्समधील कोळशांच्या खाणींतील कामगारांच्या कष्टमय जीवनाचें निरीक्षण करण्याकरितां तिकडे निघून गेले. या कामगारांची

कारानें ती सुधारण्याचे कोणतेहि यत्न केले नव्हते. यामुळेंहि एडवर्ड राजांचा हा दौरा म्हणजे आपल्या मंत्रिमंडळावरील अविश्वासाचें प्रदर्शन असेंच इंग्लंडच्या मुख्य प्रधानांना वाटलें असल्यास कांहीं नवल नाहीं. एडवर्ड राजे या दौऱ्याहून परत येतात न येतात तोंच जर्मनी आणि जपान या दोन राष्ट्रांत कोमिंटेर्नविरोधी करार झाल्याची वार्ता येऊन थडकली. या कराराच्या धोरणाला अनुसरून पुढें जर्मनीनें युरोपांतील बहुसंख्य राष्ट्रांशीं संधि केले आणि रशियाविरुद्ध बहुतेक युरोपची एकजूट घडवून आणली. पण तेव्हां लंडन टाइम्सनें त्या कराराचा अर्थ असा लाविला कीं, ब्रिटिश साम्राज्यावर हल्ला करण्याकरितां जर्मनी आणि जपान सिद्ध झाले आहेत, पण आपला खरा उद्देश लोकांपासून लपविण्याकरितां त्यांनीं स्वतःच्या कटाला कोमिंटेर्नविरोधी करार हें फसवें नांव दिलें आहे. राजकारणांत निराधार संशयाची मजल कुठपर्यंत जाऊं शकते, याचें हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. कोमिंटेर्नविरोधी कराराचा तात्कालिक हेतु असा होता कीं, रशियावर जपानचें दडपण आणून त्याला स्पेनकडे दुर्लक्ष्य करावयाला लावावें आणि जर्मनीनें स्पेनमध्यें सैन्य उतरवून तेथील कम्युनिस्टांचा कांटा काढावा. या कोमिंटेर्नविरोधी कराराच्या पाठोपाठ जर जर्मन सैन्य स्पेनमध्यें उतरलें तर फ्रान्सचें आणि जर्मनीचें नक्की युद्ध जुंपणार आणि जर्मन सैन्य बेल्जममधून फ्रान्सवर स्वारी करणार, अशी भीति मागील महायुद्धानें पोळलेल्या बेल्जमच्या मुख्य प्रधानांना वाटली आणि हें संकट टाळण्याचे किंवा त्याला तोंड देण्याचे प्रयत्न करण्याकरितां ते स्वतःच लंडनला निघून आले.

## व्हान झीलंड यांचीं कारस्थानें

बेल्जमवर जर्मनीची स्वारी झाल्यास आपण तत्काळ जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारूं, अशी घोषणा इंग्लंडनें आधींपासून करून ठेवली असती तर गेलें महायुद्ध घडलेंच नसतें, अशी अनेक तज्ज्ञब्रुवांप्रमाणें बेल्जमचे तेव्हांचे प्रधान व्हान झीलंड यांचीहि कल्पना होती. यामुळें विशिष्ट परिस्थितींत इंग्लंड युद्धांत पडणार नाहीं, असें म्हणणारा प्रत्येक मुत्सद्दी हा त्यांना एक प्रकारचा युद्धापराधीच वाटत असे. १९३६ च्या उत्तरार्धांत स्पेनमध्ये जर्मन सैन्य उतरलें तरी इंग्लंड जर्मनीच्या विरुद्ध जाणार नाहीं, असें आश्वासन हेर फोन रिब्बेनट्रोप यांनीं जर्मनीच्या नेत्यांना दिलें होतें आणि जर्मनीचे तेव्हांचे परराष्ट्रमंत्री बे

बॅरन फोन नायराट, त्यांना न विचारतांच कोमिंटेर्नविरोधी करार घडवून आणला होता. त्या करारावर परराष्ट्रमंत्री नायराट यांच्याऐवजीं जर्मनीच्या वतीनें स्वतः रिब्बेनट्रोप यांनींच स्वाक्षरी केली होती. या सर्व कारणांमुळें व्हान झीलंड यांना हेर फोन रिब्बेनट्रोप हे जर्मन परराष्ट्रखात्यातील कलिपुरुषच वाटत होते.

लंडनला आल्यानंतर बेल्जमच्या प्रधानमंत्र्यांनीं ब्रिटिश मंत्रिमंडळाला कोणती गुप्त वार्ता सांगितली, हें अद्यापि अधिकृत रीत्या प्रकट झालेलें नाहीं. तथापि स्पेनच्या निमित्तानें इंग्लंड युद्धांत पडणार नाहीं, हा रिब्बेनट्रोप यांनीं पसरविलेला भ्रम दूर करण्याचा आग्रह त्यांनीं इंग्लंडच्या नेत्यांना केला असला पाहिजे, हें उघड आहे. कारण त्यांच्या स्वागताप्रीत्यर्थ झालेल्या उपाहाराच्या प्रसंगीं बोलतांना मि. ईडन यांनीं त्यांना असें आश्वासन दिलें की, जर्मनीप्रभृति राष्ट्रांनीं शस्त्रें उचलली तर अर्वाचीन शास्त्रज्ञांनीं शोधून काढलेलीं भयानक अस्त्रें इंग्लंडला सुद्धां निग्रहानें वापरतां येतात, असेंच त्यांच्या अनुभवाला येईल.

व्हान झीलंड यांचें लंडन येथील आकस्मिक आगमन, नंतर सुट्टींत प्रवासाला गेलेल्या मंत्रिमंडळाला लंडनला परत बोलावण्याची धांदल, त्यानंतर चाललेल्या मंत्रिमंडळाच्या सुदीर्घ बैठकी, या बैठकींनंतर जर्मनीला दिलेली धमकी, त्याचप्रमाणें त्या दिवशींच्या लंडनच्या सायंकालीन वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालेले ' स्पॅनिश प्रश्नासंबंधीं आणीबाणीचा प्रसंग ' हे मथळे या सर्व गोष्टींवरून तेव्हांची राजकीय परिस्थिति बरीचशी समजून येते. या परिस्थितींत भरलेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकींत राजा आणि प्रधानमंडळ यांच्या परस्परसंबंधाचाहि विचार झाला, असें तेव्हां न्यूयॉर्क टाइम्सच्या वार्ताहरानें म्हटलें होतें. या उल्लेखावरून असें दिसतें कीं, तेव्हां राजकीय प्रश्नावरून राजा आणि प्रधानमंडळ यांच्यामधील मतभेद अतिशय विकोपाला गेले होते.

## एडवर्ड राजांचें पहिलें प्रेम

राजे एडवर्ड हे कम्युनिस्टांचे कट्टे शत्रु होते. त्यांना जर राजकीय बाबतींत सातव्या एडवर्डची परंपरा चालवितां आली असती तर कोमिंटेर्नविरोधी करार घडवून आणण्यांत त्यांनीं स्वतःच पुढाकार घेतला असता. स्पेनच्या प्रकरणांत तर त्यांचें आणि त्यांच्या मंत्रिमंडळाचें मत यांच्यामध्यें उत्तर आणि दक्षिण

ध्रुवांइतकें अंतर होतें. मीं स्वतः जेव्हां पूर्वग्रहाविरहित मनानें 'स्पेनमधील यादवीची पूर्वपीठिका' लिहिली, तेव्हां माझें मनहि तेथील कम्युनिस्टांच्या विरुद्ध कलुषित झालें. मग एडवर्ड राजांचें मन कलुषित झालें असल्यास त्यांत नवल काय? त्यांना स्वतःला स्पॅनिश भाषा चांगली येत होती, स्पेनची त्यांना उत्कृष्ट माहिती होती आणि एके काळीं ते स्पॅनिश राजकन्येशीं विवाह करून आल्फोन्सो राजांचे जांवई बनतात कीं काय, अशी त्यांच्या मित्रमंडळींना शंकाहि येऊं लागली होती. पण पुढें आल्फोन्सो राजे राज्यभ्रष्ट होऊन स्पेनमध्यें लोकसत्ता प्रस्थापित झाल्यामुळें राजकीय कारणांकरितां त्यांना ती कल्पना डोक्यांतून काढून टाकावी लागली होती. एडवर्ड राजांचें हें पूर्वचरित्र लक्ष्यांत घेतलें म्हणजे स्पेनच्या प्रश्नावरून त्यांचें आणि त्यांच्या मंत्रिमंडळाचें वांकडें येणें कसें अपरिहार्य होतें, हें आंधळयांनाहि म्हणजे एडवर्ड राजांच्या मिसेस सिंप्सनवरील प्रेमाच्या कथेनें आंधळे बनलेल्या इतिहासकारांनाहि कळून येईल. स्पेनच्या प्रकरणावरून एडवर्ड राजांचा आणि आपला मतभेद झाल्याचें लोकांत प्रकटपणें सांगणें राजकारणाच्या दृष्टीनें अनिष्ट असल्यानें बाल्डविन मंत्रिमंडळानें मिसेस सिंप्सनचें निमित्त करून राजांच्या डाव्या बगलेवर हल्ला चढविला आणि ती बगल त्यांना रविवर्म्याच्या चित्रांतील विश्वामित्राच्या बगलेप्रमाणेंच उघडी सांपडली. सगळयाच स्त्रीवश पुरुषांच्या बगला उघड्या असतात कीं काय कोण जाणें.

असो, बाल्डविन प्रधानानें एडवर्ड राजांना कसें पदच्युत केलें, याचा इतिहास या ठिकाणीं अप्रस्तुत आहे. त्यांच्या जागीं सहाव्या जॉर्जची स्थापना झाल्यानंतर शक्य तितक्या लौकर लंडन आणि पारीस येथील परराष्ट्रीय खात्यांनीं जर्मनीला स्पेनमध्यें अधिक सैन्य न पाठवण्याबद्दल निक्षून सांगितलें. या प्रश्नासंबंधीं ११-१-१९३७ या दिवशीं जर्मनीच्या नेत्यांनीं स्वतःच फ्रान्सच्या बेर्लिन येथील वकिलांना आश्वासन देऊन तो प्रश्न मिटवून टाकला. एडवर्ड राजांच्या राज्यत्यागामुळेंच जर्मनीला त्या बाबतींत माघार घ्यावी लागली, असें तज्ज्ञांचें मत आहे. राज्यत्यागानंतर ड्यूक ऑफ विंडसर बनलेल्या पूर्वीच्या राजांनीं १९३७ च्या ऑक्टोबर महिन्यांत जर्मनीचा प्रवास करून हिटलेरची भेटहि घेतली, या घटनेचा उल्लेख प्रस्तुत प्रकरणाच्या अंतीं करणें आवश्यक आहे. युरोपच्या रक्षणाकरितां एडवर्ड राजांनीं राज्यत्याग करावयाला नको होता, असे उद्गार हेर हिटलेर यांनीं काढले असल्याचें जर्मनींत प्रसिद्ध आहे.

: ४ :

# महायुद्धाचें मूलकारण

अखिल युरोपखंडाला असलेलें रशियाचें भय प्रतिक्षणीं वाढत असतांनाहि जर्मनीशीं सख्य घडवून आणण्याचा एडवर्ड राजांचा प्रयत्न कां फसला, याच्या मूलभूत कारणांची आतां थोडी मीमांसा केली पाहिजे. या मीमांसेची दिशा 'दुसऱ्या आघाडी'च्या उपसंहारांत यापूर्वींच दाखविली आहे. पण तेथील विवेचन अगदींच त्रोटक असल्यानें त्याचा इथें थोडा विस्तार करणें आवश्यक आहे.

## ग्रहमाला आणि राष्ट्रमाला

सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या ग्रहमालेच्या जन्माचा विचार केला असतां आपल्याला असें आढळून येतें कीं, सूर्यापासून विच्छिन्न झालेल्या द्रव्यापासून प्रथम सर्वांत दूरचे ग्रह घनीभवनानें अस्तित्वांत आले आणि त्यानंतर अधिक जवळचे ग्रह अस्तित्वांत येऊं लागले. स्वतः सूर्याचें अद्यापि घनीभवन झालेंच नाहीं. युरोपांतील राष्ट्रमालेची जन्मकथा कांहींशी या ग्रहमालेच्या जन्मकथेसारखीच आहे. रोमन साम्राज्याच्या विनाशानंतर जर्मन लोकांनीं जेव्हां सारें युरोपखंड व्यापलें, तेव्हां प्रत्यक्ष जर्मनीपासून सर्वांत दूर असलेल्या स्पेन आणि फ्रान्स या देशांतून प्रथम राष्ट्रें निर्माण झालीं. अँग्लोफ्रेंचांच्या शतवार्षिक युद्धांत इंग्लंडचा पराजय झाल्यानें आणि इंग्लंडवरील स्पॅनिश आरमाराची स्वारी फसल्यानें एलिझाबेथच्या राजवटींत इंग्लंड हें राष्ट्र बनलें. पण हीं सारीं राष्ट्रें मूळच्या ज्या जर्मन-जेत्यांनीं निर्माण केलीं, त्या जर्मन वंशाचें एकराष्ट्र हिटलरनें ऑस्ट्रिया देश जर्मनींत समाविष्ट करीपर्यंत बनलें नव्हतें आणि तें बनवितांना राष्ट्रसंघाच्या रूपानें संघटित झालेल्या सर्व युरोपियन राष्ट्रांचा त्याला विरोध सोसावा लागला होता. या विरोधाचें मुख्य कारण सांस्कृतिक आहे, असें मला वाटतें. समानसंस्कृतिसंवर्धनाचीं केंद्रें अनेक असणें हें त्या संस्कृतीच्या उत्कर्षाला हितकारक असतें. एका संस्कृतीचीं हीं विभिन्न केंद्रें विभिन्न सत्तांच्या आश्रयानेंच अस्तित्वांत येतात आणि उत्कर्ष पावतात. यामुळें एकाच संस्कृ-

# हिटलरचे साहाय्यक



हर हिमलर



पेतॉं व लावल

# इजिप्तमधील सेनापति



फील्ड मार्शल वेव्हेल



फील्ड मार्शल रोमेल

तीच्या सत्तेचीं केंद्रें अनेक असणें हें त्या संस्कृतीच्या संवर्धनाला उपयुक्त ठरतें. हीं सारीं विभिन्न सत्ताकेंद्रें जिवंत ठेवण्याचा एकच उपाय असतो. तो म्हणजे त्यांपैकीं कोणत्याहि एका सत्ताकेंद्रानें इतर एक किंवा अनेक सत्ताकेंद्रांच्या अस्तित्वाचा लोप करण्याचा प्रयत्न केला तर अन्य सर्व सत्ताकेंद्रांनीं एकत्रित होऊन त्याच्या आक्रमणाचा प्रतिकार करणें, हाच होय. ग्रीक पुराणांतील हेलेनच्या स्वयंवराच्या प्रसंगीं साऱ्या ग्रीक राजांनीं असाच संकेत केला होता कीं, तिनें निवडलेल्या वरापासून जो कोणी तिला पळवून नेईल, त्याचा इतर सर्व राजांनीं मिळून कांटा काढावा. हा संकेत पाळावयाचा असल्यास कोणतेंहि एक सत्ताकेंद्र इतर सर्वांहून अधिक प्रबळ होऊं नये, याकरितां जपावें लागतें. यासाठींच युरोपांतील कोणतेंहि एक राष्ट्र इतर सर्वांहून बलिष्ठ होऊं नये म्हणून इतर सर्व राष्ट्रें धडपडत असतात. किरकोळ राष्ट्रांच्या असल्या अखंड सावधानपणाचे परिणाम मुख्यतः एखाद्या संस्कृतीच्या केंद्रस्थानीं असलेल्या राष्ट्रालाच भोगावे लागतात. पंक्तीच्या मधोमध बसलेल्या व्यक्तीला एखादा घास चोरून खाणें अगदीं अशक्य होतें. पण त्याच्या उलट दोन टोकांना बसलेल्या धूर्तांनीं मात्र नेमकी संधि साधून घास उचलले तर तें साऱ्या पंक्तीच्याहि लक्ष्यांत येत नाहीं. उदाहरणार्थ, युरोपाच्या एका टोकाला असलेल्या इंग्लंडनें खेदिवाचें राज्य खाल्लें किंवा दुसऱ्या टोकाला असलेल्या रशियानें उत्तर आशियाखंड गिळंकृत केलें तर तें कोणाच्या लक्ष्यांतसुद्धां येत नाहीं. पण जर्मनीनें ऑस्ट्रियाचा प्रदेश जर्मन राष्ट्राला जोडला तर मात्र साऱ्या युरोपांत संत्रस्ततेचें वातावरण निर्माण होतें.

## जर्मन लोकांच्या एकीकरणाला युरोपचा विरोध

जर्मनीकडे नित्य संशयी दृष्टीनें पाहणाऱ्या युरोपांतील इतर सत्ताकेंद्रांच्या वर्तनांत एक अतिशय हास्यास्पद विसंगति उत्पन्न झाली आहे. आपल्या विभक्त अस्तित्वाचें समर्थन करण्याकरितां त्यांनीं राष्ट्रीयत्वाच्या तत्त्वाचा आधार घेतला आहे. पण त्या तत्त्वाप्रमाणें जर्मनीचें एकराष्ट्र अस्तित्वांत येऊं देण्याला मात्र त्यांचा निकराचा विरोध आहे. कारण त्यामुळें युरोपांतील कोणतेंहि एक राष्ट्र इतर सर्व राष्ट्रांहून बलिष्ठ होऊं न देण्याचें राजकारण एकदम कोलमडून पडतें इतकी जर्मन बोलणाऱ्यांची संख्या मोठी आहे. निदान या एका बाबतींत तरी

त्यांचें धोरण सुसंगत आहे, असें म्हणावें तर वस्तुस्थिति त्याच्या अगदीं उलट आहे. कारण या पाश्चात्य युरोपियनांच्या संस्कृतीच्या परिघावर असलेल्या इंग्लिश आणि रशियन लोकांनीं अत्यंत प्रचंड साम्राज्यविस्तार केला असला तरी अद्यापपावेतों एकदाहि साऱ्या पाश्चात्य युरोपियनांची त्यांच्याविरुद्ध एक-जूट झालेली स्मरत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, इंग्लंड आणि रशिया यांसारख्या संस्कृतीच्या परिघावर असलेल्या देशांना सामान्यतः अगदी विभिन्न संस्कृति असलेले देश गिळंकृत करून आपलें सामर्थ्य त्वरेनें वाढवितां येतें. समान संस्कृतीच्या लोकांना दास बनविण्याच्या दुष्कृत्यामुळें त्या संस्कृतीच्या क्षेत्रांत जितकी खळबळ होते, तितकी खळबळ असमान संस्कृतीचे हिंदुस्थान किंवा चीन यांसारखे देश गिळंकृत केल्यानें खचित होत नाहीं. इंग्लंडनें बोअर लोकांविरुद्ध, किंवा रशियानें फिनिश लोकांविरुद्ध युद्ध पुकारलें असतां त्या उभयतां बड्या भाईविरुद्ध पाश्चात्य युरोपियन संस्कृतीच्या देशांतून तीव्र असंतोष निर्माण झाला होता. पण तो असंतोष कृतींत कधींच उतरला नाहीं. संस्कृ-तीच्या परिघावरील देशांनीं वर उल्लेखिल्यासारखे कांहीं अन्याय केले तरी त्यांच्या भौगोलिक परिस्थितीमुळें त्यांना सशस्त्र विरोध करण्याकरितां इतर राष्ट्रें एकत्रित होत नाहींत.

## केंद्रांतील राष्ट्राचें कर्तव्य

याच्या उलट संस्कृतीच्या केंद्रस्थानीं असलेल्या राष्ट्राची परिस्थिति असते. प्रत्येक संस्कृतीचें बाळंतपण आणि संगोपन तिच्या केंद्रस्थानीं असलेल्या राष्ट्रा-लाच करावें लागत असल्यामुळें त्या राष्ट्रांतील जनतेच्या शरिरावर त्याचा बराच परिणाम होतो. उलटपक्षीं परिघावरील राष्ट्रांना त्या संस्कृतीचा सारा लाभ केवळ अनुकरणानें अनायासानेंच प्राप्त होत असल्यामुळें त्यांच्या जनतेचीं शरिरें वनमानुषाप्रमाणें अविकृत आणि आरोग्यपूर्ण राहतात. दुसरी गोष्ट अशी कीं, परिघावरील रानटी राष्ट्रें सुसंस्कृत राष्ट्रांच्या युद्धकलेचें आणि राजनीतीचेंच प्रथम अनुकरण करतात. त्यामुळें युद्धशास्त्राच्या दृष्टीनें त्या उभयतांमध्यें म्हण-ण्याजोगा भेद रहात नाहीं. परिघावरील रानटी राष्ट्रें सुसंस्कृत राष्ट्रांची युद्ध-कला प्रथम उचलतात, हें पीटर दि ग्रेट या रशियन सम्राटाच्या चरित्रावरून वाचकांना विदित झालेंच असेल आणि तें स्वाभाविकहि आहे. कारण आत्म-

रक्षणाची विद्या रानटी लोकांनीं प्रथम आयत्त करून घेतली नाहीं तर सुसंस्कृत लोक त्यांना लौकरच आत्मसात् केल्यावांचून राहणार नाहींत. रानटी लोकांनीं सुसंस्कृत लोकांची युद्धकला आयत्त केल्यानंतर लौकरच ते युद्धामध्यें अजेय बनतात. कारण आदर्श शरिरें आणि आदर्श शास्त्रें यांचा समन्वय केवळ त्यांच्यामध्येंच होऊं शकतो. त्यांच्या सुदैवानें संस्कृतीच्या परिघावरील रानटी लोकांना आपल्याहून अधिक रानटी लोकांना जिंकून स्वतःच्या देशाचा विस्तार वाढविण्याला आणि आपल्या सैन्यासाठी शारीरिक दृष्ट्या अतिशय सत्पात्र असलेल्या सैनिकांचा भरणा करण्याला हवी तितकी संधि सांपडते. या सर्व गोष्टींचा विचार करून विद्यमान इतिहासज्ञांचे अग्रणी प्रो. टॉयनबी यांनीं पुढील सिद्धांत मांडला आहे. एखाद्या विशिष्ट संस्कृतीमध्यें जर अनेक स्वतंत्र राज्यें निर्माण झालीं असतील आणि आपल्यांपैकीं कोणालाहि इतरांपेक्षा वरचढ होऊं न देण्याचें वेड त्यांना जडलें असेल, आणि इतकें असूनसुद्धां त्यांच्या संस्कृतीचा प्रभाव वर्धिष्णु असेल तर त्या संस्कृतीच्या केंद्र आणि मूल स्थानांतील छोट्या राष्ट्रांना आज नाहीं उद्यां आपल्या परिघावरील विशाल आणि बलिष्ठ राष्ट्रांचें दास्य करावें लागेल. हा सिद्धान्त मांडल्यानंतर युरोपांतील दुसऱ्या महायुद्धापूर्वीच्या परिस्थितीविषयीं त्यांनीं जे मार्मिक उद्गार काढले आहेत, ते त्यांच्याच शब्दांत उतरून घेतले पाहिजेत. ते म्हणतात,

If the pygmy states at the centre take no preventive action, it is obvious that the giant states on the periphery are bound to overwhelm them by sheer weight of metal; and this means that, on the political plane, the creators and sustainers of the common civilazation will loose their power of initiative and perhaps their independence, and that the sceptre will pass to the outer 'Barbarians' who are not yet fit to wield it. This will not only be a political calamity for the pygmy central states; it will also be a cultural calamity for Society as a whole. From every point of view, it is in the

public interest that this calamity should be averted; and the duty of averting it devolves upon the statesmen of the central states whose political existence is threatened.

'संस्कृतीच्या केंद्रांतील छोट्या राष्ट्रांनीं तिच्या परिघावरील राक्षसराष्ट्रांविरुद्ध आधींपासून कांहीं उपाययोजना केली नाहीं तर तीं राष्ट्रें त्यांना आपल्या नुसत्या दडपणाखालीं चेंगरून टाकल्यावांचून राहणार नाहींत. याचा परिणाम असा होईल कीं ज्यांनीं त्या संस्कृतीला जन्म दिला आणि तिची जोपासना केली त्यांची स्वतःच्या प्रेरणेप्रमाणें वर्तन करण्याची शक्तिच नष्ट होईल, कदाचित् त्यांचें राजकीय स्वातंत्र्यहि लोप पावेल आणि मग त्यांचा राजदंड परिघावरील रानटी लोकांच्या हातीं जाईल. ते रानटी तर या संस्कृतीची जोपासना करण्याला अद्यापि पात्र झालेले नाहींत. म्हणजे केंद्रांतील क्षुद्र राष्ट्रांचें स्वातंत्र्य नष्ट होणें हें त्यांच्या पुरतेंच राजकीय संकट राहणार नसून तें साऱ्या पाश्चात्य युरोपियन समाजावरचें प्राणसंकट होईल. कोणत्याहि दृष्टीनें विचार केला तरी असें दिसतें कीं, हें सार्वत्रिक संकट टाळण्याचा प्रयत्न करणें आवश्यक आहे. ज्यांच्या राजकीय अस्तित्वावरच गडांतर आलें आहे, त्या केंद्रांतील राष्ट्रांच्या नेत्यांचें हें कर्तव्यच आहे.'

दुसऱ्यांचीं कर्तव्यें त्रयस्थांना फार चांगलीं दिसतात आणि व्यक्त करतां येतात. पण तीं बजावण्याचा मार्ग दाखवून देणें फार अवघड असतें. जर्मनीसारख्या पाश्चात्य युरोपियन संस्कृतीच्या केंद्रस्थानीं असलेल्या राष्ट्राला आपलीं कर्तव्यें इंग्लंडांतील इतिहासज्ञांपेक्षां अधिक स्पष्ट दिसत नव्हतीं, अशांतला भाग नाहीं. पण तीं बजावण्याचा प्रयत्न करण्यापूर्वी जर्मनीला आपल्या विशिष्ट परिस्थितीचा विचार करणें भाग होतें. परिघावरील राष्ट्रावर सामान्यतः एका वेळीं एकाच आघाडीवर लढण्याचा प्रसंग येतो. याच्या उलट केंद्रांतील राष्ट्रावर एका वेळीं चारी बाजूंनींहि हल्ले होणें अशक्य नसतें. जर्मनीच्या पूर्वेला आणि पश्चिमेला बलाढ्य राष्ट्रें असल्यानें त्या देशाला निदान दोन आघाड्यांचा तरी प्रश्न सोडविणें भाग होतें. हा प्रश्न सोडविण्याचे उपाय दोनच असतात. एका वेळीं एकाहून अधिक शत्रूंशीं युद्ध उपस्थित न होऊं देणें, किंवा एकाच वेळीं दोन आघाड्यांवर लढावें लागणार नाहीं अशी व्यवस्था करणें. एका वेळीं एका-

हून अधिक शत्रूंशीं युद्ध उपस्थित होऊं न देणें हें अर्वाचीन काळांत राजनीतीचें ज्ञान सार्वत्रिक झाल्यानें बरेंच अवघड झालें आहे. तरीसुद्धां केव्हां केव्हां हा उपाय यशस्वी होतो. एका वेळीं दोन आघाड्यांवरील लढाई टाळावयाची असल्यास एखाद्या आघाडीवर सार्वत्रिक तटबंदी किंवा व्यूहरचना करून ती टाळावी लागते. या दोनहि उपायांचा उपयोग करण्याइतकी अनुकूल परिस्थिति येईपर्यंत टॉयनबींनीं सांगितलेलें कर्तव्य बजावण्याचा प्रयत्न करणें जर्मनीला सोयीचेंहि नव्हतें आणि कदाचित् शक्यहि नव्हतें.

## कांहीं ऐतिहासिक दाखले

इतिहासशास्त्राशीं अगदींच अपरिचित असलेल्या वाचकांना वरील विवेचन दुर्बोध वाटणें शक्य आहे. याकरितां कांहीं ऐतिहासिक दाखले दाखवून तें सुबोध करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पाश्चात्य संस्कृतीचें पहिलें लीलाक्षेत्र जो ग्रीस देश, त्या देशांत नगरराज्यांची राज्यपद्धति प्रचलित होती. त्या साऱ्या नगरराज्यांच्या आपसांतील स्पर्धेमुळें ग्रीक संस्कृतीची अतिशय त्वरेनें वाढ झाली. पण, एक नगर हा आपल्या संस्कृतीच्या क्षेत्राबाहेरील शत्रूंपासून आत्मसंरक्षण करून घेण्याला समर्थ असा घटक नसल्यानें ग्रीसमधील नगरराज्यांचें संघराज्य स्थापल्यावांचून आपलें स्वातंत्र्य टिकणार नाहीं, हा सिद्धांत ग्रीक राजकारणांत कधींच सर्वमान्य झाला नाहीं आणि त्यामुळेंच शेजारच्या रानटी मॅसिडोनियन लोकांनीं ग्रीसमधील सारीं नगरराज्यें जिंकून ग्रीक लोकांना आपले दास बनविलें.

खिस्तापूर्वी ग्रीसमध्यें घडलेला वरील प्रयोग खिस्तोत्तर सोळाव्या शतकांत इटाली देशांत अधिक मोठ्या प्रमाणावर घडून आला. इटालींत ग्रीसप्रमाणेंच नगरराज्यांची भरभराट झाली होती आणि नागरसंस्कृतीचा परमोत्कर्ष झाला होता. पण आपल्या संस्कृतीच्या परिघावरील फ्रान्स, जर्मनी किंवा स्पेन यांच्यासारख्या बलिष्ठ पण रानटी राज्यांपासून आपलें संरक्षण करून घेण्याकरितां इटालींतील नगरराज्यांचें संघराज्यांत परिवर्तन घडवून आणण्याचा माकियाव्हेलीचा उपदेश, इटालींतील सुसंस्कृत असूनसुद्धां राजकीय दृष्ट्या महामूर्ख असलेल्या इटालियनांना रुचला नाहीं आणि त्यामुळें इटाली देश हा शतकानुशतकें जर्मनी आणि स्पेन यांच्या दास्यांत सडत राहिला.

ग्रीस आणि इटाली यांच्यावर पूर्वी ओढवलेल्या प्राणसंकटासारखेंच संकट मध्यां साऱ्या युरोपखंडावर ओढवलेलें आहे. युरोपीय संस्कृतीच्या पूर्वपरिघा-वर संपूर्ण पृथ्वीचा सहावा भाग व्यापून टाकणारें एक प्रचंड साम्राज्य अस्ति-त्वांत आलें आहे. या साम्राज्याची संस्कृति आणि इतर युरोपाची संस्कृति यांच्यामध्यें आकाशपाताल प्रभेद आहे. यामुळें युरोपाच्या पूर्वपरिघावरील रशियन साम्राज्यानें इतर युरोप जिंकल्यास तेथील संस्कृतीचा नायनाट होणार आहे. अशा परिस्थितींत युरोपांतील पाश्चात्य राष्ट्रांनीं एकत्र होऊन रशियाच्या आक्रमणाचा प्रतिकार करणें आवश्यक आहे. असें असूनसुद्धां यापूर्वी ग्रीस आणि इटाली यांनीं ज्या राजकीय अविचारीपणाचें प्रदर्शन केलें होतें, त्याच अविचारीपणाचें प्रदर्शन करून इंग्लंडनें दुसऱ्या महायुद्धांत पाश्चात्य संस्कृतीच्या संरक्षणाला समर्थ अशा एकमेव राष्ट्राविरुद्ध शस्त्र उचललें आणि सारें युरोप-खंड बोल्शेव्हिझमच्या खाईंत लोटून दिलें. या कृत्याबद्दल इंग्लंडला कदाचित् आज पश्चात्तापहि होत असेल. पण ' की मेरे कत्ल के बाद उसने जफासे तोबा ' या जातीच्या पश्चात्तापाचा आतां उपयोग काय ?

: ५ :

# ब्रिटिश राज्यकर्त्यांचें रशियासंबंधींचें अज्ञान

एकाच वेळीं आपल्या संस्कृतीच्या परिघावरील दोन राष्ट्रांशीं शत्रुत्व टाळावयाचें असल्यास त्या दोन राष्ट्रांपैकीं जें राष्ट्र वंशानें आणि संस्कृतीनें आपल्याला अधिक निकटचें असेल, त्याच्याशीं प्रथम सख्य करण्याचा प्रयत्न करणें स्वाभाविक असतें. याकरितां दुसरें महायुद्ध उपस्थित होण्यापूर्वी जर्मनीनें इंग्लंडशीं सख्य करण्याचा आपल्याकडून शक्य तितका प्रयत्न केला. हा प्रयत्न कां फसला, याचीं कारणें या प्रकरणांत सांगावयाचीं आहेत.

हा प्रयत्न फसण्याचें सर्वांत महत्त्वाचें कारण म्हणजे इंग्लंडचें रशियाच्या सामर्थ्याविषयींचें अज्ञान होय. रशियाचीं युरोपांतील कारस्थानें परिणामीं आपल्याला अतिशय घातुक आहेत, याविषयीं ब्रिटिश राज्यकर्त्यांची निश्चिति झाली होती. पण पारीस येथील संधिपरिषदेचें धोरण आपण तसेंच पुढें चालविल्यास रशिया आणि जर्मनी या दोनहि राष्ट्रांना इंग्लंडच्याच तंत्रानें वागावें लागेल, अशी त्यांची भ्रामक समजूत होती. इंग्लंडची अशी समजूत होण्याचें कारण इथें थोडक्यांत सांगितलें पाहिजे. पहिल्या महायुद्धानंतर जर्मनी आणि रशिया या दोघांचेंहि बलिष्ठ राष्ट्रांच्या पंक्तींतून उच्चाटन झालें होतें. त्यामुळें युरोपांत भूमिबळी राष्ट्र फ्रान्स हें एकच उरलें होतें. अशा काळांत इंग्लंड आणि फ्रान्स या उभयतांची परस्परांशीं स्पर्धा चालत असे. या स्पर्धेची संधि साधून जर्मनानें आपलें डोकें वर उचललें आणि १९३३ पासून नाझी पक्षाच्या नेतृत्वाखालीं आपल्या परंपरागत सामरिक सामर्थ्याचें पुनरुज्जीवन आरंभिलें. जर्मन गरुडाला पुनः पंख फुटलेले पाहून फ्रान्सनें फिरून एकवार रशियाशीं परस्परसहायाचा संधि केला आणि त्याला राष्ट्रसंघांत आणून त्याचा युरोपांतील राजकारणांत पुनः प्रवेश करून दिला. रशियाचा युरोपांतील राजकारणांत पुनः प्रवेश झाल्यापासून दोन वर्षांतच स्पेनचें सरकार रशियाच्या तंत्रानें वागूं लागलें आणि फ्रेंच सरकाराचीहि जवळ जवळ तशीच अवस्था झाली. आपल्या पाठबळाच्या अभावीं

फ्रान्सची अशी दुर्दशा झालेली पाहून इंग्लंडच्या राज्यकर्त्यांना असें वाटलें की, आपण पूर्वीप्रमाणें फ्रान्सशीं निकट मैत्री जोडली तर त्या देशाला जर्मनीचें भयहि राहणार नाहीं आणि रशियाच्या सहायाची आवश्यकताहि भासणार नाहीं. म्हणजे मग आपोआपच युरोपच्या राजकारणांतून रशियाला आपलें अंग बाहेर काढून घ्यावें लागेल. असल्या कल्पना रिप् व्हॅन विंकलचा मायदेश जो अमेरिका, तेथील राज्यकर्त्यांच्या डोक्यांत घोळत असत्या, तर त्याचें नवल वाटलें नसतें. पण १९३७ मध्यें इंग्लंडच्या मुख्य प्रधानांनीं असल्या कल्पना व्यवहारांत आणण्याचा प्रयत्न करणें अगदीं हास्यास्पद होतें.

## जर्मन युद्धतज्ज्ञांचें रशियाशीं सहकार्य

पहिल्या महायुद्धानंतर रशिया आणि पोलंड या उभयतांचें युद्ध होऊन त्यांत रशियाचा पराजय झाला. त्या घटनेवरूनच इंग्रज राज्यकर्त्यांनीं आपल्या रशिया आणि पोलंड यांच्या सामर्थ्याविषयींच्या कल्पना बनविल्या होत्या. पण १९३७ मधील रशियांतील वस्तुस्थिति अगदीं भिन्न होती १९१८ मधील पराजया-नंतर जर्मनीवर विजयी राष्ट्रांनी शस्त्रनियंत्रणाचे निर्बंध लादल्यामुळें जर्मन युद्ध-शास्त्रज्ञांनीं रशियाशीं संगनमत करून त्या देशांत आपले सर्व प्रयोग करून पाहण्याकरितां सवलती मिळविल्या. अशा रीतीनें जर्मनी आणि रशिया यांचें सहकार्य झाल्यामुळें रशियन सैन्यांत अभूतपूर्व असें परिवर्तन घडून आलें. पहिल्या महायुद्धांत सैन्याची संघटना आणि रणनीति या दोनहि बाबतींत रशि-यन सैन्य हें सर्वांत खालच्या प्रतीचें होतें; तें जर्मन युद्धशास्त्रज्ञांच्या सह-कार्याचा लाभ झाल्यानंतर एकदम सर्वांत श्रेष्ठ प्रतीचें होऊन बसलें. जर्मनी आणि रशिया यांच्या युद्धशास्त्रज्ञांचें सहकार्य १९२२ पासून सुमारें १२ वर्षें टिकलें. या एका तपाच्या दीर्घकालांत ‘ सर्वत्र जयमन्विष्येत् शिष्यादिच्छेत् पराजयम् ’ असे उद्गार गुरूंच्या तोंडून निघण्याइतकी प्रगति रशियन युद्धशास्त्र-ज्ञांनीं केली होती. रूसोजर्मन युद्धशास्त्रज्ञांचें सहकार्य, नाझी पक्षाच्या हातीं जर्मनींतील सत्ता आल्यानंतर लौकरच बंद पडलें आणि त्यानंतर १९३४ च्या अंतीं झालेल्या किरोफच्या हत्येचें निमित्त करून स्टालिननें जर्मनीशीं सहकार्य करूं पाहणाऱ्या साऱ्या रशियनांचा संहार आरंभिला. या संहारांत मार्शल तखाचेव्हस्की यांच्यासह सुमारें एक लक्ष युद्ध आणि इतर खात्यांतील लहान-

मोठ्या अधिकाऱ्यांचा निकाल लागला असावा अशी सामान्य समजूत आहे. या हत्याकांडामुळें १९३७ मध्यें रशियन सैन्याचा आत्मविश्वास बराच कमी झाला होता पण त्या मानानें त्याचें मूळचें सामरिक सामर्थ्य फारसें नष्ट झालें नव्हतें, ही गोष्ट तेव्हां अनेकांच्या लक्ष्यांत राहिली नव्हती. या हत्याकांडानेंहि जर्मनांच्या नेतृत्वाखालीं झालेली रशियन सेनेची प्रगति कांहीं वायां गेली नाहीं. कारण देवयानीच्या शापामुळें स्वतः कचाला जरी संजीवनी विद्येचा प्रयोग करतां आला नाहीं, तरी तेवढ्यामुळें देवांमध्यें त्या विद्येचा प्रसार थांबला नाहीं.

## इंग्लंडचें रशियाविरोधी राजकारण

रशियाच्या या तात्कालिक दौर्बल्याची संधि साधून पश्चिम युरोपाच्या राजकारणांतून रशियाला घालवून देण्याचे इंग्लंडनें १९३७ मध्यें अनेक प्रयत्न केले. जर्मनीला स्पेनमध्यें सैन्य न पाठविण्याची ताकीद दिल्यानंतर त्या देशांतील उभय पक्षांकडे जाणारें सहाय थांबविण्याचा प्रयत्न इंग्लंडनें केला. याकरितां त्या देशाकडे जाणाऱ्या जलमार्गांवर पहारा ठेवावयाचें ठरलें. हे पहारे ठरवितांना स्पॅनिश कम्युनिस्टांच्या ताब्यांतील प्रांतांकडे जाण्याच्या जलमार्गांवर जर्मनी आणि इटाली यांचे पहारे बसविले आणि रशियाला मात्र बिस्केच्या उपसागरांतील महत्त्वशून्य पण वादळी भागांत टेहेळणीचें काम दिलें. या अपमानामुळें रशियानें समुद्रावरील टेहळणींतून आपलें अंगच काढून घेतलें. यानंतरसुद्धां व्यापारी नौकांतून स्पेनला सैन्य आणि युद्धसामुग्री जातच होती. कारण पहारा करण्याचें काम ज्यांनीं पत्करलें होतें, ते सारे अप्रामाणिकच होते. म्हणून ही वाहतूक पुरती बंद पाडण्याच्या हेतूनें कांहीं अज्ञात पाणबुड्या नौकांनीं स्पेनकडे जाणाऱ्या नौका बुडविण्याचा उपक्रम आरंभिला. या चांच्यांचा नायनाट करण्याकरितां पुन्हा एकदा स्पॅनिश प्रकरणाशीं संबंध असलेल्या राष्ट्रांची बैठक बसली. या बैठकीचा प्रारंभ होण्यापूर्वीच रशियानें इटालीचा अपमान करून तें राष्ट्र त्या बैठकींत भाग घेणार नाहीं, इतकी व्यवस्था करून ठेवली. पण त्यामुळें रशियाचा कांहींच लाभ झाला नाहीं. चांचेगिरीचा नायनाट करण्याकरितां सुद्धां इंग्लंडनें रशियाला भूमध्यसमुद्रांत पाय घालूं देण्याचें नाकारलें आणि काळ्या समुद्रांत चांच्यांचा उपद्रव झाल्यास तो शमविण्याचें काम रशियाला दिलें. रशियाचें समुद्रावरील सामर्थ्य अगदींच कमी असल्यानें या दोन

प्रसंगीं इंग्लंडचा डाव साधला. पण रशियाचा पदोपदीं अपमान करून त्याला पश्चिम युरोपांतील राजकारणांतून अंग काढून घ्यावयाला लावण्याचें इंग्लंडचें धोरण एकंदरीनें पोचटच होतें. कारण या धोरणामुळें इंग्लंडचें आणि रशियाचें वाकडें आलें तरी स्पेनचें सख्य कांहीं इंग्लंडला लाभत नव्हतें. स्पेनमधील परदेशी सैनिकांना घालवून देण्याच्या बाबतींत रशियाच्या विरोधामुळें इंग्लंडला अपयशच आलें.

## रशियापेक्षा पोलंड वरिष्ठ?

समर्थ राष्ट्राला सुद्धां प्रसंगविशेषीं परिस्थितीकडे पाहून पड खावी लागते. पण त्या पड खाण्यावरून त्याच्या सामर्थ्याविषयीं जर आपण चुकीची कल्पना करून घेतली तर तिचे परिणाम आपल्यालाच भोगावे लागतात. रूसोजपानी युद्धापूर्वी एकवार रशिया, फ्रान्स आणि जर्मनी या तिघांनीं मिळून जपानला पोर्ट आर्थरचें बंदर सोडायला लावलें होतें. पण या प्रसंगीं जपाननें पड खाल्ली एवढ्यावरून रशियानें त्याच्या सामर्थ्याविषयीं जी कल्पना करून घेतली होती ती किती चुकीची होती, हें पुढें रूसोजपानी युद्धांत दिसून आलें. रशियाच्या सामर्थ्याविषयीं इंग्लंडची असलीच चूक दुसऱ्या महायुद्धापूर्वी झाली होती. रशियापेक्षां पोलंडचेंहि सामर्थ्य अधिक आहे, अशी तेव्हां ब्रिटिश राज्यकर्त्यांपैकीं कित्येकांची समजूत होती. या विधानावर अनेकांचा विश्वास बसणें अवघड आहे, हें मलाहि माहीत आहे. पण ती तेव्हांची वस्तुस्थिति होती, याविषयीं शंका नाहीं. दुसऱ्या महायुद्धाच्या पहिल्या वर्षी रशियानें जेव्हां फिन्लंडविरुद्ध युद्ध पुकारलें तेव्हां इंग्लंडनें आपण होऊन रशियाविरुद्ध युद्ध पुकारावें असा उपदेश लंडनच्या ' नाइन्टीन्थ सेंचरी अँड आफ्टर ' या प्रसिद्ध मासिकाच्या संपादकांनीं केला होता. या उपदेशाला अनुसरण्याचें धाडस चेंबर्लेनमंत्रिमंडळाला झालें नाहीं, ही गोष्ट वेगळी. पण त्या उपदेशावरून इंग्लंडच्या राज्यकर्त्या वर्गांतील रशियाविषयींच्या कल्पना अगदीं उठावदारपणानें दिसून येतात. इतक्या विकृत कल्पनांनीं ज्यांच्या डोक्यांचीं खोकीं भरलीं होतीं, त्यांना रशियापासून केवळ जर्मनीलाच नव्हे तर साऱ्या युरोपखंडाला किती भय आहे, याची कल्पना कशी येणार? जर्मनीच्या राज्यकर्त्यांच्या रशियाविरोधी भाषणांवर त्यांचा कधींच विश्वास बसत नसे. खरें म्हणजे याबद्दल जर्मन राज्य-

कर्त्यांनाच दोष दिला पाहिजे, असें मलाहि वाटतें. कारण, आपले खरे हेतु लपवून ठेवण्याचा उत्कृष्ट उपाय म्हणजे ते प्रकटपणें बोलून दाखविणें होय; हें रहस्य बिस्मार्कनें जर्मनीच्या राज्यकर्त्यांना समजावून सांगितल्यानंतर त्यांनीं आपले खरे हेतु लोकांना कळविण्याचा दुसरा एखादा उपाय शोधून काढणें आवश्यक होतें. पण जर्मनीच्या दुर्दैवानें त्यांच्या प्रचारमंत्र्यांना या वस्तुस्थितीची कधीं कल्पनाहि आली नाहीं. यामुळें त्यांचा कोमिंटेर्नविरोधी करार म्हणजे ब्रिटिश साम्राज्याची वांटणी करून घेण्याचा कट असेंच इंग्लंडचे राज्यकर्ते मानीत असत.

## रूसोजर्मन मैत्रीची परंपरा

कोमिंटेर्नविरोधी कराराचा हा अर्थ जपानच्या बाबतींत खरा असल्याचें मागाहून अनुभवालाहि आलें. १९३५ मध्येंच इंग्लंडचे सर्वांत नामांकित इतिहासशास्त्रज्ञ डॉ. टॉयनबी यांनीं ब्रिटिश राज्यकर्त्यांना बजावून सांगितलें होतें कीं, The British Empire could be broken up any day by a concerted attack from Nippon in league with any single continental European power. तेव्हां जर्मनीशीं करार करण्यांत जपानचा हेतु काय असावा, याची इंग्लंडच्या नेत्यांना यथार्थ कल्पना होती, असें म्हणावें लागतें. पण कोमिंटेर्नचा विरोध हेंच नाझी जर्मनीच्या राजकारणाचें आद्य तत्त्व आहे, याची इंग्लंडला व्हावी तशी जाणीव झाली नव्हती. पण या बाबतींत इंग्लंडची चूकभूल होण्याला तितकेंच बलवत्तर असें कारण होतें, तेंहि इथें सांगितलें पाहिजे. रशियाशीं मैत्री ठेवण्याचें धोरण प्रशियाचें राज्य अस्तित्वांत आल्यापासून तों एकोणिसाव्या शतकाच्या अंतीं कायसर विल्हेल्मनें बिस्मार्कला पदच्युत करीपर्यंत होहेनझोलेर्न राजघराण्यानें मोठ्या दक्षतेनें संभाळलें होतें. या दीर्घ कालावधींत फ्रेडेरिक दि ग्रेट यांच्या राजवटींत मात्र रशिया आणि प्रशिया यांचें एकवार युद्ध झालें. पण या युद्धाचीं कारणें केवळ वैयक्तिक होतीं. तेव्हां युद्धामध्यें रशियाला यश आलें असतांना मुद्दा रशियाचे राज्यकर्ते बदलल्याबरोबर तें युद्ध थांबलें आणि त्यामुळें सप्तवार्षिक युद्धांत फ्रेडेरिकचा बचाव झाला. कायसर विल्हेल्मच्या काळांत जर्मन राज्यकर्त्यांनीं रशियाच्या मैत्रीपेक्षां ऑस्ट्रियाच्या मैत्रीला अधिक महत्त्व दिल्या-

मुळें जर्मनी आणि रशिया यांचें वाकडें आलें. पुढें पहिल्या महायुद्धांत या वितुष्टाचे दुष्परिणाम दोघांनाहि भोगावे लागले. त्या महायुद्धानंतर ऑस्ट्रियाचें साम्राज्यच मोडल्यामुळें आणि युरोपांतील इतर सर्व राष्ट्रांनीं जर्मनी आणि रशिया यांच्यावर बहिष्कार टाकल्यामुळें त्यांचें पुनश्च परस्परांशीं सख्य झालें होतें. या सख्यामुळेंच जर्मन युद्धशास्त्रज्ञांचें रशियाला सहकार्य लाभलें होतें. या सहकार्याच्या काळांत जर्मनीचा पूर्व प्रशियाचा प्रांत मुख्य जर्मनीपासून अलग पडल्याबद्दल स्वतः स्टालिनलाहि जर्मनीइतकीच हळहळ वाटत होती आणि या अन्यायाचा जर्मनीला प्रतिकार करावयाचा असल्यास जर्मनीच्या सहायार्थ आपण सिद्ध असल्याचें आश्वासन स्वतः स्टालिननें १९२८ मध्येंच दिलें होतें. तेव्हां आपल्याला लौकरच इंग्लंडशीं युद्ध करावें लागणार आणि त्या युद्धांत सारें युरोप गोवलें जाणार, असें भाकित बुखारिननें केलें होतें. इंग्लंडनें रशियाविरुद्ध युरोपांतील सर्व राष्ट्रांची एकजूट घडवून आणली असल्यानें ती फोडण्याचा प्रयत्न आतांच केला पाहिजे, असे उद्गार तेव्हां स्टालिननेंहि काढले होते. ही गोष्ट लक्ष्यांत घेतली म्हणजे स्टालिनला जर्मनीविषयीं एकाएकी इतकी आपुलकी कां वाटूं लागली होती हें वाचकांना कळून येईल. पहिल्या महायुद्धामुळें गेलेले प्रांत जर्मनीला परत मिळावेत आणि रशियानें पोलंड, रुमानिया आणि बलगारिया यांना सोव्हिएट, संघांत समाविष्ट करावें, या धोरणावर तेव्हांची बोलणीं झालीं होतीं. रशियानें हीं बोलणीं केलीं तेव्हां अँग्लोफ्रेंच सैन्यांनीं जर्मनीचा ऱ्हाईन तीरावरील प्रांत व्यापलेलाच असल्यानें जर्मनीला कोणतेंहि साहस करणें शक्य नव्हतें. याकरितां जर्मन राज्यकर्त्यांना तेव्हां रशियाच्या अनुकूलतेचा कांहींच उपयोग करून घेतां आला नाहीं. तथापि १९२९ मध्यें रशिया आणि जर्मनी यांच्यांत मैत्रीचा एक संधि झालाच.

## ऑस्ट्रिया आणि रशिया यांचें वैर

असो, हिटलेर अधिकारावर येण्यापूर्वी जर्मनी आणि रशिया यांचे परस्परसंबंध इतके चांगले असल्यानें नाझी जर्मनीच्या रशियाविरोधी धोरणावर इंग्लंडच्या राजकारणी मंडळींनी एकदम विश्वास ठेवणें अवघड होतें. पण हिटलेर स्वतःला ऑस्ट्रियन साम्राज्याचा एका अर्थी वारसच समजत असल्यानें ऑस्ट्रिया आणि रशिया यांच्यामधील परंपरागत वैराचा वारसाहि त्याच्याकडे आला

होता. रशिया आणि ऑस्ट्रिया यांचें वैरहि एका वारसाच्या वादामुळेंच उद्भवलें होतें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. तुर्की साम्राज्याच्या अंतिम काळांत त्या साम्राज्याला युरोपांतील रुग्ण पुरुष या नांवानें संबोधण्याची वहिवाट होती. या रुग्ण पुरुषाचा अंत झाल्यावर त्याचा वारसा आपल्याला मिळावा, यासाठीं ऑस्ट्रिया आणि रशिया यांची चढाओढ चालू असे. या चढाओढीमुळेंच पहिलें महायुद्ध लढलें गेलें. पण त्या महायुद्धांत तुर्की आणि ऑस्ट्रियन साम्राज्यांचीं छकलें उडालीं तरी रशियाला त्याचा कांहींच लाभ झाला नाहीं. तथापि या दोनहि साम्राज्यांच्या विलयापासून आपल्याला आज नाहीं उद्यां नक्की लाभ होईल, अशी रशियाला आशा वाटत होती. पण रशियाची ही बहु दिवसांची इच्छा हिटलेरनें ऑस्ट्रियन साम्राज्याच्या छकलांवर आपलें अधिराज्य स्थापण्याला प्रारंभ केल्यानें अकस्मात् छेदिली गेली आणि त्यामुळें रशियाचा जर्मनीशीं चिरस्थायी संधि होणें अशक्य झालें. या साऱ्या गोष्टी तेव्हांहि शाहण्या लोकांना स्पष्ट दिसत होत्या; तरी सुद्धां ब्रिटिश राज्यकर्त्यांना या साऱ्या परिस्थितीची योग्य वेळीं यथार्थ कल्पना आली नाहीं.

ब्रिटिशांना बोल्शेव्हिकांचें खरें स्वरूप ओळखणेंहि अवघड होतें. त्याचें कारण असें कीं, विश्वकल्याणाच्या थापा मारून आपला स्वार्थ साधण्यांत ब्रिटिश राज्यकर्त्यांइतकेंच बोल्शेव्हिकहि प्रवीण आहेत. यामुळें स्वतःच्या राज्यकर्त्यांच्या भूलथापांना बळी पडणारे ब्रिटिश नागरिक बोल्शेव्हिकांच्या भुलथापांनाहि सहज बळी पडत. ही वस्तुस्थिति लक्ष्यांत घेऊन ब्रिटिश नागरिकांचा आपल्यावरील विश्वास नष्ट होऊं नये याकरितांहि ब्रिटिश राज्यकर्त्यांना कांहीं बाबतींत तरी बोल्शेव्हिकांच्या पद्धतीच्या विश्वकल्याणवादाचा पुरस्कार करावा लागे. यामुळें रशियाच्या सामर्थ्याची यथार्थ कल्पना असणाऱ्यांनाहि त्याच्याच राजकारणाचें अनुकरण करावें लागे. या आणि यासारख्या इतरहि अनेक कारणांमुळें रशिया-विरुद्ध इंग्लंड आणि जर्मनी यांचें सख्य होऊं शकलें नाहीं. याचेंच पर्यवसान मरते शेवटीं दुसऱ्या महायुद्धांत झालें.

: ६ :

# ऑस्ट्रियन साम्राज्याचा वारसा

पहिल्या महायुद्धापूर्वी मध्ययुरोपाचा बहुतेक भाग जर्मनी आणि ऑस्ट्रिया यांच्या साम्राज्यांनीं व्यापला होता. या साम्राज्यांची एकजूट साऱ्या जगाशीं टक्कर देण्याला समर्थ आहे, असा अनुभव त्या महायुद्धांत आल्यानें संधीच्या वेळीं त्यांच्या शत्रूंनीं जर्मन साम्राज्याचे अनेक भाग स्वतःच्या साम्राज्याला जोडून घेतले. पण निदान मूळच्या जर्मनीचीं शकलें तरी बनविलीं नाहींत. याच्या उलट ऑस्ट्रियन साम्राज्याची अवस्था झाली. त्या साम्राज्याचे कांहीं भाग पोलंड, युगोस्लाव्हिया, रुमानिया आणि इटाली या देशांना जोडून टाकून उरलेल्या भागाचींहि तीन स्वतंत्र राष्ट्रें बनविलीं. अर्थात् आर्थिक आणि सामरिक दृष्ट्या हीं तीनहि राष्ट्रें अतिशय दुर्बल बनल्यानें तीं आपल्या पायांवर उभीं राहण्याला असमर्थ होतीं. त्यामुळें पारीसच्या संधिपरिषदेनें केलेली ऑस्ट्रियन साम्राज्याची वांटणी चिरकाल टिकणें अशक्य होतें. त्याची चिरस्थायी व्यवस्था करावयाची म्हणजे एक तर ऑस्ट्रियन साम्राज्याचें पुनरुज्जीवन केलें पाहिजे, नाहीं तर त्याच्या निरनिराळ्या भागांवर शेजारच्या बलाढ्य राष्ट्रांनीं अधिराज्य स्थापलेलें मुकाट्यानें पाहिलें पाहिजे. या व्यतिरिक्त तिसरा उपाय नव्हता.

## सर ऑस्टेन यांचें कारस्थान

यांपैकीं ऑस्ट्रियन साम्राज्याचें पुनरुज्जीवन करण्याचा एक प्रयत्न इंग्लंडनें १९३६ च्या वसंतांत करून पाहिला. त्या वेळीं संधीच्या अटी मोडून जर्मनीनें ऱ्हाईन तीरावरील प्रांतांत लक्षावधि सैन्य नेऊन ठेवल्यामुळें इंग्लंडचे नेते जर्मनीवर रागावले होते. याकरितां इंग्लंडचे एका काळीं परराष्ट्रमंत्री असलेले सर ऑस्टेन चेंबरलेन यांनीं ऑस्ट्रिया, हंगारी आणि झेकोस्लोव्हाकिया या देशांच्या राजधान्यांना भेटी देऊन त्या साऱ्या देशांच्या नेत्यांना असें सुचविलें कीं, ऑस्ट्रियन राजघराण्याचा वारस जो प्रिन्स ओटो, त्याला ऑस्ट्रियानें परत बोलावून त्याचें राज्य त्याला देऊन टाकावें. मग ओटोनें ब्युडापेस्ट आणि प्राग

या नगरांतून पुनःअभिषेक करून घेऊन ऑस्ट्रियन साम्राज्याचीं तीनहि शकलें एका राजछत्राखालीं आणावींत. या योजनेला झेकोस्लोव्हाकियाचा तीव्र विरोध होता. त्याचें म्हणणें असें होतें कीं, ऑस्ट्रिया जर्मनींत समाविष्ट झाला तरी चालेल, पण हाप्सबुर्ग घराण्याचें पुनरुज्जीवन व्हावयाला नको. या एका बाबतात झेकोस्लोव्हाकियाचे अध्यक्ष मासारिक आणि हिटलेर या उभयतांचीं मतें तंतोतंत जमत होतीं. यामुळें इंग्लंडची ही योजना जर्मनीच्या कानांवर येतांच जर्मनीनें इंग्लंडला अशी तंबी दिली कीं, राजपुत्र ओटोनें ऑस्ट्रियांत पाय टाकला तर जर्मनीचीं सैन्यें लगेच व्हिएन्नावर चालून जातील. या धमकीप्रमाणें एप्रिलच्या अंतीं जर्मन सैन्यें ऑस्ट्रियाच्या सीमेवर जमूं लागलीं. या थराला गोष्टी गेलेल्या पाहून सर ऑस्टेन यांनीं आपलीं कारस्थानें थांबवून लंडनला प्रयाण केलें.

## जर्मनीचा ऑस्ट्रियाशीं संधि

त्यानंतर असल्या कारस्थानांना पुरता पायबंद लावण्याकरितां १९३६ च्या जुलै महिन्यांत जर्मनीच्या नेत्यांनीं ऑस्ट्रियन सरकारशीं एक संधि घडवून आणला. वास्तविक पाहतां ऑस्ट्रिया देश हा वंशानें आणि भाषेनें पूर्णपणें जर्मन असल्यानें स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाप्रमाणें पारीसच्या संधिपरिषदेच्या वेळींच त्यांचें एक राष्ट्र व्हावयाला हवें होतें. पण त्या संधिपरिषदेला जर्मन गरुडाचे पंख कापावयाचे असल्यानें तिनें त्या देशांच्या एकीकरणाला विरोध करणाऱ्या अटी संधींत घालून ठेवल्या. पुढें १९३१ मध्यें जर्मनी आणि ऑस्ट्रिया या देशांनीं स्वतःच्या सोयीकरितां आयातनिर्यात मालावरील कराची संयुक्त रीतीनें व्यवस्था पहावयाचें ठरविलें, तेव्हांहि ही योजना संधिपरिषदेंतील अटींना विरोधी आहे असें खोटेंच निमित्त पुढें करून त्या दोनहि देशांना ती योजना टाकून देणें भाग पाडलें. हा सारा पूर्वेतिहास लक्ष्यांत घेऊन १९३६ मध्यें जर्मनीच्या नेत्यांनीं ऑस्ट्रियाकडून इतकेंच मान्य करून घेतलें कीं, ऑस्ट्रिया हा जर्मन राष्ट्राचाच एक घटक आहे आणि आपल्या अंतर्गत राजकारणाव्यतिरिक्त इतर सर्व बाबतींत जर्मनीशीं सहकार्य करण्याला सिद्ध आहे. याच वेळीं ऑस्ट्रियाचें स्वातंत्र्य अमान्य करून जर्मनीनें मोठ्या कष्टानें त्याच्या स्वायत्त शासनाला आपली मान्यता दिली होती या संधीवर स्वाक्षरी होतांच ऑस्ट्रियन सरकारानें आपल्या देशांतील वर्तमान

पत्रांना जर्मन सरकारावर टीका करण्याला बंदी केली, सामरिक आणि इतर खात्यांतून हिटलेरविरोधी अधिकाऱ्यांना काढून टाकलें, ऑस्ट्रिया आणि जर्मनी यांची राज्यपद्धति एकसारखी करण्याकरितां दोनहि देशांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांची एक समिति नेमली आणि जर्मनीच्या विश्वासांतील दोन पुढाऱ्यांना मंत्रिमंडळांत घेतलें. त्यानंतर ३–११–३६ या दिवशीं ऑस्ट्रियन मंत्रिमंडळांतील जर्मन पक्षाच्या प्रमुखाकडे अध्यक्षाची निवडणूक, सार्वत्रिक मतें घेण्याची व्यवस्था, कोणालाहि ऑस्ट्रियाचें नागरिकत्व देण्याचे अधिकार आणि सीमाविषयक प्रश्नांचा निर्णय इत्यादि बाबतींतील संपूर्ण सत्ता दिली.

## ऑस्ट्रियांतील अंतःस्थिति

पण इतकें करून सुद्धा ऑस्ट्रिया आणि जर्मनी यांचे संबंध मित्रभावाचे राहिले नाहींतच. अशा तडजोडीच्या संधींचा परिणाम हाच होतो. एका पक्षानें आपलें स्वतंत्र अस्तित्व राखून देतां येतील तितक्या सवलती दिलेल्या असतात. पण दुसऱ्या पक्षाच्या सर्वभक्षक क्षुधा प्रज्वलित करण्याला मात्र त्या उपयोगीं पडतात. त्यांतून १९३४ मध्यें जर्मनीच्या प्रेरणेमुळें ऑस्ट्रियाचे तेव्हांचे प्रधानमंत्री डॉ. डॉल्फुस हे मारले गेले असल्यानें त्या दोनहि सरकारांचीं मनें परस्परांविषयीं शुद्ध नव्हतीं. १९३७ च्या जुलैपर्यंत ऑस्ट्रियांत हिटलेरचें 'मायन कांफ' म्हणजे 'माझा लढा' आणण्याला बंदी होती, यावरून त्या उभय सरकारांचें आंतरिक सख्य कितपत झालें होतें, याची कल्पना येईल. ऑस्ट्रियन लोक वंशानें जर्मन असले तरी त्यांच्या व्हिएन्ना राजधानींत अन्य वंशाच्या लोकांचा भरणा फार मोठा होता आणि ऑस्ट्रियन साम्राज्याच्या अंतिम दिवसांत तेथील राज्यकारभाराचीं सूत्रें त्यांच्याच इच्छेप्रमाणें हलविलीं जात असत. व्हिएन्नामध्यें समाजसत्तावाद्यांचेंहि प्राबल्य फार होतें आणि तो पक्ष कट्टा नाझीद्वेष्टा होता. पुन्हा नाझी लोकांनीं कॅथोलिक पंथाच्या अविवाहित धर्मोपदेशकांमध्यें पुष्कळदां आढळणाऱ्या पापी प्रवृत्तीवर शस्त्र उचललें असल्यानें त्या पंथाचें आणि जर्मनीच्या राज्यकर्त्यांचें वाकडें आलें होतें. या सर्व पक्षांची एकजूट झाली असती तर हिटलेरला ऑस्ट्रियन साम्राज्याचाच नव्हे तर एकट्या ऑस्ट्रियाचाहि वारसा लाभणें अवघड झालें असतें. पण जर्मनींतील सत्ता त्याच्या हातीं आल्यानंतर एका वर्षानें व्हिएन्नांतील समाजसत्तावाद्यांनीं बंड

केलें आणि तेथील कॅथोलिक पक्षाच्या साहाय्यानें सरकारनें तें मोडून टाकून समाजसत्तावाद्यांना निर्विष भुजंग बनविलें. या प्रकरणामुळें नाझीविरोधी पक्षांपैकीं एका पक्षाचा परस्पर कांटा निघाल्यानंतर १९३४ च्या जुलैमध्यें नाझी पक्षानें ऑस्ट्रियांत राज्यक्रांति घडवून आणण्याचा एक प्रयत्न केला. या प्रयत्नांत तेथील मुख्य प्रधानांचा बळी पडला तरी इतर प्रधान नाझी कटवाल्यांच्या हातीं न लागल्यामुळें तो प्रयत्न फसला आणि याच वेळीं मुस्सोलिनीनें इटालियन सैन्य ब्रेन्नेर खिंडीच्या तोंडाशीं उभें केल्यामुळें जर्मनीच्या नेत्यांनींहि जर्मन सैन्य ऑस्ट्रियांत धाडण्याचें साहस केलें नाहीं. पण हें प्रकरण घडून आल्यानंतर चार वर्षांनीं इटालीचीं मुख्य सैन्यें ॲबिसीनिया आणि स्पेन या देशांतून गुंतून पडलीं आणि ऱ्हाईन नदीतीरावरील प्रांत व्यापण्याचें साहस केल्यापासून जर्मन सेनेचा आत्मविश्वासहि वाढला होता. १९३८च्या आरंभीं जर्मनींत एक लहानशी रक्तपातहीन क्रांति होऊन नाझीविरोधी नेमस्त पक्षाचे सर्व लोक आधिकारभ्रष्ट झाले होते. यामुळें कोणतेंहि साहस करण्याला तेव्हां जर्मनीचे नेते एका पायावर सिद्ध होते.

## शूश्निगचें स्वागत

या वेळीं ऑस्ट्रियाची आर्थिक परिस्थितिहि जर्मनीनें बिघडवून ठेवली होती. जर्मनीनें ऑस्ट्रियाकडून लागेल तितका माल घेतला होता आणि त्याचे पैसे थकविले होते. तेव्हां ऑस्ट्रियाला आपला जर्मनीशीं असलेला व्यापार अगदीं कमी करावा लागला आणि त्यामुळें तेथील बेकारांच्या संख्येंत बरीच भर पडली. सरासरीनें ६५ लक्ष लोकसंख्येच्या त्या देशांत तेव्हां आठनऊ लक्ष लोक निरुद्योगी होते; यावरून तेथील बेकारीची भीषणता कळून येते. देशाची अशी दुर्दशा झाली असतांनाच ऑस्ट्रियन सरकारनें अशी घोषणा केली कीं, पहिल्या महायुद्धांत पंगू झालेल्यांना इतःपर सरकारचें साहाय्य मिळणार नाहीं. या घोषणेबरोबरच अशीहि वार्ता सरकारी रीत्या प्रसिद्ध झाली कीं, ऑस्ट्रियन राजघराण्याला त्याच्या कौटुंबिक स्थावरजंगम संपत्तीचा बराच मोठा भाग परत देण्याचें सरकारनें ठरविलें आहे. अशा प्रकारें अनाथपंगू लोकांच्या तोंडचा घांस काढून घेऊन त्या पैशांच्या जोरावर राजपक्षीयांनीं 'आयर्न लीजन' नांवाची स्वयंसेवकांची सेना उभारली. या वेळीं ऑस्ट्रियन राजघराण्याचा वारस प्रिन्स ओटो याच्याबरोबर हेर मार्टिन फुक्स याच्या द्वारा शूश्निगचीं बोल-

र्णीहि चालूं होतीं. १९३८ च्या जानेवारींत लंडनच्या डेली टेलिग्राफ पत्राला मुलाखत देऊन शूश्निगनें आपण ओटोच्या पक्षाचे असल्याची प्रकटपणें घोषणाहि केली होती. पुढें फेब्रुवारींत ऑस्ट्रियाची परिस्थिति फारच अवघड झाली, तेव्हां प्रिन्स ओटोनें आपल्या हातीं सर्वाधिकार देण्याची शूश्निगजवळ मागणीहि केली होती. पण ओटो व्हिएन्नांत आला तर तो तेथून जिवंत बाहेर पडणार नाहीं इतकेंच नव्हे तर त्याला तिथें सुरक्षितपणें पोंचायचें असेल तर त्यानें विमानांतूनच यावें, असें व्हिएन्नाचें लोकमत असल्याचें शूश्निगला माहीत असल्यानें त्यानें त्याच्या मागणीला नकार दिला. व्हिएन्नांतील लोकमत इतकें राजघराण्याच्या विरुद्ध असल्यानें त्या घराण्याला त्याची संपत्ति परत देऊन तिच्या जोरावर राजपक्षाच्या स्वयंसेवकांची सेना उभारलेली पाहतांच नाझी लोक अत्यंत प्रक्षुब्ध झाले आणि त्यांनीं मारामाऱ्या करून राजपक्षाच्या साऱ्या सभा मोडून टाकल्या. या दंग्यांचें निमित्त करून ऑस्ट्रियन सरकारानें नाझी पक्षियांची सार्वत्रिक धरपकड आरंभिली. याप्रमाणें १९३६ मधील तडजोडीची पायमल्ली चाललेली पाहून हेर हिटलेर यांनीं १९३८ च्या फेब्रुवारींत ऑस्ट्रियाचे मुख्य प्रधान डॉ. शूश्निग यांना निर्वाणीचा संदेश पाठवून आपल्या भेटीला बोलाविलें. या भेटींत कशा प्रकारें बोलणीं झालीं यांचें वर्णन लंडन 'टाइम्स'च्या व्हिएन्ना येथील वार्ताहरानें पुढीलप्रमाणें केलें आहे. 'Shushnigg was called a murderer and traitor, because he had had the men executed who killed his predecessor. He was told to liberate all Nazi prisoners, including some who had helped to kill Dollfuss, and had plotted against his life, to give the Austrian Nazis political liberty and to hand-over the Austrian police to a nominee of Hitler, Arthur von Seyss Inquart.' याव्यतिरिक्त ऑस्ट्रियाच्या मुख्य सेनापतीला काढून टाकणें आणि ऑस्ट्रियन युद्धखात्यानें जर्मन युद्धखात्याशीं पूर्ण सहकार्य करणें या इतर अटी होत्या. या साऱ्या अटी डॉ. शूश्निग यांनीं लगेच मान्य केल्या नाहींत. पण व्हिएन्ना येथें आपल्या अध्यक्षाशीं वाटाघाटी करून मग मान्य केल्या.

## इंग्लंडचा नकार

या वाटाघाटींची वार्ता पारिसला कळल्यावर फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यांनीं इंग्लंडकडे पुढील आशयाची मागणी केली. 'England was asked to join in a declaration that she and France would not tolerate any more accomplished facts in Central Europe, and further encroachment on Austrian sovereignty.' असला संदेश जर्मनीकडे पाठविण्याला मि. ईडन अनुकूल होते. पण त्याच वेळीं इटालियन वकिलाच्या कारस्थानामुळें त्यांना पदच्युत व्हावें लागलें आणि त्यांच्या जागीं नुकतेच जर्मनीला जाऊन तेथील राज्यकर्त्यांना कांहीं गुप्त आश्वासनें देऊन आलेले लॉर्ड हॅलिफाक्स आले. त्यांचा उपदेश ऐकून मि. चेंबरलेन यांनीं फेब्रुवारीच्या अंतीं पार्लमेंटांत असें निवेदन केलें कीं, जर्मनी आणि ऑस्ट्रिया यांच्या नेत्यांच्या भेटीनें कोणत्याहि संधीचा भंग झाला आहे किंवा ब्रिटिश सरकारानें त्यांच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याजोगी परिस्थिति उत्पन्न झाली आहे, असें मला वाटत नाहीं.

## सार्वत्रिक मतदानांतील धोका

मि. चेंबरलेन यांच्या निवेदनानें डॉ. शूश्निग यांची पराकाष्ठेची निराशा झाली. ऑस्ट्रियाचें स्वातंत्र्य टिकविण्याकरितां इंग्लंड आणि फ्रान्स हीं राष्ट्रें कांहीं तरी प्रयत्न केल्यावांचून राहणार नाहींत, अशी त्यांना फार आशा होती. हा आशा-तंतु तुटल्यावर ऑस्ट्रियाच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नावर जनतेचीं मतें घेण्याचा त्यांनीं संकल्प केला. अधिकार हातीं असलेल्यांना जनतेला आपल्या बाजूनें मतें द्याव-याला लावणें पुष्कळदां शक्य होतें. पण या बाबतींत ऑस्ट्रियांतील परिस्थिति अतिशय चमत्कारिक होती. १९३६ मध्येंच जनमत घेण्याचे परिणाम काय होतील, याचें एका ऑस्ट्रियन तज्ज्ञानें पुढीलप्रमाणें वर्णन केलें होतें. 'The foreign opinion would be doing Austria the worst possible disservice and playing straight into the hands of Nazi terrorists if it were to agitate for a plebiscite as a natural solution. If a plebiscite were physically possible on an agreed question—

naire it would doubtless be an ideal solution; but with the memory of those years of terror and in view of the unlimited resources of propaganda which would undoubtedly be forthcoming it would be a most dangerous weapon leading to wholesale intimidation and distortion of opinion.' लोकशाहीचें आदर्श स्वरूप जें अखिल जनतेचें मत, तें कितपत विश्वसनीय असतें, हें या भेदक वर्णनावरून कोणालाहि कळून येईल. लोकशाही राष्ट्रें आणि हुकूमशाही राष्ट्रें असले शब्दप्रयोग वापरण्यापूर्वी या अभिप्रायाची लेखकांना आठवण राहिली तर प्रचलित राजकीय वाङ्मयांतील कांहीं भ्रम कमी होतील. या तज्ज्ञानें आधींच भाकित करून ठेवल्याप्रमाणें डॉ. शूश्निग यांची अखिल जनतेनीं मतें घेण्याची घोषणा प्रसिद्ध होतांच ऑस्ट्रियांत एकदम यादवीयुद्धाला अनुकूल अशी परिस्थिति निर्माण झाली आणि देशभर हिटलेर आणि शूश्निग यांच्या अनुयायांच्या मारामाऱ्या चालू झाल्या.

## निर्वाणीचा संदेश

डॉ. शूश्निग यांनीं जनतेचीं मतें घेण्याची घोषणा केल्यावर ऑस्ट्रियन साम्राज्याचे वारस जे हेर हिटलेर त्यांना क्षणभर घोटाळ्यांत पडल्यासारखें झालें. प्रथम त्यांनीं सार्वत्रिक मतदान तात्पुरतें स्थगित करण्याची शूश्निगकडे मागणी केली. पण ही मागणी त्यांचे परराष्ट्रमंत्री हेर फोन रिब्बेनट्रोप यांना अपुरी वाटल्यामुळें मागाहून दुसरा निर्वाणीचा संदेश पाठवून डॉ. शूश्निग यांनीं आपला अधिकार डॉ. साइस इन्क्वार्ट यांच्या स्वाधीन करण्याची हेर हिटलेर यांनीं मागणी केली. या मागणीप्रमाणें डॉ. साइस इन्क्वार्ट यांच्या हातीं अधिकार येतांच त्यांनीं हेर हिटलेर यांना आपल्या साहाय्याकरितां ससैन्य पाचारण केलें आणि याप्रमाणें पारीसच्या संधीचा भंग करून जर्मनीचें राष्ट्रैक्य घडवून आणलें.

## जर्मनीच्या मानखंडनेचा संकल्प

ऑस्ट्रिया आत्मसात् करण्यानें जर्मनीचें राष्ट्रैक्य प्रस्थापित झालें तरी सर्व जर्मन लोकांना दास्यमुक्त करण्याचें महत्कार्य अजून शिल्लकच राहिलें होतें.

२०-२-१९३८ या दिवशीं राइश्टागपुढें केलेल्या भाषणांत हेर हिटलेर यांनीं अशी घोषणा केली होती कीं, जर्मनीला लागून असलेल्या देशांतून एक कोटि जर्मन लोक रहात असून त्यांना स्वयंनिर्णयाचा अधिकार प्राप्त झालेला नाहीं. या एक कोटि जर्मनांपैकीं ऑस्ट्रियांतील पासष्ट लक्षांना स्वयंनिर्णयाचा अधिकार मिळवून दिल्यानंतर झेकोस्लोव्हाकियांतील पस्तीस लक्ष जर्मनांनाहि तोच अधिकार मिळवून देण्याकडे जर्मनीच्या नेत्यांनीं आपलें लक्ष्य वळविलें. याच वेळीं जर्मनीनें ऑस्ट्रिया देश पचविल्यामुळें भयभीत झालेल्या अँग्लोफ्रेंचांनीं जर्मनीची एकवार प्रकटपणें मानखंडना करून आपल्या जनतेला धीर देण्याचा संकल्प केला होता. हा त्यांचा संकल्प कसा तडीस गेला आणि त्यामुळें झेकोस्लोव्हाकियाच्या प्रश्नाला कसें वेगळेंच वळण लागलें, याची माहिती आतां सांगितली पाहिजे.

## बाराला पांच मिनिटें

जगांतील कोणतेंहि राष्ट्र परराष्ट्रावर सत्ता चालविण्याला अपात्र असतें, हें तत्त्व सर्वांना माहीत असल्यानें पहिल्या महायुद्धानंतर झेकोस्लोव्हाकियाचें राष्ट्र अस्तित्वांत आल्यानंतर झेक लोकांनीं आपल्या देशांतील ३५ लक्ष जर्मन लोकांना कसें वागविलें, याचें सविस्तर वर्णन करायला नको. त्या जर्मनांचे मूळ जर्मनींतील वंशबंधु जोंपर्यंत दुर्बल होते तोंपर्यंत त्यांना आपल्यावर होणाऱ्या अन्यायांचा फारसा प्रतिकार करतां आला नाहीं. पण जर्मनींत नाझी राज्य प्रस्थापित झाल्यापासून जर्मनीचें सामर्थ्य जसें वाढूं लागलें, तसें झेकोस्लोव्हाकियांतील जर्मनहि संघटित होऊं लागले. वास्तविक पाहतां त्या लहानशा देशांत ७५ लक्ष झेक, ३५ लक्ष जर्मन, २३ लक्ष स्लोव्हाक, ७ लक्ष हंगेरियन, ५॥ लाख रुमानियन आणि इतर वंशांचे कांहीं लक्ष मिळून एकंदर दीड कोटीची वस्ती होती. तेव्हां झेक लोकांच्या खालोखाल तेथील जर्मनांना राज्यकाभारांत भाग मिळणें अवश्य होतें. पण झेक लोकांनीं बहुतेक सर्व सत्ता आपल्या हातांत ठेवून इतर वंशांच्या लोकांना आपल्या दासांप्रमाणें वागविण्याचें धोरण व्यवहारांत आणलें होतें. जर्मन जनतेचें म्हणणें इतकेंच होतें कीं, स्विट्झर्लंडच्या आदर्शाप्रमाणें आपली राज्यघटना करून सर्व वंशांना सारख्या सवलती द्याव्या आणि आंतरराष्ट्रीय राजकारणांत तटस्थ रहावें. पण ही मागणी जर्मनीचें शत्रुत्व कर-

ण्याकरितांच अस्तित्वांत आणलेल्या राष्ट्राला कशी रुचणार? ऑस्ट्रिया जर्मनींत समाविष्ट झाल्यानंतर झेक पार्लमेंटांतील जर्मन सभासदांनीं हीच मागणी पुन्हा एकवार केली आणि त्या सरकाराला अशी धोक्याची सूचना दिली कीं, बारा वाजायला आतां पांचच मिनिटें उरलीं आहेत, तेव्हां निर्वाणीची वेळ येण्यापूर्वी तडजोड करणें हितावह होईल.

## जर्मनीला अकारण आव्हान

पण या सूचनेकडे लक्ष्य देण्याऐवजीं झेक सरकारानें अँग्लोफ्रेंच सरकारां-बरोबर दुसरेंच कारस्थान चालविलें होतें. तें कारस्थान असें होतें कीं, ऑस्ट्रिया-प्रमाणेंच झेकोस्लोव्हाकियांत घुसण्याची जर्मन सैन्याची सिद्धता झाली असल्याचा बोभाटा झेकोस्लोव्हाकियानें करावा आणि लगेच इंग्लंड, फ्रान्स, पोलंड आणि रशिया या सर्वांनीं जर्मनीला अशी धमकी द्यावी कीं झेकोस्लोव्हाकियांत जर्मन सैन्यें घुसल्यास आमचीं सैन्यें जर्मनीवर लगेच चालून येतील. १९३८ मधील एप्रिलच्या अंतीं फ्रान्सचे मुख्य प्रधान इंग्लंडला गेले असतां तिथेंच या कारस्थानाची रूपरेषा निश्चित झाली, हें रहस्य पुढें लंडन टाइम्सनें स्वतःच प्रकट केलें. या कारस्थानाची हेर हिटलेर यांना थोडीबहुत माहिती असल्यानें मे महिन्याच्या प्रारंभीं ते मुस्सोलिनींना परत भेट देण्याकरितां इटालीला गेले असतां या सर्व राष्ट्रांविरुद्ध आपल्याला इटालीचा पाठिंबा मिळेल कीं नाहीं याची त्यांनीं चांचपणी केली. पण तत्पूर्वी इंग्लंड आणि इटाली यांचा नुकताच एक संधि झाला असल्यानें जर्मनीला इटालीचेंहि पाठबळ मिळण्याचा रंग दिसेना. हेर हिटलेर हे इटालीहून हात हलवीत परत आल्याची विश्वसनीय वार्ता सर्व राजधान्यांना कळतांच फ्रान्सचे सेनापति जनरल गामेलँ यांनीं रशियाच्या युद्ध-मंत्र्यांना आपलें वैमानिक दल पोलंडच्या सीमेवर एकत्रित करण्याची सूचना दिली. झेकोस्लोव्हाकियाच्या प्रश्नावर जर्मनीशीं युद्ध उपस्थित झाल्यास फ्रान्सला साहाय्य करण्याचें आश्वासन पोलंडच्या परराष्ट्रमंत्र्यांकडून फ्रान्सच्या परराष्ट्र-मंत्र्यांनीं घेतलें. अशी सर्व सिद्धता झाल्यावर २१ मेच्या सुमाराला झेक सरकारानें आपल्यावर अकस्मात् आक्रमण करण्याकरितां जर्मन सैन्याची हालचाल चालू झाल्याचा बोभाटा करून आपलें सर्व सैन्य एकत्रित केलें. त्याबरोबर इंग्लंड, फ्रान्स, रशिया, पोलंड, इत्यादि देशांच्या सरकारांनीं ठरल्याप्रमाणें झेको-

स्लोव्हाकियाला स्पर्श केल्यास लगेच जर्मनीवर हल्ला करण्याची धमकी दिली. वसंत ऋतूंत युरोपांतील साऱ्याच देशांचीं सैन्यें हिवाळ्यांतील बराकी सोडून उन्हाळ्याच्या बराकींकडे जात असतात. तीच काय ती तेव्हां जर्मन सैन्याची हालचाल चालू होती. या हालचालींची सारी माहिती जर्मन सरकारानें झेक सरकाराला आधींच कळविली होती, ही गोष्टहि त्या सरकारानें पुढें आपण होऊनच प्रसिद्ध केली. त्यावरून तेव्हां झेकोस्लोव्हाकियाला कितपत धोका होता, हें कोणालाहि कळून येईल. पण त्या वेळीं जर्मन सैन्यानें झेक प्रदेशांत प्रवेश केला नाहीं, हें पाहून जर्मनी झेकोस्लोव्हाकियाला भ्याला अशी एकच कोल्हेकुई अँग्लोफ्रेंच पत्रांनीं आरंभिली. ज्यांनीं मुळीं समजून उमजूनच असत्य प्रचार आरंभिला होता, त्यांना वस्तुस्थिति सांगून तरी काय उपयोग ? यामुळें या प्रकरणांत झालेला अकारण अपमान जर्मनीला मुकाट्यानें सहन करावा लागला. मात्र त्यामुळें झेकोस्लोव्हाकियाचे अध्यक्ष डॉ. बेनेश यांच्याविषयीं हेर हिटलेर यांना पराकाष्ठेचा द्वेष वाटूं लागला आणि त्यांनीं बेनेशचा शक्य तितक्या लौकर कांटा काढण्याचा निश्चय केला.

## प्रतिशोधाची सिद्धता

या वेळीं ज्या साऱ्या राष्ट्रांनीं मिळून जर्मनीवर चालून येण्याची धमकी दिली होती, त्यांची रशिया वगळल्यास युद्धाची सिद्धता कांहींच नव्हती. जर्मन सैन्यें खरोखरींच झेकोस्लोव्हाकियाच्या स्वारीसाठीं सिद्ध झालेलीं असतीं तर जर्मनीला तसली धमकी देण्याचें त्यांना साहसहि झालें नसतें. पण कोणत्याहि परिस्थितींत कां होईना, अपमान गिळून स्वस्थ राहण्याचा जर्मनीचा स्वभाव नसल्यानें हेर हिटलेर यांनीं झेकोस्लोव्हाकियांतील जर्मन जनतेला दास्यमुक्त करतांना, धमकी देणाऱ्या साऱ्या राष्ट्रांनीं स्वारी केली तरी त्यांचा समाचार घेण्याची सिद्धता आरंभिली. या सिद्धतेचा पहिला भाग म्हणजे फ्रान्स आणि जर्मनी यांच्या सीमेवरील सीगफ्रीड व्यूहाची बांधणी होय. हा प्रचंड व्यूह जर्मनीनें सरासरी सहा महिन्यांत बांधून काढला. उलटपक्षीं फ्रान्सची माजिनो तटबंदी बांधण्याचें काम कित्येक वर्षे चाललें होतें, यावरून १९३८ मध्यें जर्मनीला किती परिश्रम करावे लागले असतील याची कल्पना येईल. सीगफ्रीडव्यूह सहा महिन्यांत पुरा करण्याकरितां जर्मनींतील कोणाहि व्यक्तीला राष्ट्रीय महत्त्वाच्या कार्या-

करितां वेठीला धरण्याचा अधिकार सरकाराला आपल्याकडे घ्यावा लागला. व्यक्तींच्या देहाप्रमाणेंच त्यांची संपत्तिहि राबविण्याचा अधिकार जर्मन सरकारनें घेतला होता. ऑस्ट्रिया देश जर्मनींत समाविष्ट झाल्यावर तेथील गंगाजळीमध्यें जर्मनीला सात कोटि पौंडांचें सोनें सांपडलें होतें, त्याचा सदुपयोग करून त्यानें गहू, मका, पेट्रोल, लाकडाचा रांधा इत्यादि वस्तूंची प्रचंड खरेदी केली. त्याचप्रमाणें नेहमींच्या लटक्या लढायांच्या निमित्तानें २'५ लक्षांहून अधिक सैन्य छावणींतून एकत्र केलें.

## रन्सिमनशिष्टाई

एकीकडे ही सिद्धता चालू असतांनाच जर्मनीचे लंडन येथील वकील हेर फोन डिर्क्सेन यांनीं २२ जुलैला चेंबरलेन यांची भेट घेऊन अशी मागणी केली कीं, झेकोस्लोव्हाकियांतील जर्मनांचा प्रश्न कसा सोडवावा, हें ठरविण्याकरितां इंग्लंड, फ्रान्स, इटाली आणि जर्मनी यांची एक परिषद भरवावी आणि या परिषदेंत तो प्रश्न कसा सोडवावा यासंबंधीं तात्त्विक मतैक्य झालें म्हणजे त्या तत्त्वाला अनुसरून पुढील व्यवस्था कशी करावी, हें झेकोस्लोव्हाकियाच्या प्रतिनिधींशीं चर्चा करून निश्चित करावें. हा वाद संपल्यावर वरील चार राष्ट्रांनीं आपापल्यांतील इतर सर्व वाद मिटवून संधि करावा. या साऱ्या मागण्यांना चेंबरलेननीं तेव्हां नकार दिला. तरीसुद्धां त्यांनीं आपले एक विश्वासू मंत्रि लॉर्ड रन्सिमन यांना झेकोस्लोव्हाकियाला जाऊन जर्मनी आणि झेकोस्लोव्हाकिया यांची कोणत्या तत्त्वावर तडजोड होऊं शकेल याविषयीं आपल्याकडे एक अधिकृत प्रतिवृत्त पाठविण्याला सांगितलें.

## रन्सिमनला परत बोलवा

याच वेळीं जर्मनीच्या सामरिक सिद्धतेचें विशाल स्वरूप अधिकाधिक व्यक्त व्हावयाला लागलें होतें. त्यामुळें ब्रिटिश सरकाराला स्वतःच्या सुरक्षिततेविषयीं अधिकाधिक चिंता वाटूं लागली होती. तेव्हां ब्रिटनची सामरिक सिद्धता किती अपुरी होती, याचें सविस्तर वर्णन करण्याची आतां कांहींच आवश्यकता नाहीं. कारण या महायुद्धाच्या पहिल्या तीन वर्षांत इंग्लंडची झालेली दैना सर्वांना अद्यापि स्मरत असेल. असो, १९३८ च्या ऑगस्टमध्यें ब्रिटिश सरकारानें




जर्मनी १९३९ (पृ. ४९)

आपल्या वकिलाकडून जर्मनीला असें कळविलें कीं, जर्मनीच्या लटक्या लढा. यांचा युरोपांतील परिस्थितीवर अतिशय वाईट परिणाम होत आहे. याकरितां कदाचित् झेक सरकाराला आपलें सर्व सैन्य एकत्रित करण्याची आज्ञा द्यावी लागेल आणि तशी आज्ञा दिल्यास लॉर्ड रन्सिमन यांची शिष्टाई विफल होईल. या सूचनेला हेर फोन रिब्बेनट्रोप यांनीं उत्तर दिलें की, जर्मनीच्या लटक्या लढायांची नसती चौकशी करण्याचा इंग्लंडला कोणताहि अधिकार नाहीं आणि त्यांचें निमित्त करून लॉर्ड रन्सिमनना परत बोलावण्याचा आपला विचार असल्यास त्या विचाराचें जर्मनी अभिनंदनच करील, कारण रन्सिमन-शिष्टाईपासून झेक सरकाराचा हटवादीपणा अधिकच वाढत चालला आहे.

## झेक सरकाराच्या शेवटच्या सवलती

लॉर्ड रन्सिमन हे आपल्या शिष्टाईच्या प्रारंभीं तरी झेक सरकाराचा पाठपुरावा करीत होते. या दिवसांत झेकोस्लोव्हाकियांतील जर्मन नेत्यांना जर्मनीहून वारंवार अशा सूचना येत कीं, तुमच्या आठ मागण्या झेक सरकार मान्य करीत नसल्याच्या निमित्तानें तत्काळ समेटाची बोलणीं बंद करा. हीं बोलणीं चालू रहावीत याकरितां लॉर्ड रन्सिमन यांनीं सप्टेंबरच्या प्रारंभीं हेर हिटलेर यांना पत्र लिहून असें कळविलें कीं, झेक सरकारानें देऊं केलेल्या सवलती पुरेशा आहेत, तर आतां त्या अटींवर समेट करण्याची अनुज्ञा झेकोस्लोव्हाकियांतील जर्मनांना द्या. हे पत्र पाहूनसुद्धां हेर हिटलेर यांनीं समेटाची बोलणीं थांबविण्याचीच आज्ञा दिली. तेव्हां ब्रिटिश सरकारानें झेक सरकाराला त्याहून उदार सवलती देण्याची सूचना केली. इंग्लंडच्या सूचनेप्रमाणें झेक सरकारानें आपल्या जर्मन प्रजेला शेवटच्या उदार सवलती देऊं करून त्या प्रसिद्धहि केल्या. पण त्याच वेळीं हें उदार धोरण मान्य नसलेल्या झेक अधिकाऱ्यांनीं जर्मन प्रजेवर कांहीं अत्याचारहि केले. त्यामुळें त्या सवलतींचा समेटाच्या बोलण्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं.

## झेकोस्लोव्हाकियाचा अंत

याच वेळीं लंडन 'टाइम्स'च्या संपादकांनीं एक अग्रलेख लिहून झेकोस्लोव्हाकियांतील जर्मन वस्तीचा प्रांत जर्मनीला देऊन टाकण्याची सूचना केली.

ही सूचना प्रसिद्ध झाल्यावर पांच दिवसांनीं हेर हिटलेर यांनीं नाझी पक्षाच्या संमेलनापुढें भाषण करून त्यांत जर्मनांच्या वतीनें स्वयंनिर्णयाची मागणी केली. याप्रमाणें जर्मन सरकाराचा आपल्याला प्रकट पाठिंबा मिळाल्यामुळें झेकोस्लोव्हाकियांतील जर्मनांनीं सर्वत्र मिरवणुकी काढून आपला आनंद व्यक्त करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां झेक अधिकाऱ्यांनीं या मिरवणुकींना अडविण्याचा प्रयत्न केल्यामुळें सर्वत्र मारामाऱ्या चालू झाल्या आणि त्यांचें पर्यवसान मार्शल लॉ पुकारण्यांत झालें. झेक लोकांचा मार्शल लॉ इतका भयंकर होता कीं, त्याच्या निर्बंधाप्रमाणें अपराध्याला देहांत प्रायश्चित्तावांचून दुसरें प्रायश्चित्तच नव्हतें आणि त्याची बजावणीसुद्धां शिक्षा सांगितल्यापासून तीन तासांच्या आंत व्हावयाची होती. हा निर्बंध लगेच परत घेण्याची जर्मनीनें मागणी केली. पण ती झेक सरकारानें नाकारली. तेव्हां जर्मनीनें झेक सरकाराला कळविलें कीं, त्या निर्बंधाप्रमाणें जितके जर्मन मारले जातील, तितके झेक लोक आम्ही लगेच फासावर चढवूं. इतकी आणीबाणीची परिस्थिति आलेली पाहून इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. चेंबरलेन यांनीं स्वतःच हेर हिटलेर यांची भेट घेऊन तडजोडीचा शेवटचा प्रयत्न करावयाचें ठरविलें. त्याप्रमाणें १५ सप्टेंबरला मि. चेंबरलेन यांनीं बेर्क्टेसगाडेन येथें हेर हिटलेर यांची पहिली भेट घेतली. यानंतरच्या भेटीगांठींचें आणि कारस्थानांचें सविस्तर वर्णन करण्याची या संक्षिप्त इतिहासांत कांहीं आवश्यकता नाहीं. इथें इतकेंच सांगितलें म्हणजे पुरे कीं, यापूर्वी जर्मनीनें सूचना केल्याप्रमाणें सप्टेंबरच्या अंतीं इंग्लंड, इटाली, फ्रान्स आणि जर्मनी या चार राष्ट्रांची म्यूनिच येथें परिषद होऊन झेकोस्लोव्हाकियांतील सलग जर्मन वस्तीचा प्रदेश जर्मनीला मिळाला. या प्रकरणाच्या पाठोपाठच हंगारी आणि पोलंड यांनींहि आपापल्या वंशाच्या वस्तीचे प्रांत झेकोस्लोव्हाकियाला ओकावयाला लावले आणि त्यामुळें तें राज्य इतकें दुबळें झालें कीं, १९३९ च्या मार्चमध्यें आपल्या देशांतील अंतर्गत यादवीहि थांबवितां न आल्यानें त्याला जर्मन सैन्य आपल्या घरांत घ्यावें लागलें.

: ६ :

# युरोपांतील राजकारणांत अमेरिकेचा हस्तक्षेप

झेकोस्लोव्हाकियानें १९३९ च्या मार्च महिन्यांत जर्मनीच्या मांडलिकाचें पद पतकरण्यापूर्वीच अमेरिकेचे प्रे. रूझव्हेल्ट यांनीं युरोपांतील राजकारणांत हस्तक्षेप करण्याला प्रारंभ केला होता. मि. चेंबरलेन यांनीं अमेरिकेच्या मध्यस्थीची वाट न पाहतां परस्पर म्यूनिचला जाऊन हेर हिटलेर यांच्याशीं समेट केला, यामुळें जर कोणाला मरणप्राय खेद वाटला असेल तर तो अमेरिकेच्या अध्यक्षांनाच होय. या प्रकरणाची माहिती सांगण्यापूर्वी प्रे. रूझव्हेल्ट यांच्या राजकारणाची परंपरा आपल्याला समजून घेणें आवश्यक आहे.

## प्रे. विल्सनची परंपरा

प्रे. रूझव्हेल्ट यांना प्रथमपासूनच युरोपांतील राजकारणांत हस्तक्षेप करण्याची इच्छा होती. पहिल्या महायुद्धांत भाग घेणाऱ्या प्रे. विल्सनच्या परंपरेंतच ते वाढले असल्यानें त्यांना तशी इच्छा असणें स्वाभाविकहि होतें. उलटपक्षीं अमेरिकेंतील सर्वसाधारण जनमताला युरोपांतील भानगडींत डोकें घालावेंसें वाटत नसल्यामुळें अमेरिकन जनतेनें जागतिक राजकारणांत ढवळाढवळ करूं पाहणाऱ्या प्रे. विल्सनच्या पक्षाला बारा वर्षे अध्यक्षपदापासून दूर ठेविलें होतें. या अवधींत सुद्धां युरोपचें आर्थिक अधिराज्य अमेरिकेच्याच हातांत होतें. कारण पहिल्या महायुद्धांतलि आपल्या सहकाऱ्यांना अमेरिकेनें अतिशय मोठीं कर्जें दिलीं होतीं आणि युद्धसमाप्तीनंतर जर्मनीवर लादलेली युद्धखंडणी त्या देशाला फेडतां यावी याकरितां पूर्वीच्या शत्रूंनाहि कर्जें देण्याला अमेरिकन धनिकच पुढें आले होते. या आर्थिक मिंधेपणामुळें पहिल्या महायुद्धाच्या अंतापासून तों जर्मनींत नाझी पक्षाचें सरकार अस्तित्वांत येईपर्यंत पश्चिम युरोपांत अमेरिकेच्या अनुमतीवांचून आणि सहकार्यावांचून कोणतीहि महत्त्वाची घटना घडूं शकत नव्हती. पण पुढें १९३१ मध्यें आर्थिक मंदीमुळें पश्चिम युरोपाची अंतस्थिति इतकी बिघडून गेली कीं, एक वर्षभर सारीच आंतरराष्ट्रीय कर्जफेड

स्थगित करण्याची सूचना अमेरिकेला करावी लागली. आंतरराष्ट्रीय ऋणकऱ्यांना एकवार इतकी सवलत मिळाल्यानंतर त्यांनीं आपल्याच अधिकारांत सारीं कर्जे पुढच्या वर्षी सपशेल रद्द करून टाकलीं हें सांगायला नकोच. या घटनेनंतर अमेरिकेला युरोपांतील राजकारणांत हस्तक्षेप करण्याला निमित्तहि उरलें नव्हतें. पण प्रे. विल्सनच्या राजवटींत एकवार अमेरिकेकडे साऱ्या जगाचें नेतृत्व आलें असल्यानें तें नेतृत्व पुनश्च प्राप्त करून घेण्याची महत्त्वाकांक्षा प्रे. रूझव्हेल्ट यांनीं बाळगिली असल्यास त्यांत नवल काय?

## अध्यक्षपदासाठीं युरोपांत हस्तक्षेप

प्रे. रूझव्हेल्ट यांना प्रे. विल्सनप्रमाणें जगाचें नेतृत्व मिळविण्याची महत्त्वाकांक्षा होतीच. पण त्याच वेळीं पृथ्वीचें पुढारीपण मिळविण्याच्या नादांत प्रे. विल्सन यांनीं अमेरिकेचें पुढारीपण हातचें कसें घालविलें, याचा समग्र इतिहासहि त्यांच्या डोळ्यांपुढें होता. यामुळें युरोपच्या राजकारणांत उघडपणें हस्तक्षेप करण्यापूर्वी ते अनुकूल संधीची वाट पहात होते. ही अनुकूल संधि झेकोस्लोव्हाकियाच्या प्रकरणांत आपल्याला लाभेल, अशी त्यांना आशा वाटत होती आणि आपल्या पक्षाच्या राजकारणाच्या दृष्टीनें त्यांना तिची आवश्यकताहि जाणवूं लागली होती. कारण प्रे. रूझव्हेल्ट हे यापूर्वीच दोन वेळा अध्यक्षपदारूढ झाले होते आणि यापुढें जगाचें लक्ष्य वेधून घेण्याजोगें एखादें महत्कार्य त्यांच्या हातून घडलें तरच त्यांना तिसऱ्यांदा अध्यक्षपदाकरितां उभें राहण्याची संधि मिळणें शक्य होतें.

## उशिरा केलेला समेटाचा प्रयत्न

१९३८ च्या सप्टेंबरमध्यें झेकोस्लोव्हाकियाचें राजकारण जसें रंगांत येऊं लागलें, तशी प्रे. रूझव्हेट यांच्या जिवाची घालमेल होऊं लागली. कारण असल्या राजकारणांत अवेळीं हस्तक्षेप केला तर अपरिहार्य झालेलें युद्ध टाळण्याचें श्रेय मिळत नाहीं आणि उशिरानें हस्तक्षेप केला तर युद्ध टाळणें अशक्य होतें. पहिल्या महायुद्धाच्या प्रारंभीं अगदीं शेवटच्या क्षणीं मध्यस्थी करण्याचा प्रयत्न प्रे. विल्सननीं केला होता, पण तो अगदींच अकालीं झाला. तें उदाहरण लक्ष्यांत असल्यामुळें प्रे. रूझव्हेल्ट हे झेकोस्लोव्हाकियाच्या राजकारणांत हात

घालण्यासाठीं योग्य क्षणाची वाट पहात होते. तसा क्षण २७ सप्टेंबरला आला आहे, असें त्यांना वाटलें आणि त्या दिवशीं त्यांनीं सि. मुस्सोलिनी यांना एक वैयक्तिक संदेश पाठवून जर्मनीकडे मध्यस्थी करून युद्ध टाळण्याची त्यांना कळकळीची विनंति केली. त्याच दिवशीं अमेरिकेच्या अध्यक्षांनीं जर्मनीच्या नेत्यांनाहि एक संदेश पाठवून युद्ध उपस्थित झाल्यास त्याचें दायित्व जर्मन राष्ट्राच्याच शिरावर लादलें जाईल अशी धमकी दिली. या संदेशाला हेर हिटलेर यांनी उत्तरच दिलें नाहीं. सि. मुस्सोलिनींना गेलेल्या संदेशाला प्रत्युत्तर देण्याचा विचार करावयालाहि त्यांना सवड झाली नसावी. कारण अमेरिकेच्या अध्यक्षांचा संदेश येण्यापूर्वीच मि. चेंबरलेन यांच्या निकडीच्या विनंतीवरून त्यांनीं जर्मनीकडे मध्यस्थी केली होती आणि त्यांच्या मध्यस्थीला यश येऊन म्यूनिच येथें समेटाची परिषद भरण्याचें ठरलेंहि होतें. म्यूनिचला भरणारी परिषद प्रे. रूझव्हेल्टनीं सुचविलेल्या परिषदेपेक्षां अगदीं भिन्न होती. कारण त्या परिषदेंत रशिया, झेकोस्लोव्हाकिया, हंगारी, पोलंड इत्यादींनाहि स्थान मिळावें, अशी अमेरिकेच्या अध्यक्षांची इच्छा होती. असो, या साऱ्या भानगडी अमेरिकेंतलि सामान्य जनतेला माहीत नसल्यामुळें आपल्या अध्यक्षांनीं विनंति केल्याबरोबर दुसऱ्या दिवशीं शांततापरिषद भरण्याचें निश्चित झालेलें पाहून अमेरिकेंतलि उभय पक्षांच्या पुढाऱ्यांनीं प्रे. रूझव्हेल्ट यांच्यावर अभिनंदनांचा वर्षाव केला. पण दुसऱ्याच दिवशीं सारी वस्तुस्थिति अमेरिकेंतील वृत्तपत्रांनीं उघडकीस आणली, तेव्हां असें दिसून आलें कीं, हेर हिटलेर यांचीं म्यूनिच परिषदेचीं निमंत्रणें धाडलीं, त्या वेळीं त्यांना प्रे. रूझव्हेल्ट यांचा संदेश पोंचलाहि नव्हता. ही परिस्थिति कळल्यानंतर प्रे. रूझव्हेल्ट आणि त्यांचे पक्षपाती यांच्या मुद्रा काळ्या ठिक्कर पडल्या आणि अशा लांछनास्पद रीतीनें जगाच्या रंगभूमीवर जागतिक शांततेचा प्रस्थापक या नात्यानें प्रवेश करण्याचा प्रे. रूझव्हेल्ट यांचा पहिला प्रयत्न फसला. हा सारा इतिहास यापुढें प्रसिद्ध होणाऱ्या अमेरिकन पुस्तकांतून गाळला जाईलच. पण तत्कालीन वृत्तपत्रांनीं ही सारी माहिती अतिशय प्रामाणिकपणानें नोंदून ठेविली आहे. या प्रसंगीं मि. चेंबरलेन यांनीं सि. मुस्सोलिनी यांच्याकडे मध्यस्थीची याचना केली, याचा प्रे. रूझव्हेल्ट यांना पराकाष्टेचा राग आला. मुस्सोलिनींच्या मध्यस्थीचे पश्चात्परिणाम पाहिले म्हणजे त्यांचा संताप अनाठायीं नव्हता, हें मान्य करावें लागतें.

## मुस्सोलिनींची महत्त्वाकांक्षा

म्यूनिच येथील समेटानंतर इटालीच्या नेत्यांना असें वाटूं लागलें कीं, झेक प्रकरणामुळें युरोपावर येऊं पहात असलेलें महायुद्धाचें अरिष्ट आम्हीं टाळलें, तेव्हां त्याचें पारितोषिक आम्हांला मिळायला पाहिजे. २७-११-३८ या दिवशीं मुस्सोलिनींनीं आपल्या एका वरिष्ठ सेनापतीशीं बोलतांना असे उद्गार काढले कीं, **At Munich I have saved England and France from war. They ought to pay for it. If they do not wish to pay, I will pay myself.** सि. मुस्सोलिनींना कोणता प्रदेश हवा होता, याचा इथें उलगडा केला पाहिजे. स्वातंत्र्ययुद्धांत इटालीला साहाय्य करण्याच्या विनिमयांत फ्रान्सनें नीस आणि सॅव्हॉय हे इटालीचे प्रांत फ्रान्सला जोडले होते. त्याव्यतिरिक्त इटालीचें कॉर्सिका बेट आणि आफ्रिकेंतील इटालियन वस्ती बरीच असलेला ट्यूनिसचा प्रांत हेहि फ्रान्सच्या ताब्यांत होते. हे सारे प्रदेश इटालीला हवे होते. इंग्लंडकडूनहि आफ्रिकेंतील एखादा उपनिवेश मिळाला तर हवा होता. पण तो कांहीं महत्त्वाचा प्रश्न नव्हता.

## फ्रेंचांकडे प्रदेशाची मागणी

या साऱ्या प्रदेशांची मागणी करण्याला सि. मुस्सोलिनींनीं दिवसहि मोठा सोयीचा निवडला होता. ३० नोव्हेंबरला फ्रान्समध्यें मार्क्सपंथी गटांनीं सार्वत्रिक संप घडवून आणण्याचें ठरविलें होतें. हा संप यशस्वी होईल अशा अपेक्षेनें त्याच दिवशीं आपल्या मागण्यांची घोषणा करण्याचें सि. मुस्सोलिनींनीं योजलें होतें. ठरल्याप्रमाणें त्या दिवशीं इटालीच्या विधिमंडळांत काउंट चियानो हे स्वदेशाच्या नैसर्गिक आकांक्षांविषयीं बोलत असतांना साऱ्या सभासदांनीं उठून 'दूचे, तूनिसिया, कोर्सिका' असा घोष आरंभिला. त्याबरोबर प्रेक्षकांनींहि नीस, सॅव्हॉय, जीबुती या नांवांची त्यांत भर टाकून आपणहि ओरडण्याला आरंभ केला. या प्रकरणामुळें फ्रान्सपेक्षाहि इंग्लंडमध्यें अधिक खळबळ उडाली. पण तेवढ्यामुळें चेंबरलेन यांची रोमयात्रा रहित करण्याचें कारण नाहीं, असा ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं निर्णय ठरविला. या निर्णयामुळें तर इटालियन लोकांच्या आशेला फुलें येऊं लागलीं. या वेळीं एका इटालियन पत्रानें लिहिलें होतें कीं,

सध्या फ्रान्सचें सारें राजकारण इंग्लंडच्या सांगण्याप्रमाणें चालत असतें आणि इंग्लंडला अद्यापि शांतता हवी आहे. तेव्हां शांतता राखण्याकरितां इंग्लंडनें फ्रान्सला शरण जाण्याचा उपदेश केला तर फ्रान्सला तो उपदेश ऐकणेंच भाग आहे. याच भरवंशावर ७ डिसेंबरला इटालीच्या परराष्ट्रीय मंत्र्यांनीं १९३५च्या प्रारंभीं लाव्हाल आणि मुस्सोलिनी यांच्यामध्यें झालेला समेट इतःपर रद्द समजावा आणि नवी तडजोड कोणत्या अटींवर करण्याची आपली सिद्धता आहे तें कळवावें, अशी फ्रान्सला सूचना केली. याच्या आदल्या दिवशींच लंडन 'टाइम्स'नें फ्रान्सला इटालीचें समाधान करण्याची सूचना देणारा लेख लिहिला होता, हें येथें सांगणें आवश्यक आहे.

इटालियन सरकार एवढी सूचना करून थांबलें नाहीं, तर त्यानें सर्वत्र युद्धाची सिद्धता आरंभिली. १९०१ मध्यें जन्मलेल्या ६०००० सैनिकांना लगेच सैन्यांत समाविष्ट होण्याची आज्ञा सुटली. आफ्रिकेला एक सबंध आर्मी कोअर धाडली. आल्प्स पर्वताच्या शेजारीं युद्धसामुग्रीची जमवाजमव होऊं लागली. आफ्रिकेंतील वाळवंटांत युद्ध जुंपल्यास इटालीला कितपत साहाय्य करणें शक्य आहे, याची पाहणी करण्याकरितां जर्मनीचे एक सेनापति उत्तर आफ्रिकेला गेले. वाळवंटांतील युद्धासाठीं लागणारी सामुग्री घेऊन दोन जर्मन सेनाविभाग ऑस्ट्रियांत येऊन बसले. कांहीं दिवसांनीं सि. मुस्सोलिनींनीं एकदम आठ लक्ष तरुणांना सैन्यांत समाविष्ट होण्याची आज्ञा दिली.

## अमेरिकेची सीमा ऱ्हाइन नदीवर

या साऱ्या घटनांकडे अमेरिकेच्या अध्यक्षांचें सारखें लक्ष लागलेलें होतें. पण आपण या राजकारणांत हस्तक्षेप केलाच पाहिजे असें वाटण्याजोगी एक घटना १९३९ च्या २८ जानेवारीला घडून आली. या दिवशीं फ्रान्सच्या परराष्ट्रमंत्र्यांनीं वृत्तपत्रांच्या प्रतिनिधींजवळ बोलतांना असे उद्गार काढले कीं, आजपर्यंत उपनिवेशांच्या बाबतींत इटालीशीं, पारीसच्या संधिपरिषदेनें आणि अलीकडे लाव्हालनेंहि अन्यायाचें वर्तन केलें आहे. या उद्गारांवरून फ्रेंच सरकाराची इटालीला शरण जाण्याची सिद्धता स्पष्ट दिसूं लागली. तेव्हां या प्रवाहपतित सरकाराला धीर देण्याकरितां प्रे. रूझव्हेल्टनीं फ्रान्सच्या मागणीप्रमाणें अमेरिकेचीं सर्वोत्कृष्ट ८०० विमानें तिकडे धाडण्याला अनुज्ञा दिली. इतकेंच नव्हे

तर अमेरिकेची सीमा आतां ऱ्हाइन नदी हीच झाली असल्याचें बोलून दाखवून स्वसंरक्षणाकरितांच अमेरिकेला फ्रान्सचें संरक्षण करणें भाग आहे असें सांगितलें.

## प्रे. रूझव्हेल्टची माघार

फ्रान्स अमेरिकेंत विमानें विकत घेत असल्याचें वृत्त एका अपघातामुळें उघडकीस आलें. १९३९ च्या जानेवारींत अमेरिकेच्या एका लढाऊ विमानाला अपघात होऊन एका घायाळ व्यक्तीला रुग्णालयांत न्यावें लागलें. या व्यक्तीची सारी माहिती अमेरिकन वार्ताहरांनीं काढली. तेव्हां त्यांना कळून आलें कीं, तो एक फ्रेंच अधिकारी असून अमेरिकेंत विमानें विकत घेण्याकरितांच आला आहे आणि अमेरिकेचें युद्धखातेंहि त्याला आपलीं सारीं रहस्यें सांगत आहे. ही वार्ता प्रसिद्ध झाल्यावर आपलीं सामरिक रहस्यें परराष्ट्राच्या अधिकाऱ्यांना सांगितल्याबद्दल अमेरिकन जनतेनें फार ओरड केली. तेव्हां स्वसमर्थन करण्याकरितां अमेरिकेच्या अध्यक्षांनीं सेनेटच्या कांहीं तज्ज्ञ सभासदांना भेटीला बोलावून त्यांना आपलें परराष्ट्रीय धोरण सविस्तर समजावून सांगितलें. ही चर्चा गुप्त होती तरी तिचा सारांश वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालाच. हा सारांश प्रसिद्ध झाल्यावर अमेरिकेंतील युद्धविरोधी पक्षानें प्रे. विल्सनप्रमाणेंच प्रे. रूझव्हेल्टहि आपल्या राष्ट्राला महायुद्धाच्या ज्वालामुखींत लोटणार आहेत, असें काहूर केलें. या काहुराला भिऊन रूझव्हेल्टनीं आपलीं बहुतेक सारीं महत्त्वाचीं विधानें परत घेतलीं. तरीसुद्धां अमेरिकेच्या खऱ्या धोरणावर त्या प्रकरणानें चांगलाच प्रकाश पडला.

या वेळीं फ्रेंच सरकार शरणागतीच्या किती जवळ आलें होतें याची आतां थोडी माहिती सांगितली पाहिजे. या वेळीं सुएझ कालव्याच्या कारभारांत इटालीला भागीदार करणें, ट्यूनिसमधील इटालियनांना तात्पुरत्या म्हणून दिलेल्या सवलती चिरंतन करणें, जीबुती बंदर आंतरराष्ट्रीय मालकीचें करणें इत्यादि अटींवर इटालीशीं तडजोड घडवून आणण्याची विनंति फ्रान्सनें जर्मनीला केली होती. या प्रकरणांत मध्यस्थी करण्याला जर्मनीची ना नव्हती पण आपण मध्यस्थी करण्यापूर्वी फ्रान्सनें रशिया, पोलंडप्रभृति राष्ट्रांशीं केलेले परस्परसहायाचे संधि मोडून टाकावेत असें जर्मनीचें म्हणणें होतें. उलटपक्षीं फ्रान्सचें म्हणणें होतें कीं, इटालीशीं आमचें सख्य घडवून आणण्याचें कार्य जर्म-

नीनें पार पाडलें म्हणजे आपण वरील राष्ट्रांशीं झालेले परस्परसहायाचे संधि रद्द करूं, असा उभयतांचा मतभेद झाल्यानें जर्मनीनें मध्यस्थी करण्याचें नाकारलें. त्यानंतर ७ फेब्रुवारीला फ्रेंच परराष्ट्रमंत्र्यांनीं सेनेटमध्यें भाषण करून असें स्पष्ट सांगितलें कीं, पूर्वेकडील राष्ट्रांशीं झालेले आपले परस्परसहायाचे संधि फ्रान्स केव्हांहि रद्द करणार नाहीं. या भाषणावर टीका करतांना हांबुर्गेर फ्रेंडेनब्लाट या जर्मन पत्रानें लिहिलें होतें कीं,प्रे. रूझव्हेल्टनें फ्रान्सच्या आशा पुन्हा पल्लवित केल्या असल्यानें फ्रेंच मंत्री असली आव्हानांची भाषा बोलूं लागले आहेत आणि त्यांना इंग्लंड, पोलंड इत्यादि देशांकडून पाठिंबा मिळत आहे.

## प्रे. रूझव्हेल्टचा कुटिल संदेश

जर्मन सैन्य प्रागमध्यें आणि इटालियन सैन्य अल्बानियामध्यें शिरल्यानंतर १३ एप्रिलला हिटलेरमुस्सोलिनींना एक उघड संदेश पाठवून प्रे. रूझव्हेल्ट यांनी युरोपीय राजकारणांत उघड हस्तक्षेप केला. या संदेशांतील राजकीय धोरण, नववर्षाच्या निमित्तानें त्यांनीं अमेरिकन कॉंग्रेसला धाडलेल्या संदेशांत समाविष्ट झालेंच होतें आणि त्या संदेशाचा आधार मि. चेंबरलेन यांनीं प्राग-पतनानंतरच्या भाषणांतून घेतलाहि होता. पण त्यापेक्षां प्रत्यक्ष हिटलेरमुस्सो-लिनींना धाडलेल्या संदेशाचें महत्त्व केव्हांहि अधिक आहे. या संदेशांत प्रे. रूझव्हेल्ट यांनीं असा आव आणला होता कीं, युरोपपासून अमेरिका फार दूर असल्यानें युरोपांतल्या साऱ्याच राष्ट्रांविषयीं अमेरिकेला सारखेंच ममत्व वाटतें, तेव्हा जर्मनी आणि इटाली यांचें इतर युरोपीय राष्ट्रांशीं कांहीं भांडण असलें किंवा त्यांना इतरांच्याकडे कांहीं मागण्या करावयाच्या असल्या तर त्या साऱ्या त्यांनीं मोकळ्या मनानें अमेरिकन सरकारला कळवाव्या, म्हणजे त्या माग-ण्यांच्या किंवा भांडणाच्या बाबतींत अमेरिकन सरकार त्यांच्या वतीनें मध्यस्थी करील. या सूचनेंत व्यक्त केलेली भावना जरी सकृद्दर्शनीं सोज्ज्वळ दिसत होती तरी ती प्रसिद्ध करण्यांतला हेतु कांहीं सरळ नव्हता. कारण या सूचनेप्रमाणें अमेरिकेला वर्तन करावयाचें असतें तर ती विश्वाविदित करण्याचें कांहींच कारण नव्हतें. इतकेंच नव्हे तर ती सरकारी रीत्या हिटलेरमुस्सोलिनींना मिळण्या-पूर्वीच नभोवाणीवरून तिला प्रसिद्धि देणें हें त्या उभयतांनाहि उपमर्दकारक होतें. प्रस्तुत संदेशांत फिन्लंड, एस्टोनिया, लिथुआनिया, लाटव्हिया, स्वीडन, नॉर्वे,

डेन्मार्क, हॉलंड, बेल्जम, ग्रेटब्रिटन, आयर्लंड, फ्रान्स, पोर्तुगाल, स्पेन, स्विट्झर्लंड, लिख्टेनस्टाइन, लुक्सेंबुर्ग, पोलंड, हंगारी, रुमानिया, युगोस्लाव्हिया, रशिया, बल्गारिया, ग्रीस, तुर्कस्थान, इराक, अरेबिया, सीरिया, इजिप्त, इराण इतक्या देशांवर हल्ला न करण्याचें आश्वासन अमेरिकेच्या अध्यक्षमहाशयांनीं इटाली-जर्मनींच्या राज्यकर्त्यांकडे मागितलें होतें! ही नुसती नामावळी वाचली तरी अध्यक्षमहाशयांचें पत्र कोणत्याहि वर्तमानपत्रांतील लेखापेक्षां अधिक अचरटपणानें भरलेलें होतें, याची वाचकांना जाणिव होईल. या नामावळींतील निदान दहाबारा देशांवर रशियानें आतांपर्यंत लहानमोठीं आक्रमणें केली आहेत. त्यांतलीं कांहीं आक्रमणें तर जर्मनीशीं रशियाचें युद्ध जुंपण्यापूर्वीच झालीं होतीं. तरीसुद्धां वर वर्णिलेल्या संदेशासारखा एखादा संदेश अमेरिकेनें स्टालिनकडे धाडला नाहीं. एवढ्या एकाच गोष्टीवरून तो संदेश कितपत प्रामाणिकपणाचा किंवा सद्‌बुद्धिप्रेरित होता, याची वाचकांना पुरती कल्पना येईल. या संदेशांतील एक अति महत्त्वाचें वाक्य मूळ इंग्रजींतूनच उध्दृत करणें आवश्यक आहे. कारण त्या एका वाक्यानें प्रे. रूझवेल्ट यांच्या साऱ्या कुटिल कारस्थानांवर एकदम शोधदीपाचा प्रकाश सोडल्यासारखा प्रकाश पडतो. ‘Nothing can persuade the peoples of the Earth that any governing power has any right or need to inflict the consequences of war on its own or any other people, save in the cause of self-evident homedefence.’ अमेरिकेवर पुनश्च कोणत्याहि युद्धांत भाग घेण्याचा प्रसंग येऊं नये याकरितां तेथील जनतेनें आपल्या विधिमंडळांतून तटस्थतेचा निर्बंध संमत करून घेतला असल्यानें, स्वेच्छेनें युद्धांत पडण्याचा अधिकार नष्ट झालेल्या अध्यक्षांना परराष्ट्रांना आपल्याविरुद्ध युद्ध पुकारावयाला लावण्याइतकें चिडविणें हा एकच समरप्रसंग निर्माण करण्याचा मार्ग उरलेला होता. या उपायाचा अवलंब त्यांनीं कसा कुशलतेनें आणि कुटिलतेनें केला, याचें वर्णन पुढें यावयाचेंच आहे. केवळ तें धोरण आधींपासून ठरलेलें होतें, याचा पुरावा या वाक्यानें मिळतो, म्हणून त्यावर या ठिकाणीं जोर द्यावा लागला.

या भाषणाला उत्तर देतांना हेर हिटलेर यांनीं सांगितलें कीं, १९१९ पासून

१९३९ पर्यंतच्या वीस वर्षांत निदान चौदा युद्धें झालीं; पण त्यांत जर्मनीचें कांहींहि अंग नव्हतें. त्याचप्रमाणें त्याच अवधींत मोठ्या राष्ट्रांनीं लहान राष्ट्रांच्या अंतर्गत कारभारांत हस्तक्षेप केल्याचीं २६ उदाहरणें घडून आलीं. यांपैकीं सहा हस्तक्षेपांच्या प्रकरणांत अमेरिकेचा हात होता. यांवरून जर्मनीला नीति शिकवायला जाणाऱ्यांचे हातहि कसे अनीतीनें लिप्त झाले होते, याची वाचकांना कल्पना येईल.

## संदेशाची चिकित्सा

प्रे. रूझव्हेल्ट यांच्या संदेशांतील भावना कशा परस्परविरोधी आहेत, याची आतां थोडी चिकित्सा केली पाहिजे. प्रत्येक राष्ट्रानें केवळ आत्मसंरक्षणाकरितांच युद्धांत भाग घ्यावा, हें अमेरिकेच्या अध्यक्षांचें तत्त्व एकदां सर्वमान्य झालें म्हणजे मग एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राच्या धोरणासंबंधीं पृच्छा करण्याचें कारण काय? निदान एका खंडांतील राष्ट्रानें अन्य खंडांतील राष्ट्राच्या धोरणाकडे दुर्लक्ष्य केलें तरी चालेल. विशेषतः ज्या राष्ट्रानें आपल्या खंडांतील राजकारणांत ढवळाढवळ न करण्याची चिरंतनची आज्ञा अन्य खंडांतील राष्ट्रांना केलेली आहे, त्या राष्ट्रानें तरी इतर खंडांतील राजकारणांत लिप्त होण्याचें कारण नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं केवळ आत्मसंरक्षणाकारितांच युद्ध करावें, हें प्रे. रूझव्हेल्टचें तत्त्व त्यांच्यापेक्षा अधिक प्रामाणिक अशा, पण अमेरिकेला पहिल्या महायुद्धांत ओढणाऱ्या प्रे. विल्सन याच्या तत्त्वाशीं विसंगत होतें. १९१७ मध्यें अमेरिकेनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें तें आत्मसंरक्षणाकरितांच पुकारलें असें म्हणण्याचें धाडस अगदीं भाडोत्री इतिहासकाराला सुद्धां होणार नाहीं.

## अमेरिकेवरील स्वारीची शक्यता?

युरोपांतील राजकारणाच्या उठाठेवी आपल्याला उजळ माथ्यानें करता याव्यात, याकरितां जर्मनीच्या अमेरिकेवरील स्वारीच्या शक्याशक्यतेची चर्चा अनेक उपद्व्यापी व्यक्तींनीं चालविली होती. स्वतः प्रे. रूझव्हेल्ट यांनींहि आपल्या नववर्षाच्या संदेशांत अशी भीति व्यक्त केली होती कीं, युरोपांत जर बलोपासकांचें राजकारण प्रभावी झालें तर अमेरिकेंत सुद्धां प्रोटेस्टंट धर्म आणि लोकसत्ताक राज्यपद्धति सुरक्षित राहणार नाहीं. अमेरिकेच्या अध्यक्ष-

महाशयांनीं ही जी भीति व्यक्त केली होती, तिचा अर्थ उलटा लावला पाहिजे, असें मला वाटतें. अमेरिकेसारख्या एका अतिविस्तृत खंडावर ज्या तत्वज्ञानाचें आणि जीवनपद्धतीचें साम्राज्य प्रस्थापित झालें होतें, त्या अमेरिकन तत्त्वज्ञानाच्या आणि जीवनपद्धतीच्या विरोधी विचारसरणी अन्य खंडांतून प्रभावी होऊं लागल्यास आत्मसंरक्षणाच्या निमित्तानें त्यांच्याविरुद्ध शस्त्र उचलण्याला अमेरिका केव्हांहि सिद्ध आहे, असा त्या संदेशाचा खरा अर्थ आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सर्वतोपरीनें अमेरिकेचें अनुकरण करा, नाहीं तर निर्चें वैर पतकरा, हाच प्रे. रूझव्हेल्ट यांच्या मनांतील आशय होता. कारण युरोपसारख्या चिमुकल्या खंडावर सुद्धां नव्हे, तर सुमारें सहस्र वर्षेपर्यंत पवित्र जर्मन साम्राज्यांत समाविष्ट असलेल्या मध्ययुरोपावर जर्मनांचें वर्चस्व प्रस्थापित करण्याच्या हिटलेरच्या प्रयत्नापासून अमेरिकेसारख्या सुदूर आणि सुविस्तृत खंडाला धोका असल्याचा आरोप करण्याचा वास्तविक अर्थ हा एकच होऊं शकतो. २८ एप्रिलच्या भाषणांत हेर हिटलेर यांनीं अमेरिकेला असें स्पष्टपणें बजावलें होतें कीं, जर्मनी अमेरिका खंडांतील कोणत्याहि भागावर स्वारी करणार असल्याबद्दलच्या सर्व कंड्या सपशेल खोट्या आहेत आणि त्या साऱ्या कारस्थानी व्यक्तींनीं उठविलेल्या आहेत. याच विशिष्ट दृष्टीनें प्रे. रूझव्हेल्टच्या राजकारणाकडे यापुढें पहावें लागेल.

: ७ :

# इंग्लंडचीं पोलंडमधील कारस्थानें

सेनेटच्या समितीशीं प्रे. रूझव्हेल्ट यांचें संभाषण झाल्यानंतर लगेच इंग्लंडनें जर्मनीशीं युद्ध करण्याचा निश्चय केला आणि त्या धोरणानें आपलीं कारस्थानें आरंभिलीं. या कारस्थानांचें उद्दिष्ट पोलंडच्या सरकाराला जर्मनीशीं वैर करण्याला उद्युक्त करणें हें होतें. यांत मौजेची गोष्ट ही होती कीं, १९३८ च्या शेवटच्या तिमाहींत झेकोस्लोव्हाकियाचे तुकडे तोडण्यांत जर्मनी-हंगारींच्या बरोबरीनेंच पोलंडनेंहि भाग घेतला होता. पण झेकोस्लोव्हाकियांत समाविष्ट झालेल्या जर्मन जनतेची मुक्तता झाल्यानंतर पोलंडनें खाल्लेल्या जर्मन प्रांतांच्या मुक्ततेचा प्रश्न जसा उद्भवला, तसा पोलंड आणि जर्मनी यांच्यामधून विस्तवसुद्धा जाईनासा झाला. १९३९ च्या जानेवारींतच हेर हिटलेर यांनीं पोलंडच्या परराष्ट्रमंत्र्यांना भेटीला बोलावून त्यांचें म्हणणें ऐकून घेतलें होतें. त्यानंतर लगेच जर्मनीचे परराष्ट्रमंत्रीहि वार्सॉला जाऊन आले. या वेळीं डांझिग बंदर जर्मनींत समाविष्ट करण्याला संमति देऊन आणि पूर्व प्रशियाला मुख्य जर्मनीपासून विभक्त करणाऱ्या पोलंडच्या प्रांतांतून जर्मनीला स्वतःच्या सत्तेची आगगाडी बांधण्याला अनुज्ञा देऊन समेट करण्याचा आग्रह जर्मनीच्या नेत्यांनीं पोलंडच्या राज्यकर्त्यांना केला होता. पण पोलिश लोकांच्या नेहमींच्या मूर्खपणामुळें त्यांनीं जर्मनीला सपशेल नकार दिला. इतकेंच नव्हे तर पोलंडमधील जर्मन अल्पसंख्याकांच्या विरुद्ध पोल लोकांनीं सर्वत्र दंगे आरंभिले. ठिकठिकाणीं जर्मनांचीं दुकानें, कारखाने, किंवा संस्था यांच्यावर हल्ले होऊं लागले. पोल विद्यार्थ्यांनीं जर्मनीच्या निषेधाप्रीत्यर्थ सभा आणि मिरवणुकी यांचा धूमधडाका चालू केला. पोलंडमधील जर्मनांचा प्रमुख नेता आणि त्याचे ४० अनुयायी यांना पोलंडच्या सरकारानें अटक केली. या वेळीं पोलंडमधील सत्ता ज्या कर्नलांच्या कंपूच्या हातीं होती, त्यांच्यापैकीं एक कर्नल तोमास्झेस्की यानें एका भाषणांत असें प्रतिपादिलें कीं, पोलंडला डांझिग नांवाचें एक गळूं झालें आहे आणि त्याच्यावर शक्य तितक्या लौकर शस्त्रक्रिया करणें आवश्यक आहे. पोलंडच्या जनतेनें तर सारा पूर्व प्रशि-

याचा प्रांतच आपल्या देशांत समाविष्ट झाला पाहिजे, अशी ओरड आरंभिली. हे सारे दंगे चेतविण्यांत इंग्लंडनेंहि भाग घेतला होता, असें म्हणण्याला पुरावा सांपडतो. या दंग्यांच्या काळांतच इटालीचे परराष्ट्रमंत्री काउंट चियानो हे जर्मनी आणि पोलंड यांची तडजोड घडवून आणण्याकरितां वार्सांला गेले होते. या वेळीं लंडन टाइम्सनें नक्राश्रु ढाळीत लिहिलें होतें कीं, काउंट चियानोंच्या भेटीच्या वेळींच हे दंगे सर्व पोलंडभर पसरले. त्याच लेखांत टाइम्सनें असेंहि म्हटलें होतें कीं, या दंग्यांचें दायित्व इंग्लंड आणि फ्रान्स यांच्यावर आहे असें जर्मनींतील लोकमत आहे, पण त्यांत आमचा कांहींसुद्धा हात नाहीं. या वेळीं इंग्लंडच्या गुप्तहेरविभागाचे एक प्रमुख अधिकारी पोलंडच्या शेजारच्या रुमानियांत महत्त्वाचीं जर्मनीविरोधी कारस्थानें करण्यांत गुंतले होते ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. तेव्हां त्यांचेच भाऊबंद पोलंडमध्यें असलेच उद्योग करीत असावेत हें उघड आहे.

## जर्मन विजयानें पोलंडचा लाभ

पोलंडमध्यें जर्मनीविरुद्ध इतके दंगे होत असतांनाहि जर्मनीमुळें आपल्याला अनेक लाभ झाले आहेत, अशी जाणीव तिथल्या परराष्ट्रमंत्र्यांना होती. जर्मनीनें झेकोस्लोव्हाकिया देश आत्मसात् केल्यानंतर पोलंडनें लगेच जर्मनीच्या शत्रूंशीं संधि करावा, अशी सूचना विरोधी पक्षानें केली असतां तिथल्या परराष्ट्रमंत्र्यांच्या एका हस्तकानें लिहिलें होतें. ' आजपर्यंत जर्मनीच्या प्रत्येक विजयानें पोलंडचा लाभच झाला आहे. जर्मनीनें ऑस्ट्रिया आत्मसात् केला तेव्हां लिथुआनियानें व्हिल्ना नगरीवरील पोलंडच्या स्वामित्वाला मान्यता दिली. जर्मनीनें सुडेटेन जर्मनांचा प्रांत म्यूनिच येथील संधीप्रमाणें मिळविला, तेव्हांच झेकोस्लोव्हाकियाला पोलंडचा टेशेन परगणा ओकावा लागला. जर्मनीनें सर्व झेकोस्लोव्हाकियावर प्रभुत्व प्रस्थापित केलें, तेव्हां हंगारीला रुथेनिया प्रांत मिळून पोलंडला एका कॅथोलिक राष्ट्राचा शेजार लाभला. इतःपर दक्षिण युरोपांत जर्मनीनें आपलें साम्राज्य वाढविण्याचा प्रयत्न केला तर त्याला इंग्लंडचा विरोध होईल. तेव्हां आपण दक्षिणेकडील परिस्थितीची चिंता न करतां उत्तरेकडील राष्ट्रांशीं आपले संबंध दृढतर करण्याच्या उद्योगाला लागूं या. ' पण २१ मार्चला जर्मनीनें लिथुआनियाकडून मेमेल बंदर परत मिळविल्यामुळें कर्नल बेक यांच्या उत्तरेकडील राजकारणाचा डोलारा कोसळला. १९३५ मध्यें जर्मनी मेमेल बंदर

घेणार असा रंग दिसूं लागला असतां मार्शल पिल्सुड्स्की यांनीं जर्मनीला कळविलें होतें कीं जर्मन सैन्य मेमेलमध्यें घुसल्यास पोलंड जर्मनीवर हल्ला करील. पोलंडचे सेनापति या प्रश्नाला इतकें महत्त्व देत असल्यानें जर्मन सैन्य मेमेल-मध्यें घुसतांच पोलंडचे तेव्हांचे नेते मार्शल रिड्झास्मिग्ली यांनीं आपल्या शिलकी सैन्याला एकत्रित होण्याची आज्ञा केली. पोलंडच्या वृद्ध सेनापतींचें हें साहस पाहून इंग्लंडच्या नेत्यांना वाटलें कीं पूर्वदिग्विजयासाठीं अनिर्बंध संचार करीत असलेल्या जर्मनीच्या श्यामकर्णाला अडविणारें एक राष्ट्र अद्यापि अस्तित्वांत आहे, याच्या साहाय्यानें जर्मनीच्या महत्त्वाकांक्षांना अजून आळा घालतां येईल. याच बुद्धीनें प्रेरित होऊन इंग्लंडच्या प्रधानमंत्र्यांनीं पोलंडच्या सीमासंरक्षणाचें आश्वासन दिलें.

## इंग्लंडला अमेरिकेचें आश्वासन

इंग्लंडनें पोलंडला सीमासंरक्षणाचें दिलेलें आश्वासन हें दुसऱ्या महायुद्धाचें निमित्तकारण असल्यानें तें देण्यापूर्वी स्वतः इंग्लंडनेंहि युद्धाचा प्रसंग ओढ-वल्यास अमेरिकेकडून सहायाचें आश्वासन मिळवून ठेवलें होतें काय, या प्रश्नाचा इथें विचार करणें आवश्यक आहे. पोलंडला आश्वासन देण्यापूर्वी मि. नेव्हिल चेंबरलेन यांनीं बर्मिंगहॅम येथें भाषण करतांना जर्मनीच्या वर्तनाचा युरोपाच्या सीमांपलीकडेहि गंभीरपणानें विचार होत असल्याचा उल्लेख केला होता. हा उल्लेख अर्थातच अमेरिकेला उद्देशून होता. इंग्लंडनें पोलंडला आश्वा-सन दिल्यानंतर लौकरच प्रे. रूझव्हेल्ट यांनीं जर्मनीच्या राज्यकर्त्यांना एक अनावृत पत्र पाठवून त्यांच्याकडून इतःपर कोणत्याहि देशावर आक्रमण न करण्याचें आश्वासन मागितलें होतें. त्या अनावृत पत्रावरूनहि प्रे. रूझव्हेल्ट हे त्या वेळींच 'युद्धाय कृतनिश्चयः' अशा मनःस्थितींत असल्याचें स्पष्ट दिसून येतें.

मि. चेंबरलेन आणि प्रे. रूझव्हेल्ट हे जरी तेव्हांपासूनच युद्ध अनिवार्य आहे असें आपल्या मनाशीं ठरवून पुढच्या योजना यशस्वी करण्याच्या उद्यो-गाला लागले तरी सामान्य जनतेची समजूत कांहीं तेव्हां तशी झाली नव्हती. 'लंडन टाइम्स'सारख्या प्रमुख पत्रानेंहि इंग्लंडनें पोलंडला दिलेल्या आश्वा-सनाचा अर्थ लावतांना असेंच म्हटलें होतें कीं, पोलंडच्या सध्याच्या सीमा

अपरिवर्तनीय आहेत असा या आश्वासनाचा अर्थ नाहीं. सीमापरिवर्तनासंबंधीं बोलणें करतांना जर्मनीनें पोलंडला युद्धाचें आव्हान देऊं नये, एवढ्यासाठींच इंग्लंडनें पोलंडला आश्वासन दिलेलें आहे. याच आशयाचे इतरहि अनेक लेख काढून दाखवितां येतील. पण हें आश्वासन दिल्यानंतरचें इंग्लंडचें वर्तन लंडन टाइम्सच्या अर्थाशीं मुळींच जुळणारें नव्हतें. मार्चच्या अंतीं पोलंडला इंग्लंडनें आश्वासन दिल्यापासून ऑगस्टच्या अंतीं जर्मनी आणि रशिया यांचा अनाक्रमणाचा संधि हेंइपर्यंत पोलंड आणि जर्मनी यांची तडजोड घडवून आणण्याचा इंग्लंडनें कोणताहि प्रयत्न केला नाहीं. उलट युद्ध उपस्थित झाल्यास रशियाचें सहाय पोलंडला आणि पर्यायानें इंग्लंडला मिळविण्याची खटपट मात्र मि. चेंबरलेन यांनीं चालविली होती. यावरून त्यावर्षी युद्धारंभ करण्याचा इंग्लंडचा संकल्प आधींच झाला होता, हें निश्चितपणें कळून येतें. हा संकल्प कधीं नक्की झाला होता, हें आज उपलब्ध असलेल्या माहितीवरून सांगणें अवघड आहे. पण सेनेटच्या सभासदांशीं प्रे. रूझव्हेल्ट यांची चर्चा झाल्यानंतर तो लौकरच झाला असला पाहिजे, हें उघड आहे. यामुळेंच पहिल्या महायुद्धापूर्वी बेल्जमला किंवा फ्रान्सला दिलेल्या आश्वासनापेक्षां अधिक व्यापक आश्वासन पोलंडला देण्याचें धाडस इंग्लंडनें केलें. या आश्वासनानें पोलंड म्हणेल त्यावेळीं जर्मनीविरुद्ध शस्त्र उचलण्याचें अभिवचन इंग्लंडनें दिलें होतें. अशा प्रकारचें अभिवचन फ्रान्सला पहिल्या महायुद्धापूर्वी मिळालें नव्हतें.

इंग्लंडच्या या अभिवचनानंतर पोलंडचे परराष्ट्रमंत्री मि. बेक हे लंडनला आले आणि कृतज्ञतेच्या भरांत त्यांनीं इंग्लंडलाहि त्याच्या सीमा संभाळण्याचें वचन दिलें. या वचनावरून तें देणाऱ्यांच्या आणि स्वीकारणाऱ्यांच्या बुद्धीवर आणि आकलनशक्तीवर भेदक प्रकाश पडत असल्यामुळेंच त्याचा इथें उल्लेख केला आहे. नाहीं तर ऐतिहासिक दृष्ट्या त्या घटनेला कांहींच महत्त्व नाहीं.

## ग्रीसरुमानियांना आश्वासनें

पोलंडला आश्वासन दिल्यानंतर तें खरें करून दाखविण्याची वेळ आल्यास काय करावें, या प्रश्नाची चर्चा इंग्लंडांत चालूं झाली. इंग्लंडसारख्या समुद्रबळी राष्ट्राला पोलंडला साहाय्य करण्याला एकच मार्ग मोकळा होता. तो म्हणजे तर्कांनीं वाट दिल्यास काळया समुद्रांत प्रवेश करून रुमानियांत सैन्य उतरविणें

हाच होय. हा मार्ग कितपत सोयीचा होता हें दुसऱ्या महायुद्धांत त्याचा उपयोग करण्याचा विचार करण्याला सुद्धां सवड झाली नाहीं, यावरून कळून येईल. पण बाल्टिक समुद्रांत प्रवेश करून पोलंडच्या एकुलत्या एका बंदरांत सैन्य उतरविण्याच्या कल्पनेपेक्षां तो अधिक शक्य कोटींतील होता. यासाठीं १३ एप्रिलला इंग्लंड आणि फ्रान्स या उभयतांनीं पोलंडला दिलेल्या आश्वासनासारखींच आश्वासनें रुमानिया आणि ग्रीस यांना दिलीं. यांपैकीं रुमानियाची सीमा जर्मन सीमेला कुठेंच भिडलेली नव्हती आणि ग्रीसशीं जर्मनीचें चांगलेंच सख्य होतें. त्यामुळें जर्मनीपासून त्या दोनहि देशांना भय नव्हतेंच. पण इंग्लंडनें दिलेल्या आश्वासनामुळें मात्र तें उत्पन्न झालें. या वेळीं ग्रीसला आश्वासन देण्याचें विशेष कारण असें घडलें होतें कीं, एप्रिलच्या प्रारंभीं शुभ शुक्रवाराच्या दिवशीं इटालीनें एकाएकीं अल्बानिया या युरोपांतील एकुलत्या एका मुसलमानी देशावर हल्ला करून तो देश घशांत टाकला होता. अल्बानियाच्या मागून ग्रीसची पाळी येऊं नये याकरितां इंग्लंड आणि फ्रान्स यांनीं ग्रीसला सहायाचें आश्वासन दिलें होतें. या आश्वासनापेक्षा ग्रीक लोकांना स्वतःच्या बाहुबलाचाच अधिक उपयोग झाला ही कथा पुढें यावयाचीच आहे.

## रशियन साहाय्यासाठीं धडपड

रुमानियाच्या रक्षणाची हमी देण्यांत इंग्लंडचा मुख्य हेतु असा होता कीं, त्या देशांत आपण भरपूर सैन्य उतरविण्याचें आश्वासन पोलंडला दिलें तरच पोलंड आपल्या घरांत रशियन सैन्य येऊं देण्याला संमति देईल. जर्मनी आणि रशिया या उभयतांच्या मध्यें पारीसच्या संधीनें अनेक लहानमोठीं राष्ट्रं निर्माण करून त्यांना परस्परांपासून अलग करून ठेवलें होतें. त्यामुळें रशिया आणि जर्मनी यांच्यांत पुनश्च युद्ध जुंपल्यास तें या नवनिर्मित राष्ट्रांच्या सीमांतूनच लढलें जाणार हें निश्चित होऊन चुकलें होतें. या नवनिर्मित राष्ट्रांमध्यें पोलंड हें एकच राष्ट्र जर्मनी आणि रशिया या उभय राष्ट्रांचा मनःपूर्वक द्वेष करीत होतें. इतर राष्ट्रांतील सत्ताधारीवर्गाची सहानुभूति जर्मनीकडेच होती. मात्र तेथील प्रजेची सहानुभूति आपल्याकडेच आहे अशी रशियन लोकांची सोयिस्कर समजूत होती. या समजुतींत कितपत तथ्य होतें हें फिन्लंडच्या लढाईनें पुढें लौकरच सिद्ध झालें. यामुळें पोलंडला आपण दिलेलें

आश्वासन पूर्ण करण्याच्या दुर्घट कार्यांत इंग्लंडनें रशियाचें साहाय्य घेतलें तर हीं नवनिर्मित मध्यवर्ती राष्ट्रें आपापल्या देशांतुन राशियन सैन्याला येऊं देतील कीं नाहीं हा अतिशय महत्त्वाचा प्रश्न होता. या प्रश्नाला एस्टोनियाच्या पर-राष्ट्रमंत्र्यांनीं असें स्पष्ट उत्तर दिलें होतें कीं, आमच्या आमंत्रणावांचून जर कोणी आमच्या देशाच्या संरक्षणाचें दायित्व आपल्या शिरावर आहे असें समजून वागूं लागतील तर त्यांना आक्रमक राष्ट्रें समजून आम्ही त्यांना आमच्या-कडून होईल तितका प्रतिकार करूं. हीं राष्ट्रें सुखासमाधानानें रशियाचीं सैन्यें आपल्या घरांत घेण्याला सिद्ध झालीं नाहींत तर बोल्शेव्हिकांना त्यांच्या देशांत दंडेलीनें प्रवेश मिळवावा लागणार आणि मग जर्मनीपेक्षांहि अधिक मोठ्या प्रमाणावर रशियाला अन्य राष्ट्रांच्या अधिकारांवर आक्रमण करावें लागणार आणि असें घडल्यास जर्मनीवर पुनश्च तोंडसुख घेण्यालासुद्धां आपल्याला तोंड राहणार नाही अशी धास्ती इंग्लंड आणि फ्रान्स यांना वाटत होती. म्हणून त्या मध्यवर्ती राष्ट्रांनीं सुखासमाधानानें रशियन सेना आपल्या घरीं येऊं द्यावी याकारितां घरीं आलेलीं रशियन सेना आल्या मार्गानें परत जाईल असा विश्वास त्यांना वाटणें आवश्यक होतें. असा विश्वास त्या राष्ट्रांमध्यें उत्पन्न करण्याकरितां अँग्लो-फ्रेंच राष्ट्रांनीं रुमानियाच्या संरक्षणाची हमी घेऊन तिथें आपलें महत्त्वाचें सैन्य एकत्रित करणें इष्ट होतें. पण ज्यांना पश्चिमयुरोपांत एकट्या जर्मनीच्या चढाईपासून स्वतःचा बचाव करून घेण्याची ऐपत नव्हती त्यांनीं इतक्या दूरगामी योजनांचा विचार करण्यांत कांहींच अर्थ नव्हता. ही गोष्ट खरी कीं, वर सांगितलेली वस्तुस्थिति १९४० च्या उन्हाळ्यांत व्यक्त झाली. तोंपर्यंत इंग्लंडफ्रान्सचे राज्यकर्ते निःशंकपणें मूर्खांच्या नंदनवनांत विहार करीत होते.

: ८ :

# ॲंग्लोरशियन संधीचीं बोलणीं

पोलंड आणि रुमानिया यांना त्यांच्या सीमांच्या संरक्षणाची हमी दिल्यानंतर इंग्लंडनें रशियाशीं संधीचें बोलणें आरंभिलें. झेकोस्लोव्हाकिया देश जर्मनीचा मांडलिक झाल्यानंतर जर्मनी ॲंग्लोफ्रेंच राष्ट्रांच्यापेक्षा फारच प्रबळ झाला होता. यामुळें जर्मनीनें अकस्मात् हल्ला करून आपले देश पादाक्रांत करूं नयेत याकरितां त्यांना जर्मनीच्या पूर्वसीमेवर त्याला नवीन शत्रु उत्पन्न करून ठेवणें भागच होतें. इकडे रशियाहि जर्मनीशीं वैरच काय पण युद्धहि करण्याला एका पायावर सिद्ध होता. असें असूनसुद्धां १९३९ मध्यें ॲंग्लोरशियन संधीचीं बोलणीं चारपांच महिने रेंगाळत चाललीं आणि शेवटीं ती अयशस्वी झालीं. याचा इतिहास आणि कारणें सांगण्याचा अल्प प्रयत्न या प्रकरणांत करावयाचा आहे.

## हमीचे दुष्परिणाम

हीं संधीचीं बोलणीं अयशस्वी होण्याचें पहिलें कारण म्हणजे पोलंड आणि रुमानिया यांचें रशियाशीं असलेलें वैर होय. या वैराचें कारण अर्थात् त्या उभयतांचेहि कित्येक प्रांत रशियाला हवे होते हें होय. याच कारणामुळें या संधिसंवादाच्या प्रारंभीं रशियानें इंग्लंड, फ्रान्स, पोलंड, रुमानिया, तुर्कस्थान आणि स्वतः बोल्शेव्हिक रशिया यांची एक परिषद बोलावून जर्मनीविरुद्ध सर्वांनीं संगनमत करण्याची जी सूचना केली होती ती इंग्लंडला फेटाळून द्यावी लागली. याच्या उलट इंग्लंडनें रशियाला, आपल्याप्रमाणेंच पोलंड आणि रुमानिया यांना त्यांच्या संरक्षणाची हमी देण्याची सूचना केली. पण ज्यांना हमी द्यावयाची त्या राष्ट्रांच्या युद्धखात्यांनीं हमी देणाऱ्या राष्ट्राच्या युद्धखात्याशीं सहकार्य करावयाचेंच नाकारलें तर असल्या हमीचा नेहमीं एकच परिणाम होतो. तो हा कीं हमी देणाऱ्या राष्ट्राचीं सैन्यें आपलें वचन पाळण्याचा प्रयत्न करीत असतांना स्वदेशाच्या बाहेर आणि आपल्या सेनापतींच्या इच्छेविरुद्ध अनपेक्षित परिस्थितींत सांपडून मारलीं जातात. हा अनुभव बेल्जमच्या संरक्षणा-

साठीं सरसावलेल्या अँग्लोफ्रेंच सैन्यांना १९४० मध्यें आलाच. त्याची कल्पना रशियाच्या नेत्यांना पूर्वीपासूनच असल्यामुळें त्यांनीं इंग्लंडच्या इच्छेप्रमाणें पोलंड आणि रुमानिया यांना हमी देण्याचें नाकारलें पण इंग्लंडला अगदींच तोडून टाकूं नये याकरितां इंग्लंड आणि फ्रान्स यांनीं रशियाशीं परस्परसहायाचा संधि केल्यास आपण पोलंड आणि रुमानिया यांनाच काय पण लाटव्हिया, एस्टोनिया, लिथुआनिया, फिन्लंड, हॉलंड, बेल्जम आणि स्विट्झर्लंड यांनासुद्धां हमी देण्याला सिद्ध असल्याचें कळविलें. पण २ मेला इंग्लंड आणि फ्रान्स यांनीं रशियाची हीहि सूचना झिडकारली. ही सूचना झिडकारल्यानंतर १९ मेला मि. ईडन यांनीं रशियाशीं तत्काळ परस्परसहायाचा संधि करण्याची पार्लमेंटांत मागणी केली आणि मि. चर्चिल यांनीं चेंबरलेनमंत्रिमंडळाला बजावलें कीं, रशियाचें सहाय न मिळवितां जर्मनीशीं युद्ध करण्याचा आपला विचार असला तर अत्यंत अवघड अशा युद्धाची अत्यंत अपुरी सिद्धता करण्याचें पाप मात्र आपल्या माथीं बसेल.

या निर्वाणीच्या सूचनेनंतर मि. चेंबरलेन यांनीं रशियाशीं परस्परसहायाच्या संधीचीं बोलणीं आरंभिलीं. तेव्हां रशियानें अशी मागणी केली कीं, या संधींत राष्ट्रसंघाचा कोठेंहि संबंध येतां कामा नये. त्याप्रमाणेंच जर्मनीनें रशियावर अप्रत्यक्ष आघात केला तरीसुद्धां या संधीप्रमाणें अँग्लोफ्रेंचांनीं रशियाला सहाय केलें पाहिजे. या अप्रत्यक्ष आघाताच्या प्रश्नानेंच पुष्कळसा वेळ खाल्ला आणि रशियाला अँग्लोफ्रेंच राष्ट्रांविषयीं वाटत असलेला पराकाष्ठेचा अविश्वास उघडकीस आला. असें असूनसुद्धां इंग्लंडफ्रान्समधील एखादा परराष्ट्रमंत्री मास्कोला गेला नाहीं किंवा रशियाचा अविश्वास दूर करण्याचा दुसरा कोणताहि प्रयत्न झाला नाहीं.

## रशियाचें दुटप्पी धोरण

या वेळीं अँग्लो-फ्रेंच राष्ट्रांशीं संधि करण्याची रशियाला इच्छा होती कीं नाहीं हें सुद्धां संशयितच आहे. म्यूनिचच्या संधीनंतर जर्मनीनें आपला रोख रशियाकडे वळवावा अशी पश्चिम युरोपांतील राष्ट्रांची इच्छा होती आणि तसें घडण्याची रशियालाहि शंका वाटत होती. त्यामुळें जर्मनीनें आपल्या आक्रमणाची दिशा बदलावी, याकरितां रशियाच्या नेत्यांनीं प्रयत्नहि चालविले होते.

उलटपक्षीं रशियानें अँग्लो-फ्रेंच राष्ट्रांना मिळूं नये अशी जर्मनीच्या नेत्यांचीहि इच्छा होती आणि त्यांनीं एप्रिलच्या अंतीं प्रे. रूझव्हेल्ट यांच्याशीं वाग्द्वंद्व केलें असलें तरी रशियाविषयीं त्यांनीं चकारशब्दसुद्धा उच्चारला नव्हता. या सुलक्षणाचा सदुपयोग करून घेण्याकरितां रशियानें लिट्व्हिनॉफसारख्या ज्यू परराष्ट्रमंत्र्याला पदच्युत करून त्याची जागा मोलोटोफ या आर्याला दिली. इंग्लंडच्या परराष्ट्रमंत्र्यांची भेट टाळण्याकरितां रशियाचे उपपरराष्ट्रमंत्री, मो. पोटेमकिन हे राष्ट्रसंघाच्या बैठकीला गेले नाहींत. त्याचप्रमाणें रशियाचे सेना-प्रमुख मार्शल व्होरोशिलोफ यांनींहि इंग्लंडचे निमंत्रण नाकारलें. मो. मोलोटोफ यांनीं ३१ मेला रशियाच्या सुप्रीम कौन्सिलपुढें भाषण करतांना आपल्या पर-राष्ट्रीय धोरणाचें असें स्पष्टीकरण केलें कीं आक्रमक राष्ट्रांना विरोध करण्याला आम्ही सिद्धच आहोंत, पण परक्या राष्ट्रांतील प्रजाजनांच्या जिवावर लढणारीं जीं युद्धापिपासु राष्ट्रें आहेत, त्यांच्या कारस्थानांना आम्ही बळी पडणार नाहीं. त्याच भाषणांत त्यांनीं जर्मनीशीं रशियाचा नवीन व्यापारी संधि लौकरच होईल, अशी आशा प्रकट केली होती. त्याप्रमाणें २२ जुलैला जर्मनीशीं व्यापारी बोलणीं चालू झाल्याचें पत्रक रशियाच्या व्यापारमंत्र्यांनीं काढलें.

## इंग्लंडची घातकी आशा

इकडे जर्मनीशीं अंतस्थ कारस्थान चालू असतांनाच रशियानें इंग्लंडला अशी सूचना केली कीं आपलीं उभयतांचीं तत्वें एकच असल्यानें आपला राजकीय संधि तर होईलच, पण तो झाल्याबरोबर लगेच त्याची बजावणी करतां यावी याकरितां आपल्या युद्धमंत्र्यांनीं परस्परांना पूरक अशा योजना आंखून ठेवणें आवश्यक आहे, म्हणून राजकीय संधि होण्यापूर्वीच आपण सामरिक सहकार्याच्या वाटा-घाटी करूं या. मो. मोलोटोफ यांनी केलेल्या आपल्या वंचनेचा इतिहास पार्ल-मेंटांत सांगतांना मि. चेंबरलेन यांनीं इतिहासकारांना अशीहि माहिती पुरविली आहे कीं सामरिक सहकार्याच्या वाटाघाटी यशस्वी झाल्या म्हणजे राजकीय संधीचा मार्ग सुकर होईल, अशी आशा मो. मोलोटोफ यांनीं मला दाखविली आणि तिच्या प्रलोभनाला मी बळी पडलों.

## फ्रान्सला आलेला संशय

मो. मोलोटोफ यांनीं दाखविलेली आशा किती घातकी होती, याची मि. चेंबरलेन यांना पुरती कल्पना आली नाहीं तरी फ्रेंचांना तिचें खरें स्वरूप लगेच उमगलें. यामुळें ही अत्यंत भयप्रद सूचना मान्य करण्यापूर्वी फ्रेंच युद्धमंत्र्यांनीं सोव्हिएट सरकारला स्पष्ट शब्दांत विचारलें कीं आमच्याकडून मिळालेली सारी गुप्त माहिती रशियन अधिकाऱ्यांकडून जर्मनीला मिळणार नाहीं, असें आश्वासन आपण देऊं शकतां काय ? कारण दोन वर्षांपूर्वीच तुमचे मार्शल तुखाचेव्हस्की आणि इतर सात अत्यंत वरिष्ठ अधिकारी या सर्वांना जर्मनीला वश झाल्याच्या आरोपावरून देहांत शासन दिलें होतें. यावर मार्शल व्होरोशिलोफ यांनीं फ्रेंचांना उत्तर दिलें कीं मार्शल तुखाचेव्हस्की आणि त्यांचे सहकारी यांना स्टालिनविरुद्ध कट करण्याच्या अपराधाकरितां देहांत प्रायश्चित्त मिळालें. त्यांत जर्मनीचा संबंध इतकाच आला होता कीं आम्ही स्टालिनविरुद्ध बंड केल्यास तुम्ही रशियावर स्वारी करूं नका, अशा आशयाचें आश्वासन त्यांनीं जर्मनीकडे मागितलें होतें. या स्पष्टीकरणानें संतुष्ट होऊन फ्रेंच युद्धमंत्र्यांनीं रशियाशीं युद्धयोजनांची वाटाघाट करण्याचें मान्य केलें. फ्रँको-रशियन संधि झाल्यानंतर सुद्धा जर्मनीला माहिती मिळण्याच्या भीतीनें फ्रेंच युद्धविभागानें रशियाच्या युद्धविभागाशीं विचारविनिमय केला नव्हता. पण सरतेशेवटीं मि. चेंबरलेन यांचा सांसर्गिक मूर्खपणा त्यांना बाधला.

## रशियन संधीला पोलंडचा विरोध

अशा संशयपिशाच्चानें ग्रासलेलें फ्रान्सचें सामरिक शिष्टमंडळ ऑगस्ट महिन्यांत रशियाला गेलें, तेव्हां त्याला सामरिक संधीवर स्वाक्षरी करण्याचा अधिकारसुद्धां फ्रान्सच्या राज्यकर्त्यांनीं दिला नव्हता. या शिष्टमंडळानें रशियाचें वैमानिक सामर्थ्य काय आहे, त्याच्याजवळ रणगाडे किती आहेत, रशियाच्या आगगाड्यांची आणि वाहतुकीच्या इतर साधनांची परिस्थिति काय आहे, याचीच चिकित्सा आरंभिली. सामरिक संधीच्या वाटाघाटींच्या वेळीं असल्या अप्रासंगिक गोष्टींची चर्चा करण्याला रशियाचें शिष्टमंडळ सिद्ध नव्हतें. त्यांना सामरिक वाटाघाटींचा एकच अर्थ कळत होता. तो म्हणजे पोलंड आणि बाल्टिक राष्ट्रें यांच्यावर जर्मनीची स्वारी होण्यापूर्वीच रशियन सेनेला ते

देश व्यापून तिथें शत्रूच्या स्वागताची सर्व सिद्धता करावयाला मिळणें हाच होय. या रशियाच्या कल्पनेला पोलंडनें अगदीं शेवटच्या क्षणापर्यंत विरोध केला. जर्मनीचें संभाव्य आक्रमण टाळण्याकरितां आपण आपल्याच हातानें रशियाच्या हातावर पोलंडचें उदक सोडण्याची कल्पना तिथल्या राज्यकर्त्यांना लगेच मान्य होणें शक्य नव्हतें. या कल्पनेला पोलंडची संमति २३ ऑगस्टला मिळाली. त्याच्या आधीं दोन दिवस फ्रेंचांच्या सामरिक शिष्टमंडळाला सामरिक संधीवर स्वाक्षरी करण्याचा अधिकारहि मिळाला होता. पण त्यापूर्वीच जर्मनी आणि रशिया यांच्यांतील अनाक्रमणाच्या वाटाघाटी पूर्ण झाल्या होत्या. २४ ऑगस्टला जर्मनीच्या परराष्ट्रमंत्र्यांनीं मॉस्कोला जाऊन त्या संधीवर स्वाक्षरीहि केली.

## रशियाचा हेतु

रशियानें ॲंग्लो-फ्रेंच राष्ट्रांना फसवून जर्मनीशीं संधि कां केला याची इथें थोडी चर्चा केली पाहिजे. इंग्लंड आणि फ्रान्स यांच्याशी संधि केल्यास रशियाला लगेच युद्धांत पडावें लागलें असतें आणि जर्मनीशीं समेट केल्यानें त्याला तटस्थ राहतां येत होतें, हें तर उघडच आहे. पण त्याबरोबरच इतरहि अनेक दृष्टीनीं रशियाला ॲंग्लोफ्रेंचांशीं संधि करणें त्रासदायक होतें. असा संधि करण्यानें रशियाच्या राज्यविस्ताराला आळा घालण्याकरितां पहिल्या महायुद्धानंतर जीं कृत्रिम राष्ट्रें निर्माण केलेलीं होतीं, त्यांचें पालनपोषण करण्याचा भार रशियाला आपण होऊन पतकरावा लागला असता. या राष्ट्रांना पूतना मावशीप्रमाणें कम्युनिझमचें विषारी दूध पाजण्याची रशियाची सिद्धता होती. पण त्यांच्या संगोपनाचा आणि संवर्धनाचा भार रशियावर टाकण्याची इंग्रजांची कल्पना सर्वस्वीं अव्यवहार्य होती. जर्मनीशीं समेट केल्यानें रशियाला बाल्टिक समुद्रतीरावरील राष्ट्रें आत्मसात् करण्याला जर्मनीची अनुज्ञा मिळाली आणि पोलंडवरील चढाईच्या प्राप्तीच्या अर्ध्या वांट्याचें अभिवचन मिळालें. या राज्यविस्ताराव्यतिरिक्त आणखीहि एक लाभ आपल्याला होईल अशी रशियाची अपेक्षा होती. तो म्हणजे ॲंग्लो-फ्रेंच राष्ट्रांशीं लढून जर्मनी क्षीण झाला म्हणजे त्याच्यावर अचानक हल्ला करून त्याचा संपूर्ण पराजय करण्याची संधि आपल्याला लाभेल. रशियाची ही अपेक्षा मात्र सपशेल खोटी ठरली.

उलटपक्षीं एका वेळीं दोन आघाड्यांवर युद्ध करण्याची आपल्यावर पाळी

येऊं नये हा एकच हेतु मनांत बाळगून जर्मनीनें रशियाशीं समेट केला होता. जर्मनीचा हा हेतु जवळजवळ चार वर्षें तरी सफळ झाला हें युद्धाच्या पुढील इतिहासावरून कळून येईलच. या चार वर्षांच्या सुदीर्घ अवधींत जर्मनीला आपल्या प्रतिपक्ष्यांना शरण आणतां आलें नाहीं हा जर्मनीच्या सामरिक दौर्बल्याचा परिणाम होय. त्यामुळें युद्धारंभापूर्वी रशियाशीं समेट करण्याचें राजकारण चुकीचें होतें असें अनुमान निघत नाहीं.

## चेंबरलेनचे हताश उद्गार

जर्मनी आणि रशिया यांमधील अनाक्रमणाच्या संधीनें इंग्लंडच्या कुटिल राजनीतीचें मात्र पुरतें दिवाळें निघालें असल्याचें साऱ्या जगाला कळून आलें. या प्रकरणावर पार्लमेंटांत बोलतांना मि. चेंबरलेन यांनीं पुढील हताश उद्गार काढले आहेत. 'I do not attempt to conceal from this House that the announcement of the Russo-German pact came as a surprise and a surprise of a very unpleasant character. For sometime past there have been rumours about an impending change in the relations between Germany and the Soviet Government, but no inkling of that change had been conveyed either to us, or the French Government by the Soviet Government.' दुसऱ्या महायुद्धाच्या या इतिहासांत आतांपर्यंत अनावश्यक इंग्रजी अवतरणें टाळलीं होतीं. पण इंग्लंडच्या विसाव्या शतकांतील सर्वांत मूर्ख मुख्य प्रधानाचें आपल्याच मूर्खपणानें झालेल्या फसवणुकीचें वर्णन उतरून घेण्याचा मोह आवरेना. 'फलानुमेयाः प्रारंभाः' हा जेथें राजनीतीचा आद्य हेतु असतो तेथें रशियानें आपल्याला फसविणार असल्याचें आधींपासून कळविलें नाहीं असे केविलवाणे उद्गार काढणाऱ्या मुख्य प्रधानांची कींव करावी तितकी थोडीच आहे.

## युद्धाय कृतनिश्चयः

राजनैतिक युद्धांत याप्रमाणें इंग्लंडचा सपशेल पराजय झाला तरी म्यूनिचच्या




बेलजमवर हल्ला (पृ. ११९)

संधीनंतर जर्मनीशीं पुनश्च शरणागतीचा संधि करावयाचा नाहीं असा इंग्लंडचा कृतनिश्चय झाला होता. २२ ऑगस्टला जर्मन सरकाराकडे एक विशेष संदेश पाठवून इंग्लंडनें अशी घोषणा केली कीं, जर्मनी आणि रशिया या उभयतांचा संधि झाला असला तरी पोलंडचें रक्षण करण्याच्या इंग्लंडच्या निश्चयांत कांहींहि बदल झालेला नाहीं. या संदेशाबरोबरच मि. चेंबरलेन यांनीं जर्मनीच्या नेत्यांना एक पत्र लिहून त्यांना पोलंडशीं चालू असलेलें जर्मनीचें भांडण सामोपचारानें मिटविण्याची विनंति केली होती. ही विनंति करणें म्हणजे जर्मनीच्या जखमेवर मीठ चोळण्यासारखेंच होतें. कारण पूर्वयुरोपांत इंग्लंडचे कोणतेहि हितसंबंध नसतांना तेथील राजकारणांत निष्कारण लुडबुड करून इंग्लंडनेंच पोलंडला युद्धप्रवृत्त केलें होतें. नाहीं तर रशिया आणि जर्मनी यांच्यासारख्या शेजाऱ्यांच्या एकमताविरुद्ध जाण्याचें पोलंडच्या राजकीय दृष्टया जगांतील सर्वांत मूर्ख असलेल्या पुढाऱ्यांना सुद्धा धैर्य झालें नसतें. हे दोनहि संदेश सर नेव्हिल हेंडरसन यांनीं हेर हिटलेर यांना पोंचविले, तेव्हां जर्मनीच्या नेत्यांनीं त्यांचें कसें स्वागत केलें तें सांगायला नकोच.

## शांतिसूक्तांचें पठण

इतक्या थराला गोष्टी येऊन पोंचल्यानंतर युरोपांतील अनेक उच्चपदस्थ व्यक्तींनीं शांतिसूक्तांचें पठण आरंभिलें. २३ ऑगस्टला बेल्जमच्या राजांनीं भांडखोर राष्ट्रांना युद्ध न चेतविण्याची विनंति केली. दुसरे दिवशीं पोपमहाराजांनीं स्वतःच शांतिपाठ म्हटला. याच दिवशीं प्रे. रूझव्हेल्ट यांनीं इटालीचे राजे, पोलंडचे राष्ट्राध्यक्ष आणि जर्मनीचे नेते या तिघांनाहि संदेश पाठवून शांतता प्रस्थापित करण्याची विनंति केली. या संदेशांपैकीं पोलंडला धाडलेल्या संदेशाचें तेवढें अमेरिकेच्या अध्यक्षांना उत्तर आलें. इतर दोन संदेशांचीं प्रत्युत्तरें आलींच नाहींत. २५ ऑगस्टला हेर हिटलेर यांनीं ब्रिटिश सरकाराला कळविलें कीं, पोलंडचा प्रश्न मिटला आणि जर्मनीचे उपनिवेश परत मिळाले म्हणजे आपण शस्त्रसंन्यासपरिषदेंत भाग घेण्याला सिद्ध आहोंत. या निरोपाला इंग्लंडनें स्वस्थपणें २८ ऑगस्टला उत्तर दिलें कीं, पोलिश सरकार जर्मनीशीं वाटाघाटी करण्याला सिद्ध आहे, तर प्रथम त्यांच्याशीं बोलणीं चालू करा. याला जर्मनीनें लगेच २९ ऑगस्टला उत्तर दिलें कीं, समेटाचीं बोलणीं करण्या-

करितां ३० ऑगस्टच्या दिवशीं पोलंडचे अधिकृत प्रतिनिधि बेर्लिनला येऊन पोंचले तर आपण वाटाघाटी करण्याला सिद्ध आहोंत. याला इंग्लंडनें ३० ऑगस्टला प्रत्युत्तर दिलें कीं, जर्मनीनें पोलंडच्या विशेष प्रतिनिधींशीं तडकाफडकीं वाटाघाटी करण्याचा आग्रह धरूं नये. बेर्लिन येथील पोलिश राजदूताच्याद्वारां संथपणें पोलिश सरकाराशीं बोलणीं करावींत. या सूचनेचा खरा हेतु कालहरण करण्याचा होता हें उघड आहे. सामान्यतः २४ सप्टेंबरनंतर युरोपांत पावसाळा लागतो. पावसाळयांत पोलंडसारख्या काळया मातीच्या देशांत सैन्याच्या हालचाली करणें बरेंच अवघड होतें. या पावसाळयांतील चिखलावरच इंग्लंडची पोलंडच्या संरक्षणाच्या बाबतींत सारी भिस्त होती. तेव्हां ' कर्दम ' सेनापति पोलिश लोकांच्या साहाय्याला येऊन पोंचेपर्यंत युद्ध लांबणीवर टाकण्याचा प्रयत्न ब्रिटिश सरकार करीत होतें. यासाठींच जर्मनीनेंहि तत्काळ वाटाघाटी करण्याचा आग्रह धरला होता. या वाटाघाटींकरितां पोलंडचे प्रतिनिधि ३१ ऑगस्टपर्यंतहि आले नाहींत. तेव्हां जर्मनीनें १ सप्टेंबरला पोलंडवरील चढाईचा प्रारंभ केला. या वेळेपर्यंत सिन्योर मुस्सोलिनी यांनीं शांततेसाठीं चालविलेल्या प्रयत्नांना थोडेसें यश येऊन जर्मनीनें पोलंडच्या प्रश्नाची चर्चा चार राष्ट्रांच्या परिषदेंत करण्याचें मान्य केलें. पण जर्मन सैन्य पोलंडमधून बाहेर पडेपर्यंत इंग्लंडनें त्या परिषदेंत भाग घेण्याचें नाकारलें आणि जर्मनीला पोलंडमधून सैन्य परत नेण्याची अंतिम सूचना केली. या सूचनेप्रमाणें ३ सप्टेंबरपर्यंत जर्मनीनें आपलें सैन्य परत न घेतल्यामुळें त्या दिवशीं सकाळीं इंग्लंडनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें. इंग्लंडनें युद्ध पुकारल्यानंतरसुद्धां आपण या युद्धांत भाग घ्यावा कीं नाहीं याविषयीं फ्रान्समध्यें दुमत झालेंच आणि त्यामुळें ३ सप्टेंबरच्या संध्याकाळपर्यंत फ्रान्सनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें नव्हतें. पण संध्याकाळीं राक्षसांचें बळ वाढतें अशी जी समजूत आहे, ती खरी होऊन फ्रान्सनेंहि जर्मनीवर शस्त्र उचललें. अशा प्रकारें माझ्या आठवणींतील दुसऱ्या महायुद्धाचा प्रारंभ झाला. या युद्धारंभाच्या दिवशीं इथल्या भावे विद्यालयांत डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांचें शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानासंबंधीं व्याख्यान होतें आणि तें ऐकायला मीहि गेलों होतों असें मला स्मरतें. आपल्या पिढींतील या क्रांतिकारक क्षणीं सुबुद्ध भारतीयांनीं त्या युद्धारंभाच्या क्षणाला इतपतच महत्त्व दिलें असावें असें मला वाटतें. म्हणून मी या क्षुद्र गोष्टीचा इथें उल्लेख केला आहे.

: ९ :

# पोलंडवरील जर्मनीची चढाई

पोलंडवरील जर्मनीच्या चढाईचा इतिहास लिहायला बसल्यावर पहिला विचार मनांत येतो तो हा कीं, या स्वारीच्या वर्णनांत पांचदहा पानें वायां घालविण्याची कांहीं आवश्यकता आहे कां? कारण युद्धारंभापूर्वीचें जर्मनीचें सामर्थ्य आणि पोलंडचें दौर्बल्य या दोहोंचीहि आजच्या वाचकांना अतिशय चांगली कल्पना आलेली आहे. पण ही कल्पना युद्धारंभापूर्वी ज्यांनीं रशियाला झिडकारून पोलंडला आपल्या डोक्यावर बसवून घेतला होता, अशा इंग्लंड-फ्रान्समधील राष्ट्रप्रमुखांना सुद्धा नव्हती. पोलंडच्या नेत्यांना नव्हती हें तर सांगायलाच नको. त्यांचीं मनें मुळीं तोफखान्याच्या शोधापूर्वीच्या काळांतच विहार करीत होतीं. त्यांची अशी समजूत होती कीं, पोलिश घोडदळाच्या बारा पलटणींच्या जोरावर आपण जर्मनीची दाणादाण करून टाकूं. पोलंडची युद्धनीति ही शुद्ध चढाईच्या धोरणावर आधारलेली होती. मात्र चढाई कोणावर करावयाची हें तेवढें त्या दुर्दैवी राष्ट्राच्या नेत्यांना माहीत नव्हतें. कारण कोणत्याहि राष्ट्राला निश्चित असें परराष्ट्रीय धोरण नसलें म्हणजे त्या राष्ट्राच्या युद्धमंत्र्यांना भावी युद्धाची एखादी निश्चित योजना आंखतां येत नाहीं आणि तिच्या अनुरोधानें सैन्याच्या तळांची निवड, शस्त्रांची सिद्धता, शत्रूंना अडविण्याकरितां तटबंदीची योजना इत्यादि पूर्वसिद्धताहि करतां येत नाहीं. दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभीं पोलंडची अवस्था अक्षरशः अशीच होती. पोलंडच्या सीमेवरील प्रत्येक राष्ट्राशीं त्या दुर्दैवी देशाचें वैर होतें आणि त्यामुळें त्याला आपल्या युद्धयोजनांत कसलाहि एकसूत्रीपणा आणतां आला नव्हता. १९३९ च्या उन्हाळ्यापासून जर्मनीशीं भांडण उपस्थित झालें होतें, म्हणून त्या देशाच्या सीमेवर पोलंडनें आपलीं सैन्यें नेऊन उभीं केलीं होतीं, इतकेंच. जर्मनीशीं युद्ध अपरिहार्य असल्यास युद्धाला प्रारंभ आपण होऊन करतां येईल कीं नाहीं, त्याचप्रमाणें आपल्याला सोयीप्रमाणें युद्ध पुकारतां येत नसल्यास शत्रूच्या सीमेसन्निध स्वतःचें सैन्य नेऊन ठेवणें कितपत सुरक्षित आहे, अचानक

हल्ला झाला तर आपली काय अवस्था होईल याचा यत्किंचित् तरी विचार पोलंडच्या नेत्यांनीं केला होता असें एकंदर घटनांवरून वाटत नाहीं. त्यांची कल्पना अशी होती कीं, जर्मनीशीं युद्ध उपस्थित झाल्यास आपणच डांझिग आणि पूर्वप्रशिया या प्रांतांवर आपल्या सर्व सामर्थ्यानिशीं चढाई करावयाची आणि आपल्या इतर साऱ्या सीमांवर निकरानें शत्रूचा प्रतिकार करावयाचा. पण पोलंडच्या नेत्यांनीं असा कधीं विचार केला नव्हता कीं, स्वदेशाच्या सुविस्तृत सीमा सांभाळण्यापुरतें आपल्याजवळ सैन्य आहे कां नाहीं? युद्धारंभीं, जर्मनीच्या प्रतिकाराप्रीत्यर्थ पोलंडजवळ नांवाला साठसत्तर डिव्हिजन सैन्य होतें. पण त्या सैन्यापाशीं पांचशें रणगाडे आणि तितकींच विमानें होतीं कीं नव्हतीं याची शंकाच आहे. हें सैन्य पारीसच्या संधीनंतर निःशस्त्र केलेल्या जर्मनीचा पराभव करण्यालासुद्धां पुरें पडलें नसतें. मग हिटलेरच्या सैन्याशीं यशस्वी झुंज घेण्याचें नांव तरी कशाला?

## पोलंडची आत्मघातकी चूक

खरें म्हणजे पोलंडच्या सैन्यानें व्हिस्तुला, सान, बुग या नद्यांच्या पश्चिमेचा प्रांत संभाळण्याच्या भानगडींत न पडतां त्यांच्या पूर्वेला आपलें मुख्य सामर्थ्य एकत्रित करून तेथें जर्मनीचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न करावयाला पाहिजे होता. म्हणजे जर्मनीच्या रणगाड्यांच्या आणि तोफखान्याच्या विध्वंसक आघातांपासून त्याचा बचाव झाला असता आणि वार्सापर्यंत जर्मन सैन्याची प्रगति झाल्यानंतर त्या सैन्यावर प्रतिहल्ला चढविण्याची उत्कृष्ट संधि मिळाली असती. पण आपलें बहुतेक सर्व सैन्य रणगाड्यांच्या आघातापासून सुरक्षित अशा रणक्षेत्रांत राखून ठेवण्याऐवजीं पोलंडच्या नेत्यांनीं तें आघाडीवरील असुरक्षित क्षेत्रांत आणि अक्षरशः जर्मन तोफखान्याच्या माऱ्याखालीं लहान लहान तुकड्यांतून विखरून ठेवलें होतें. कारण जर्मनीला आपला तोफखाना आणि रणगाड्यांच्या तुकड्या पूर्व आघाडीवर एकत्रित करतां येतील अशी पोलंडच्या नेत्यांची कल्पनाच नव्हती. त्यांना वाटत होतें कीं, अँग्लो-फ्रेंच सैन्याच्या संयुक्त चढाईला तोंड देण्याकरितां बहुतेक जर्मन सैन्य पश्चिमेकडेच गुंतून पडेल, त्याचप्रमाणें अँग्लोफ्रेंचांच्या विमानदलाचा प्रतिकार करण्याकडेच जर्मनीच्या विमानदलाला लक्ष्य पुरवावें लागेल आणि पोलंडला आपला पराक्रम प्रकट

करण्याला यथेच्छ अवसर सांपडेल. पण पोलंडच्या नेत्यांची ही अटकळ इतकी सपशेल चुकली कीं, अँग्लोफ्रेंचांनीं जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारण्यापूर्वीच आघाडी-वरील पोलिश सैन्याचा चक्काचूर होऊन गेला. उलटपक्षीं अँग्लोफ्रेंच राष्ट्रप्रमुखांची कल्पना अशी होती कीं, पोलंड निदान हिंवाळयापर्यंत तरी टिकाव धरूं शकेल आणि त्याच कल्पनेला अनुसरून त्यांनी आपल्या युद्धाच्या योजना आंखल्या होत्या. तात्पर्य काय कीं, युद्धारंभानंतरच्या पहिल्या आठवड्यांतच जर्मनीच्या विरुद्ध शस्त्रें उचलणाऱ्या पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील शत्रूंच्या मेंदूंची दिवाळखोरी विश्वविख्यात झाली.

## जर्मनीची चढाई

३१ ऑगस्ट १९३९ ची मध्यरात्र ओलांडतांच जर्मन वैमानिकदलानें आपल्या पोलंडवरील चढाईचा प्रारंभ केला. त्या रात्रींच जर्मन वैमानिकांनीं पोलंडच्या विमानतळांवर पद्धतशीर रीतीनें अचानक छापे घालून त्या देशाच्या असावध आणि अननुभवी विमानदलाचा निःपात केला. या छाप्यांतून पोलंडचीं फारच थोडीं विमानें बचावलीं आणि जीं बचावलीं तींसुद्धां पेट्रोलच्या आणि विमानतळांच्या विध्वंसामुळें बहुतांशीं निरुपयोगी झालीं. त्यानंतर सूर्योदयाच्या पूर्वीच जर्मनीच्या पांच सैन्यांनीं सर्व सीमांवरून पोलंडवर चढाई केली. या सैन्यांत एकंदर पांच अवजड रणगाड्यांचे सेनाविभाग, चार हलक्या रणगाड्यांचे विभाग, सहा यंत्रचलित पायदळाचे विभाग आणि सरासरीं दोन सहस्रांवर विमानें होतीं. या सैन्याच्या नेत्यांत रोम्मेल, रुंडस्टेड, राइशेनाउ, लिस्ट, बोक, क्लाइस्ट इत्यादि पुढें प्रसिद्धीला आलेले सेनापति होते आणि पोलंडवरील स्वारीतच त्यांनीं यांत्रिक युद्धाचा पहिला अनुभव घेतला.

जर्मनीची चढाई चालू झाली, तेव्हां पोलंडच्या सैन्याची पुरती जमवाजमवहि झाली नव्हती. पायदळाचे पंचेचाळीस सेनाविभाग, घोडदळाच्या दहा पलटणी आणि रणगाड्यांची एक तुकडी एवढेंच सैन्य तेव्हां एकत्रित झालें होतें. या साऱ्या सेनाविभागांतील सैनिकांची संख्याहि पूर्ण नव्हती. पोलंडच्या सैन्य-भरतीचें काम संपूर्ण झालें असतें तरी तेवढ्यानें त्या देशाची प्रतिकारशक्ति फारशी वाढली असती असें नाहीं. कारण तोफा, विमानें आणि रणगाडे यांची उणीव नुसत्या संख्याबलानें भरून निघण्याजोगी नव्हती. पोलंडची सैन्यभरती

संपूर्ण झाली असती तर जर्मनीला मिळालेल्या युद्धबंद्यांची संख्या वाढली असती' इतकेंच. कारण पोलंडचें सर्वच सैन्य वेढून पकडणें, हाच मुळीं जर्मन सेनापतींचा संकल्प होता.

युद्धाच्या पहिल्याच दिवशीं पूर्व आणि पश्चिम प्रशिया यांच्यामधील पोलिश सैन्याचा इतर पोलंडशीं असलेला संबंध जर्मनीनें तोडला आणि पारीसच्या संधीनें विभक्त केलेल्या पूर्व आणि पश्चिम प्रशियाची हातमिळवणी केली. युद्धारंभाबरोबर मुख्य जर्मनीपासून विभक्त असलेल्या पूर्व प्रशियावर चढाई करण्याची पोलंडची इच्छा होती. पण उलटपक्षीं पूर्व प्रशियांतून पोलंडवर चढाई करण्याची जर्मनीनें सर्व सिद्धता करून ठेविली होती. युद्धाला आरंभ होतांच पूर्व प्रशियांतील तिसऱ्या जर्मन सैन्यानें वार्साच्या पश्चिमेकडील ब्रेस्टलिटोव्हस्क नगराच्या रोखानें चढाई आरंभिली. आठव्या जर्मन सेनेनें वार्टा नदीवरील पोलंडचीं सारीं बचावाचीं केंद्रें जिंकून पोसेन प्रांतांत प्रवेश केला. दहाव्या आणि चौदाव्या जर्मन सैन्याकडे सायलेशिया आणि गॅलिशिया या प्रांतांतील सर्व औद्योगिक केंद्रें, मार खाणाऱ्या पोलिश सैन्याकडून त्यांचा विध्वंस न होऊं देतां जिंकून घेण्याची कामगिरी आली होती. या सेनांनीं झेकोस्लोव्हाकियांतील दहा सहस्र फुटांहून अधिक उंचीचे अलंघ्य घाट ओलांडून पोलंडच्या असावध सेनांच्या पिछाडीवरच हल्ला केला आणि त्या सैन्याला विध्वंस करावयाला सवड न देतां क्रॅकौ आणि लेंबेर्गसारखीं महत्त्वाचीं औद्योगिक केंद्रें जिंकून घेतलीं.

युद्धाच्या पहिल्या आठवड्यांतच पोसेन, गॅलिशिया, सायलेशिया, टॉर्न इत्यादि प्रांतांतील पोलंडचीं सैन्यें जर्मन सैन्याकडून वेढलीं गेलीं आणि ९ सप्टेंबरला राइनहार्टच्या हाताखालील रणगाडे पोलंडची राजधानी जी वार्सा त्या नगरीच्या उपनगरांना भिडले. एवढ्या अवधांत जर्मन सैन्यानें १२५ ते १७५ मैल प्रगति केली होती आणि पोलंडची लढाई बहुतेक संपवीत आणली होती. या साऱ्या अवधींत जर्मन सैन्याचा लोड्झ येथें काय तो एक किरकोळ पराजय झाला होता. तें नगर जिंकून जर्मन सैन्य पुढें निघून गेल्यानंतर पोसेनकडून माघार घेत असलेल्या पोलिश सैन्याचा कांहीं भाग त्या नगराच्या आश्रयाला आला आणि तेथील जर्मन सैनिकांच्या तुकडीला हुसकून देऊन त्या सैन्यानें लोड्झ परत मिळविलें. पण त्यानंतर लगेच पुढें गेलेल्या जर्मनीच्या रणगाड्याच्या तुकड्यांनीं मागें वळून लोड्झमधील पोलिश सैन्याचा विध्वंस करून त्यांचा क्षण-

भंगुर विजयोत्सव बंद पाडला. हा एक अपवाद वगळल्यास साऱ्या पोलंडच्या चढाईंत जर्मनीला मार्गे असें सहसा पहावेंच लागलें नाहीं.

## पोलिश युद्धश्रेष्ठींचा पाठलाग

पोलंडच्या चढाईचा एक विशेष हा होता कीं, त्या दुर्दैवी राष्ट्रांच्या सेनापतींना कोणत्याहि सुरक्षित ठिकाणीं बसून रणक्षेत्रावरून येणाऱ्या वार्तांचा अभ्यास करून आपल्या सैन्याला कसल्याहि आज्ञा देतां येत नव्हत्या. पहिल्या दिवसापासूनच पोलंडच्या आकाशांत जर्मनीचें प्रभुत्व प्रस्थापित झाल्यामुळें जर्मन आकाश-दलानें पोलंडच्या युद्धश्रेष्ठींचा सर्वत्र पाठलाग चालविला होता. त्यामुळें त्यांची अगदीं अनुकंपनीय अवस्था झाली होती. लहानसहान सेनाविभागांच्या प्रमु-खांच्या निवासांवर जर्मन रणगाड्यांचे वारंवार हल्ले होत आणि ते परतविण्याचें साधन नसल्यामुळें प्रत्येक वेळीं पोलिश सेनानींना स्थलांतर करावें लागे. या सतत चाललेल्या पाठलागामुळें पोलिश सेनेचा एकसूत्रीपणा सर्वस्वीं नष्ट झाला होता आणि प्रत्येक तुकडीच्या अधिकाऱ्याला आपल्याच माहितीवर अथवा कल्पनाशक्तीवर अवलंबून रहावें लागे. सेनापतींच्या पाठलागाव्यतिरिक्त जर्मन विमानदलानें वाहतुकीच्या साधनांचा विध्वंस करण्याचें कार्यहि अविरत चाल-विलें होतें. या विध्वंसामुळें पोलंडची सैन्यभरती कधीं पुरती होऊं शकली नाही आणि आघाडीवरील सैन्याची माघार चालू झाल्यानंतर त्या पराजित सेनेच्या पुच्छप्रगतीलाहि फारसा अवसर मिळाला नाहीं.

१० सप्टेंबरच्या सुमाराला पोलंडच्या उरल्यासुरल्या सैन्यांना पक्का वेढा बसला आणि त्यांच्या विध्वंसासाठीं जर्मन सेनापतींनीं पराकाष्ठेची घाई आरंभिली. पण युद्धारंभापासून दहा दिवसांतच आपला संपूर्ण पराजय झाला आहे, याची पोलंडच्या सेनापतींना लौकर जाणिवच होईना. यामुळें वेढ्यांतून सुटका होण्याची यत्किंचितहि आशा नसतांना ते निर्वाणीच्या धैर्यानें तसेच लढत राहिले. या वेढलेल्या सैन्याचा विध्वंस करण्याकारितां जर्मनीच्या वैमानिकांनीं एक आठवडा-भर बाँबगोळ्यांचा नुसता पाऊस पाडला. तेव्हां कोठें त्या पोलिश सेनापतींच्या मेंदूत प्रकाश पडून त्यांनीं आपल्या सैनिकांची अकारण हत्या थांबविण्याकारितां शरणागति पतकरली. या शरणागतीच्या प्रसंगीं व्हिस्तुला नदीच्या वांकणांत

दीड लक्षाहून आधिक पोलिश सैनिक जर्मनीला शरण गेले. त्याचप्रमाणें रादोमच्या वेढ्यांत साठ सहस्र युद्धबंदी पकडले गेले.

## विद्वानांतील वादयुद्ध

दोन राष्ट्रांत युद्धें होऊन गेलीं म्हणजे मागाहून त्या दोन राष्ट्रांच्या विद्वानांत वादयुद्धें होतात असा सार्वत्रिक अनुभव आहे. त्याप्रमाणेंच पोलंडच्या लढाईसंबंधींहि एक लहानसें वादयुद्ध उद्‌भवलें आहे. त्या वादयुद्धांत पोलंडच्या पक्षपात्यांचें म्हणणें असें आहे कीं, १० सप्टेंबरनंतर जर्मनीच्या चढाईचा जोर कमी झाला होता आणि पोलंडच्या सैन्याची प्रतिकारशक्ति वाढली होती आणि १७ सप्टेंबरनंतर रशियानें एकाएकी पिछाडीकडून चढाई करून पाठींत खंजीर खुपसला नसता तर पोलंडच्या सैन्यानें जर्मन सैन्याला आणखी पुष्कळच दमविलें असतें. या विचारसरणीला आजकालच्या कम्युनिस्ट पोलंडमधील इतिहासांतून स्थान मिळालें आहे कीं नाहीं तें माहीत नाहीं. युद्ध चालूं असतांना लंडन टाइम्सप्रभृति पत्रांनीं वर वर्णिलेला प्रचार चालविला होता खरा. पण वस्तुस्थितीच्या दृष्टीनें त्या प्रचारांत कांहींच तथ्य दिसत नाहीं. कारण १७ सप्टेंबरलाच झेकास्लोव्हाकियांतून उत्तरेकडे चढाई करणाऱ्या जर्मन सैन्याचा पूर्व प्राशियामधून वार्साच्या पूर्वेकडील ब्रेस्टलिटोव्हस्क नगराच्या दक्षिणेला येऊन पोंचलेल्या जनरल गुडेरियान यांच्या रणगाड्यांच्या पथकाशीं संगम झाला. या संगमामुळें पश्चिम पोलंडमधील उरलेंसुरलें सैन्यहि वेढलें गेलें. प्रिपेटच्या दलदलींत आश्रय घेऊन हिंवाळयांतसुद्धां लढाई चालू ठेवण्याची पोलंडच्या सेनापतींची निर्वाणीची योजना कागदावरच राहून गेली. पोलंडवरील जर्मनीच्या चढाईत जनरल गुडेरियान यांच्या रणगाड्यांनीं बजावलेल्या कामगिरीचा विशेष उल्लेख करणें आवश्यक आहे. कारण त्यांच्या पथकानें प्रथम पश्चिम प्राशियांतून चढाई करून वार्टेतील पोलिश सैन्याचा विध्वंस करून पूर्व प्राशियांत प्रवेश मिळविला आणि तेथून नारेव्ह नदी ओलांडून ब्रेस्टलिटोव्हस्कच्याहि दक्षिणेपर्यंत प्रगति केली. अवघ्या दोन आठवड्यांत जनरल गुडेरियानच्या पथकानें सरासरीं चारशें मैलांची मजल मारली. जर्मन रणगाड्यांच्या असल्या अनपेक्षित साहसामुळेंच पोलंडचा निःपात करण्याचें कार्य जर्मनीला पावसाळयाचा प्रारंभ होण्यापूर्वीच उरकून घेतां आलें. या पर्जन्याभावर पोलंडचा आणि त्याच्या मित्रांचाहि

# अक्षराष्ट्रांचे नेते



हेर हिटलर



सि. मुसोलिनी

# दोस्त राष्ट्रांचे प्रमुख



मो. स्टालिन ( रशिया )



द गोल ( फ्रान्स )

फार भरंवसा होता. कारण पोलंडमध्यें चांगले राजमार्ग नसल्यानें पावसाळा चालूं होतांच आपल्या देशावर आक्रमण करूं पाहणारे रणगाडे कर्पूरतिलक हस्तीप्रमाणें चिखलांत रुतून बसतील आणि मग आपल्यासारख्या जंबूकांना मासचतुष्टयाचें भोजन लाभेल अशी पोलंडच्या नेत्यांची कल्पना होती. मानवांचा प्रत्येक दिवशीं विश्वासघात करणाऱ्या वातावरणावर विश्वास टाकून जे जर्मनीशीं शत्रुत्व करण्याचा जुगार खेळत होते, त्यांच्या साहसाकडे पाहून हसावें कीं रडावें हेंच कळत नाहीं.

## राजधानीचा स्पृहणीय प्रतिकार

वार्साच्या पूर्वेला जर्मन सैन्यांचा संगम झाल्यानंतर वार्सा, मोडलिन, वेस्टेर-प्लाट इत्यादि दुर्गांच्या आश्रयानें लढणाऱ्या पोलिश सैन्यांचा नायनाट करण्याचें कार्य तेवढें शिल्लक राहिलें होतें. तें कार्य सप्टेंबरच्या अंतापर्यंत जर्मन सैन्याच्या तुकड्यांनीं उरकून टाकलें. या सर्व युद्धांत वार्साच्या जनतेनें जर्मनांना कौतुकास्पद प्रतिकार केला आणि आपल्या राष्ट्राची कीर्ति राखली असें म्हणावें लागतें. राजधान्यांचीं नगरें हीं विलासाकरितां निर्माण झालेलीं नसून शत्रूंचा प्रतिकार करण्यांत तेथील नागरिकांनीं पूर्वेतिहासांत प्रमुख भाग घेतला असल्यानें त्यांना स्वाभाविकपणेंच अग्रस्थान प्राप्त झालें असतें. दुसरें असें कीं, प्रत्येक राष्ट्रांतील महत्त्वाकांक्षी लोक सामान्यतः राजधानीमध्यें एकत्रित झालेले असतात. असल्या मानी आणि महत्त्वाकांक्षी नागरिकांनीं प्रतिकाराची पराकाष्ठा न करतां शरणागति पतकरली तर त्या राष्ट्राचा पुनरुद्धार होण्याची आशा फारच कमी असते. आपल्या राजधानीच्या पराक्रमाविषयीं साऱ्या देशाच्या नागरिकांना अभिमान वाटत नसला तर 'निराश्रया हंत हता मनस्विता' असा विचार करून ते शत्रूंना सपशेल शरण जातात.

## पोलंडची चौथी फाळणी

वार्सा आणि मोडलिन् यांसारख्या दुर्गांतून एकाकी प्रतिकार करणाऱ्या पोलिश सैनिकांचें कितीहि कौतुक केलें तरी पोलंडचें युद्ध अपेक्षेपेक्षां फारच लौकर संपल्यानें जर्मन सैन्यानें तो सर्वच देश व्यापून टाकण्यापूर्वी त्याचा कांहीं भाग आपण व्यापण्याची रशियाला घाई करावी लागली. ही घाई रशियानें

केली नसती तर जर्मन सैन्य मॉस्कोच्या दिशेनें आणखी शेंदोनशें मैल पुढें सरकलें असतें आणि मग लिथुआनिया, लाटव्हियाप्रभृति बाल्टिक समुद्राशेजारचीं संस्थानें गिळंकृत करणेंहि रशियाला अवघड गेलें असतें. पोलंडनें श्वेत रशियाच्या प्रांतापैकीं कांहीं भाग बळकावला होता आणि तो परत मिळविण्याची रशियाला स्वाभाविकच इच्छा होती. तरीसुद्धां पोलंडच्या सैन्यानें जर्मनीचा यशस्वी प्रतिकार चालविला असता तर रशियानें बहुधा त्या देशाच्या पिछाडीवर अचानक आघात केला नसता. कारण इतक्या बलिष्ठांचा शेजार राजकारणांत नेहमींच तापदायक होतो. पण जर्मनीच्या घणाघातामुळें पोलंडच्या शासनसंस्थेचा चक्काचूर झालेला पाहून रशियाला आपलें सैन्य पाठवून त्या दुर्दैवी देशाचा पूर्वभाग व्यापावा लागला. युद्धारंभापूर्वी झालेल्या रूसो-जर्मन अनाक्रमणाच्या संधीच्या वाटाघाटींतच उभयतांनीं पोलंडवर आक्रमण करून त्याचा प्रांत वांटून घेण्याचा संकेत केला असावा. पण पोलंडची चौथी वांटणी करण्याची वेळ इतकी निकट आली आहे अशी तेव्हां कल्पना न झाल्यानें त्या वांटणीचा तपशील त्या वेळीं निश्चित केलेला नव्हता. हा तपशील ठरविण्याकरितां हेर फोन रिब्बेनट्रोप यांना पुन्हां एकदां मॉस्कोची वारी करावी लागली. या वांटणींत पूर्वी ऑस्ट्रियाच्या राज्यांत असलेला लेंबेर्ग प्रांत रशियानें बळकावला. तो अपवाद वगळल्यास रशियानें बुग नदीच्या पूर्वेकडील श्वेतरशियाचा प्रांतच काय तो आपल्या साम्राज्याला जोडला. उलटपक्षीं जर्मनीनें पूर्वी जर्मन साम्राज्यांत समाविष्ट असलेला पोलंडचा प्रांत परत जर्मनीला जोडून टाकला आणि उरलेल्या पोलंडला एक स्वतंत्र प्रांत बनवून त्या प्रांतांतच भोंवतालची सारी ज्यू आणि पोलिश वंशांची लोकसंख्या एकत्रित केली. या वांटणीनंतर हेर हिटलेर यांनीं एका भाषणांत असे उद्गार काढले होते की, या युद्धाचा निर्णय कोणत्याहि प्रकारें लागला तरी इतःपर युद्धापूर्वीचा पोलंड पुन्हा अस्तित्वांत येणें शक्य नाहीं. ती भविष्यवाणी अक्षरशः खरी झाली आहे असें निदान आज तरी दिसतें.

## रुमानियानें वाट दिली नाहीं

पोलंडवरील जर्मनीची स्वारी चालूं झाली तेव्हां त्याच्या साहाय्याला जाण्याची आपल्याला उत्कंठा असल्याचें प्रदर्शन करण्याकरितां ॲंग्लो-फ्रेंच राष्ट्रांनीं रुमा-

नियांतून आपलें सैन्य पोलंडला जाऊं देण्याची अनुज्ञा त्या देशाच्या सरकारा-जवळ मागितली. पण पोलंडच्या सीमांवरील राष्ट्रांत एकट्या रुमानियाचेंच त्याच्याशीं सख्य असूनसुद्धां आणि रुमानियाच्या सीमांचें रक्षण करण्याची हमी त्या वर्षीच्या वसंतांत इंग्लंडनें दिली असूनहि त्या लोभी आणि भीरु राष्ट्रानें आपलीहि पोलंडसारखीच अवस्था होण्याच्या भीतीनें अँग्लो-फ्रेंचांना वाट देण्याचें नाकारलें. हें एका अर्थी जर्मनीचें दुर्दैवच म्हटलें पाहिजे. कारण त्या निमित्तानें पोलंडबरोबरच जर्मनीला रुमानिया देशहि व्यापतां आला असता आणि मग १९४४मध्यें रुमानियन सरकारनें आणीबाणीच्या प्रसंगीं विश्वासघात केल्यामुळें रशियाशीं जीवनमरणाच्या युद्धांत गर्क झालेल्या जर्मन सेनेची जी दैना झाली तीहि झाली नसती. पण दैवाच्या उपहासप्रियतेचीं असलीं उदाहरणें सर्वत्रच पहावयास मिळतात.

: १० :

# रशियाचा युद्धप्रवेश

जर्मनी आणि रशिया या उभयतांनीं मिळूनच साम्राज्यविस्ताराची परस्पर-सहकारी मंडळी स्थापल्यामुळें जर्मनीबरोबरच रशियाचाहि युद्धांत प्रवेश झाला असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. १७ सप्टेंबरला पोलंडवर आक्रमण करून रशि-यानें या म्हणण्याची सत्यताहि जगाला पटवून दिली होती. आपल्या युरोपांतील साम्राज्यविस्ताराला सवड मिळण्याकरितां कोरियाच्या उत्तरसीमेवरील एका टेकडीच्या निमित्तानें जपानशीं उकरून काढलेलें युद्धहि रशियानें आदल्याच दिवशीं स्थगित केलें होतें. २९ सप्टेंबरला हेर फोन रिब्बेनट्रोप यांनीं मॉस्कोला दुसरी भेट देऊन पोलंडच्या वांटणीपत्रावर आपली स्वाक्षरी केली. त्याच दिवशीं एस्टोनियाच्या सरकारानेंहि आपल्या देशांत सैनिक, नाविक आणि वैमानिक तळ बांधण्याची रशियाला अनुज्ञा देऊन त्याच्याशीं परस्परसहकार्याचा संधि केला. याच नमुन्याचे संधि ५ आणि १० ऑक्टोबर या दिवशीं लाटव्हिया आणि लिथुआनिया यांच्या सरकारांनीहि मान्य केले. ७ ऑक्टोबरला वर उल्ले-खिलेल्या सर्व चिमुकल्या देशांतील जर्मन नागरिकांना जर्मन सरकारानें स्वदेशीं परत बोलाविलें. अशा प्रकारें पहिल्या महायुद्धानंतर रशियानें गमावलेले तीन प्रांत स्टालिननें बंदुकीची गोळीसुद्धां न वाजवितां एका पंधरवड्यांत परत मिळ-विले. आतां गमावलेल्या प्रांतांपैकीं फिन्लंड हा एकच प्रांत उरला होता.

## फिन्लंडचा निग्रह

फिन्लंडशीं रशियाचीं बोलणीं ९ ऑक्टोबरला चालू झालीं. पण पहिल्या आठवड्यापासूनच फिन्लंडचा मुकाट्यानें शरण जाण्याचा विचार दिसेना. बोलणीं चालूं झाल्यानंतर लौकरच फिन्लंडच्या सरकारानें असुरक्षित नगरांतील नागरि-कांना खेड्यांवर रहायला जाण्याची सूचना दिली. फिन्लंडची सीमा लेनिनग्राड-सारख्या महत्त्वाच्या नगरीला अगदीं लागून असल्यानें ती मागें हटवावी आणि

ताच्या तोंडाजवळील बेटें फिन्लंडनें आपल्याला द्यावींत, अशी रशियाची मुख्य मागणी होती. वास्तविक पाहतां रशियानें इतर सरकारांना घातलेल्या अटींच्या मानानें ही मागणी अगदीं सौम्य होती. पण फिन्लंडला रशियाविरुद्ध उठावणी करूनच स्वातंत्र्यप्राप्ति करून घ्यावी लागली असल्यानें रशियाविषयीं तेथील नेत्यांना पराकाष्ठेचा अविश्वास वाटत होता आणि पहिल्या महायुद्धानंतर झालेल्या स्वातंत्र्यसंग्रामाची उज्ज्वल स्मृति अद्यापि देदीप्यमान असल्यामुळें आत्मसंरक्षणाविषयीं त्यांना विश्वासहि वाटत होता. याकरितां त्यांनीं रशियाची मागणी सपशेल नाकारली. या नकारानंतर प्रथम रशियानें बोलणीं तशींच पुढें चालविण्याचा प्रयत्न केला. पण नोव्हेंबरच्या अंतीं एकाएकीं फिन्लंडसाठीं एक तोतया सरकार रशियांतच स्थापून स्टालिननें मार्शल मान्नेरहाइम यांच्या खऱ्या फिनिश सरकाराविरुद्ध युद्ध पुकारलें.

## फिनिश युद्धाचें कोडें

फिन्लंड आणि रशिया यांचें युद्ध हें दुसऱ्या महायुद्धांतील मला स्वतःला अद्यापि पुरतें न उकललेलें कोडें आहे. मार्शल गोएरिंग यांनीं एका भाषणांत सांगितलें होतें कीं त्या स्वारींत आपल्या सामरिक दौर्बल्याचें खोटेंच प्रदर्शन करून रशियानें जर्मनीच्या नेत्यांना चकविलें. या स्पष्टीकरणांत पुष्कळच अर्थ आहे. कोरियाच्या उत्तरसीमेवर जपानशीं लढाई उद्भवली असतां तेथील रशियन सैन्यानें शत्रुसैन्याबरोबर ज्या निग्रहानें टक्कर दिली, त्याचा शतांशसुद्धा फिन्लंडच्या लढाईच्या प्रारंभीं रशियन सैन्यानें दाखविला नाहीं. या लढाईंत वापरलेली रशियन सेनाहि अगदीं तिसऱ्या प्रतीची होती. त्याचप्रमाणें रशियानें फिन्लंडविरुद्ध युद्ध पुकारल्यानंतर इंग्लंड आणि फ्रान्स या दोनहि देशांतून फिन्लंडच्या साहाय्यासाठीं सैन्य पाठविण्याच्या निमित्तानें जी रशियाविरोधी चळवळ उत्पन्न झाली, तीहि अतिशय संशयास्पद होती. जणूं कांहीं जर्मनीशीं चालू असलेल्या युद्धानें अँग्लोफ्रेंचांची युद्धतृष्णा इतकी अनावर झाली होती कीं, याच वेळीं रशियाशीं युद्ध उकरून न काढल्यास ती शांत होणें अशक्यच होतें. व्यवहाराचा सामान्य नियम असा आहे कीं, एखादी व्यक्ति सकृद्दर्शनीं अगदीं मूर्खपणाचें कृत्य करीत असली तर तिच्या त्या वरकरणीं अचरट दिसणाऱ्या कृतीच्या मागें कांहींतरी गूढ कारस्थान असण्याचा संभव फार असतो. हाच

नियम फिन्लंडच्या निमित्तानें रशियाशीं युद्ध करण्यासंबंधीं इंग्लंड आणि फ्रान्स येथें झालेल्या आंदोलनाला लाविला पाहिजे. पहिल्या महायुद्धांतल्याप्रमाणें जर्मनीशीं रशियाचें युद्ध उपस्थित झाल्यास रशिया अगदीं एकाकी पडूं नये याकरितां फिन्लंडला साहाय्य करण्याच्या निमित्तानें उत्तर युरोपांत अँग्लोफ्रेंचांचा तळ निर्माण करण्याचा कांहीं अँग्लोफ्रेंच नेत्यांचा डाव होता आणि मि. होअर बेलिशासारख्या अधिकारभ्रष्ट मंत्र्यानें तेव्हां तो स्पष्टपणें बोलूनहि दाखविला होता. उत्तर युरोपांत अँग्लोफ्रेंचांचा बलिष्ठ तळ निर्माण झाला असता तर त्याचा उपयोग रशिया किंवा जर्मनी या दोघांच्याहि विरुद्ध प्रसंगानुरोधानें होऊं शकला असता. ही परिस्थिति लक्षांत घेतली म्हणजे रशियाच्या विरुद्ध फिन्लंडला ससैन्य साहाय्य करण्याची कल्पना सकृद्दर्शनीं जितकी अचरटपणाची दिसते, तितकी ती नसावी असें वाटूं लागतें. या प्रकरणीं रशियाचा अभिप्रायहि असाच असावा, अशी शंका येते. नाहीं तर अँग्लोफ्रेंच राष्ट्रांचीं सैन्यें फिन्लंडच्या सहायासाठीं सज्ज होत असतांनाच रशियानें फिन्लंडवर लादावयाच्या अटींची ब्रिटिश परराष्ट्रमंत्र्यांशीं चर्चा केली नसती.

## फिन्लंडचे डावपेंच

रशिया आणि फिन्लंड यांच्यामधील युद्धाचें प्रस्तुत इतिहासांत सविस्तर वर्णन करण्याचें कारण नाहीं. केवळ युद्धशास्त्रदृष्ट्या विशेष महत्त्वाच्या अशा कांहीं घटनांचा येथें उल्लेख केला म्हणजे पुरे. या युद्धाच्या प्रारंभीं रशियन सैन्यानें लादोगाचें सरोवर आणि फिन्लंडचें आखात यांच्यामधील कारेलियन संयोगभूमीवर बांधलेल्या मानेरहाइम तटबंदीवर हल्ला न करतां उत्तरेकडील असुरक्षित सीमा ओलांडून फिन्लंडच्या अंतर्भागांत शिरण्याचा प्रयत्न केला. या भागांत रशियन सैन्याला हुलकावण्या देत देत खोलवर आंत नेऊन वेढण्याचे डावपेंच फिन्लंडच्या नेत्यांनीं उपयोगांत आणले आणि ते यशस्वीहि झाले. फिन्लंडचा हिंवाळा साऱ्या जगांत सुप्रसिद्ध आहे. त्या हिवाळ्यांत उष्णतामान नेहमींच शून्याच्या खालीं पांचपासून पन्नास अंशांपर्यंत कुठें तरी असतें. या भयंकर थंडींत एकट्या सायबेरियांतील सैन्यच काय तें टिकाव धरूं शकतें. इतर सैन्यांचा तेथील हिंवाळ्यांत मुळींच निभाव लागत नाहीं. यामुळें फिन्लंडच्या अंतर्भागांत शिरलेल्या रशियन सैन्याला वेढून त्याचा विध्वंस करणें फिन्लंडच्या

सैनिकांना अगदीं सोपें जाऊं लागलें. १९३९ च्या डिसेंबरमध्यें रशियन सैनिकांना आपल्या देशांत खोलवर घेतल्यानंतर १९४० च्या जानेवारींत फिनिश सैनिकांनीं रशियन सैन्यांचा ठिकठिकाणीं पराभव केला. कित्येक ठिकाणीं तर रशियाच्या एकेका डिव्हिजनचाहि संपूर्ण विध्वंस झाला.

## युद्धयोजनेंत परिवर्तन

असला अनपेक्षित अनुभव आल्यानंतर रशियानें आपल्या युद्धयोजनेंत आमूलाग्र परिवर्तन करून फिन्लंडच्या सैनिकांना अनपेक्षित हालचाली करण्याला संधिच मिळूं द्यावयाची नाहीं असें ठरविलें. याकरितां रशियानें आतांपर्यंत अभेद्य मानलेल्या मान्नेरहाइम तटबंदीवरच हल्ला चढविला. तटबंदीच्या युद्धांत हालचालींचें महत्त्व फारसें नसतें. पुन्हा अर्वाचीन काळचीं शस्त्रास्त्रें अचल बचावापेक्षां चढाईलाच अधिक उपयुक्त असल्यानें तटबंदीच्या युद्धांत अचल बचाव करणाऱ्या पक्षाचीच अधिक हानि होते. दुसऱ्या महायुद्धापूर्वी तटबंदीवरील तोफखान्याच्या माऱ्यांतून बचावून तटबंदीला भिडणें अशक्यप्रायच होतें. पण दुसऱ्या महायुद्धांत रणगाडे आणि सैन्यवाहतुकीसाठीं वापरावयाच्या चिलखती मोटारगाड्या यांच्यामुळें तटबंदीला सैन्य भिडविणें अगदीं सोपें झालें होतें. एकदां सैन्य तटाला भिडलें म्हणजे ज्वालाक्षेपक, धूम्रक्षेपक आणि अग्निगोलक्षेपक या खऱ्या यंत्रांच्या आणि मानवी यंत्रांच्या साहाय्यानें तटावरील तोफा बंद पाडून तोफा चालविणाऱ्यांचा संहार करतां येतो. यामुळें दुसऱ्या महायुद्धांत अगदीं अभेद्य मानलेल्या तटबंद्यांच्याहि ठिकऱ्या उडाल्या आणि केवळ आत्मसंरक्षणाच्या धोरणाचा अजागळपणा सर्वांच्या प्रत्ययाला आला. तटबंदी निरुपयोगी करण्याची एक विशेष युक्तिहि रशियानें फिन्लंडच्या लढाईंत वापरली. ती म्हणजे प्रत्यक्ष तटबंदीवर आपल्या तोफांचा मारा न करतां तिच्या भोंवतालच्या साध्या भुईवर सहस्रावधि गोळ्यांचा वर्षाव करून तीच उखडून काढावयाची आणि तटबंदीचा आधारच नष्ट करून तिला वेडेवाकडे कोन करून कलूं द्यावयाची. बुरूज किंवा तट एकदां कलले म्हणजे त्यांच्यावरील तोफा नेम धरून मारा करूं शकत नाहींत आणि आपली तटबंदी म्हणजे आपल्या तोफखान्याचा सापळा मात्र होऊन बसते; १९४० च्या फेब्रुवारी महिन्यांत रशियानें मान्नेरहाइम तटबंदीवर असला भीषण भडिमार करून ती पायापासून उखडून

काढली आणि त्यामुळें फिन्लंडचीं सारीं प्रमुख नगरें उघडीं पडल्यानें त्या देशाला रशियाच्या पूर्वीपेक्षाहि कठोर अटी मान्य करून युद्ध थांबवावें लागलें.

## फिन्लंडची शरणागति

रशियाला शरण जाण्यापूर्वी फिन्लंडनें अँग्लोफ्रेंच राष्ट्रांना आपल्या रक्षणाकरितां तत्काळ सैन्य पाठविण्याची विनंति केली होती. या विनंतीप्रमाणें २६ फेब्रुवारीला फ्रान्सच्या मुख्य प्रधानांनीं फिन्लंडला कळविलें कीं ५०००० फ्रेंच सैन्य धाडण्याला आम्हीं सिद्ध आहोंत, आणि या सेनेच्या वाहतुकीचीहि सर्व व्यवस्था झालेली आहे. फ्रेंचांच्या इतकीच ब्रिटिश सेनाहि फिन्लंडला पाठविण्यासाठीं सिद्ध ठेवली असल्याची वार्ताहि मो. दालादिए यांनीं मार्शल मानेरहाइम यांना कळविली होती. ही सिद्धता करून अँग्लो फ्रेंच राष्ट्रांनीं नॉर्वे आणि स्वीडन या दोनहि राष्ट्रांना आपल्या सैन्याला वाट देण्याची विनंति केली होती. ही विनंति त्या दोनहि सरकारांनीं लगेच झिडकारली, हें सांगायला नकोच. पण फिन्लंडचें निमित्त करून नॉर्वेमध्यें उतरण्याला अँग्लो-फ्रेंच सैन्यें सिद्ध झालीं आहेत, इतकेंच नव्हे तर त्यांना वाहून नेण्याकरितां नौकांचीहि व्यवस्था झाली आहे, या वार्ता जर्मनीला कळल्यानंतर जर्मन युद्धश्रेष्ठींनीं साहाजिकपणेंच या योजनांचा प्रतिकार करण्याचा संकल्प केला. या प्रश्नाची अधिक चर्चा नॉर्वेवरील स्वारीच्या प्रकरणांतच करणें सोयीचें होईल.


बाल्टिक समुद्र
लिथुआनिया
डीनीया
कोनिगजबर्ग
डॅन्झिग
प्रशिया
बियालिस्टॉक
पोझंनन
वार्सा
लोड्झ
पो
स्कारडीस्को
क्रॅको
प्रेझमिझल
स्लोव्हाकिया
हंगेरी
रुमानिया

पोलंडची वांटणी (पृ. ८२)




नॉर्वे व स्वीडन (पृ. ८८)

: ११ :

# डेन्मार्कनॉर्वेवरील स्वारी

जर्मनीची नॉर्वे आणि डेन्मार्क यांच्यावरील स्वारी म्हणजे शार्विलकाच्या 'साहसे श्रीः प्रतिवसति' या सिद्धांताचें सर्वोत्कृष्ट निदर्शन होय. नॉर्वेमध्यें सैन्य न्यावयाचें तर तें जलमार्गानेंच नेणें भाग होतें. या जलमार्गावर जर्मनीची सत्ता चालत नव्हती, हें सांगायला नकोच. नौकांतून नेलेलें सैन्य परदेशांत उतरविण्याला आधीं परक्यांचीं बंदरें जिंकावीं लागतात. भूमीवरील युद्धांत मनुष्य दहा वाटांनीं आपलें उद्दिष्ट गांठूं शकतो. पण बंदरांतून प्रवेश मिळविण्याला एकाच ठराविक मार्गानें जावें लागतें आणि पाणसुरुंग, किंवा जलदुर्गावरील तोफा यांच्या सहायानें त्या मार्गाचें संरक्षण करणें अगदीं सोपें जातें. पुन्हा नॉर्वेवरील स्वारीच्या प्रसंगीं केवळ नॉर्वेच्या दुबळ्या सैन्याशींच नव्हे तर अँग्लोफ्रेंच सैन्याशीं आणि इंग्रजांच्या बलिष्ठ आरमाराशींहि आपल्याला टक्कर द्यावी लागेल, याची जर्मनीला अतिशय चांगली जाणीव होती. तरीसुद्धां जर्मनीनें हें साहस करावयाचें ठरविलें आणि तें यशस्वीहि करून दाखविलें.

जर्मनीनें जेव्हां नॉर्वे आणि डेन्मार्क यांच्यावर स्वारी करण्याचें निश्चित केलें? त्याच वेळीं निदान नॉर्वेच्या स्वातंत्र्यावर अतिक्रमण करण्याचा इंग्लंडचाहि निश्चय झाला होता. मि. चर्चिल हे प्रथमपासूनच तटस्थ राष्ट्रांना जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारण्याचा उपदेश करीत होते. ते स्वच्छच सांगत होते कीं जर्मनी आज ना उद्यां तुमच्यावर स्वारी करणारच आहे तर तुम्ही आतांच जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारून आमचीं सैन्यें आपल्या देशांत घ्या. पण 'हिमवति दिव्यौषधयः शीर्षे सर्पः समाविष्टः' अशी स्वतःची अवस्था असल्याचें जर्मनीशेजारच्या तटस्थांना पुरतें माहीत असल्यानें उद्यांचें मरण आजच ओढवून घेण्याचा चर्चिलमहाशयांचा उपदेश त्यांना मुळींच रुचला नाहीं. पण फिन्लंडला साहाय्य करण्याच्या निमित्तानें स्वारीची सेना आणि वाहतुकीच्या नौका एकत्रित केल्यानंतर तटस्थ राष्ट्रांना जर्मनीविरुद्ध उठविण्याचा उद्योग आपण आरंभिलाच पाहिजे असें त्यांना वाटूं लागलें. पांच एप्रिलला अँग्लो-फ्रेंच सरकारांनीं नॉर्वेच्या सरकाराला

अशा आशयाचा संदेश पाठविला कीं संयुक्त राष्ट्रें हीं लहान राष्ट्रांच्या स्वातंत्र्यासाठींच लढत असल्यामुळें इतःपर त्यांच्या तटस्थतेकडे संयुक्त राष्ट्रांना दुर्लक्ष्यच करावें लागेल. या संदेशाचा अर्थ उघडच होता.

## नॉर्वेची नाकेबंदी

एकट्या नॉर्वेच्या बाबतींत अँग्लो-फ्रेंच राष्ट्रांनीं इतकें निकरावर येण्याचें कारण असें होतें कीं स्वीडनचें लोखंड नॉर्वेच्या बंदरांतून आणि नॉर्वेच्या संरक्षणाखालील समुद्रांतून जर्मनीकडे जात असे. लोखंडावांचून युद्ध चालविणेंच अशक्य असल्यानें स्वीडनचें लोखंड जर्मनीला जाऊं न देणें हें अँग्लो-फ्रेंच राष्ट्रांचें एक प्रमुख कर्तव्यच होतें. पण नॉर्वेच्या तटस्थतेचा भंग करण्यावांचून जर्मनीकडे होणारी ही लोखंडाची निर्यात थांबविण्याचा अन्य उपाय नव्हता. ८ एप्रिलला इंग्रजांनीं नॉर्वेच्या संरक्षणाखालील समुद्रांत पाणसुरुंग पेरले आणि जर्मनीच्या नौकांचा लोखंडाच्या वाहतुकीचा मार्ग बंद केला. आपल्या या कृतीचे परिणाम काय होतील, याचा इंग्रजांनीं पुरता विचार केला नव्हता, किंवा या आघातानंतर जर्मनीकडून अपेक्षित असलेल्या प्रत्याघाताचा प्रतिकार करण्याची सिद्धता त्यांनीं केली नव्हती. या अदूरदर्शित्वाचें श्रेय मुख्यतः मि. चार्चिल यांनाच दिलें पाहिजे. कारण तेच यावेळीं इंग्लंडच्या नौदल-विभागाचे प्रमुख होते. असो, इंग्रजांनीं आपल्या तटस्थतेचा भंग करून पाणसुरुंग पेरल्याबद्दल नॉर्वेनें इंग्लंडचा तीव्र निषेध केला. पण इंग्लंड आणि नॉर्वे यांचें राजनैतिक युद्ध रंगण्याच्या पूर्वीच जर्मनीनें नॉर्वेवर स्वारी करून एकंदर युद्धाचें स्वरूपच पालटून टाकलें.

## डेन्मार्कचा ग्रास

डेन्मार्क आणि नॉर्वे या दोनहि देशांवरील स्वारी एकाच दिवशीं चालू झाली. त्यांपैकीं डेन्मार्कवरील स्वारी पहिल्याच दिवशीं संपल्यामुळें तिच्याविषयीं प्रथमच चार शब्द लिहून तें प्रकरण संपवून टाकलें पाहिजे. स्लेस्विग-होल्स्टाइन प्रांतांच्या निमित्तानें १८६४ मध्यें जर्मनीशीं युद्ध केल्या दिवसापासून डेन्मार्कच्या सरकारनें त्या राष्ट्राशीं पुन्हां केव्हांहि लढावयाचें नाहीं असा निश्चय केला होता. पहिल्या महायुद्धानंतर स्लेस्विग प्रांताचा कांहीं भाग

विजयी राष्ट्रांनीं जर्मनीपासून तोडून डेन्मार्कला जोडला, तेव्हां त्या कृत्याला डेन्मार्कनें मोठ्या कष्टानेंच संमति दिली. इतकेंच नव्हे तर जर्मनी आणि डेन्मार्क यांच्यामधील तटबंदीहि कोपनहेगनच्या सरकारानें पाडून टाकली होती. त्या सरकारानें अवघें ११००० सैन्य ठेवलें होतें. याला सैन्य म्हणावें कीं नाही याची मला शंकाच आहे. अशा गोगलगाईसारख्या स्वभावाच्या सरकारावर जर्मनीनें सहसा आक्रमण केलें नसतें. पण नॉर्वेच्या आक्रमणांत अडथळे येऊं नयेत म्हणून जर्मनीला डेन्मार्क देश व्यापावा लागला. डेन्मार्क व्यापण्याचें कार्य जवळजवळ अहिंसक पद्धतीनेंच पार पडलें.

## क्विसलिंगचा उपयोग

डेन्मार्कच्या उलट नॉर्वेची स्थिति होती. त्या देशाची लोकसंख्या डेन्मार्कहून कमीच असली तरी तो बराच विस्तृत होता. जर्मनी आणि नॉर्वे यांच्या सीमा परस्परांना भिडल्या नसल्यामुळें नॉर्वेच्या लोकांना जर्मनीची दहशतहि फारशी वाटत नसे. पुन्हां त्यांचा मुख्य धंदा नौकानयनाचा असल्यानें त्यांना इंग्लंडशी नेहमींच सख्य ठेवावें लागे. यामुळें नॉर्वेच्या लोकांना जर्मनीविषयीं मुळींच आपलेपणा वाटत नसे. एके काळीं नॉर्वेचे संरक्षणमंत्रि असलेले कुप्रसिद्ध क्विसलिंग यांचा पक्षच काय तो जर्मनीला अनुकूल होता. पण हा एकच पक्ष नॉर्वेच्या स्वातंत्र्याला विषाप्रमाणें मारक ठरला.

## जर्मनीचा अचानक छापा

नॉर्वेचे एके काळचे संरक्षणमंत्रीच जर्मनीच्या पक्षाला मिळाले होते हें लक्षांत घेतलें म्हणजे नॉर्वेचीं बंदरें व्यापतांना जर्मनीला फारसा अडथळा कां झाला नाहीं हें कळून येतें. अर्थात् जर्मनीनेंहि नॉर्वे व्यापण्याची सिद्धता आधींपासून काळजीपूर्वक करून ठेविली होती. फिन्लंडला साहाय्य करण्याच्या निमित्तानें अँग्लो-फ्रेंच सैन्यें नॉर्वेत उतरलीं तर जर्मन सैन्य लगेच नॉर्वे व्यापील अशी धमकी जर्मनीनें आधींपासून देऊन ठेविली होती. नऊ एप्रिलला स्वारीचा प्रारंभ होतांच नॉर्वेच्या अगदीं उत्तर टोंकाला असलेल्या नार्व्हिकपासून तों दक्षिण टोंकाला असलेल्या क्रिस्टियानसुंडपर्यंतचीं सर्व प्रमुख बंदरें जर्मनांनीं अचानक छापा घालून हस्तगत केलीं. यांत ट्रॉन्ड्हाइम, बेर्गेन, स्टाव्हांगेर,

ओस्लोप्रभृति साऱ्या प्रमुख बंदरांचा समावेश होत होता. याच वेळीं नॉर्वेतील सर्व विमानतळहि जर्मनांनीं व्यापून टाकले.

## जलमार्गाचें आधिपत्य जिंकलें

नॉर्वेवरील स्वारीचा मुख्य भार प्रथम जर्मनीच्या नौदलावरच पडला. आपल्या तळापासून सहस्रावधि मैल अंतरावर जाऊन ब्रिटिश नौदलासारख्या पहिल्या प्रतीच्या नौदलाला न जुमानतां इंग्रजांचा डोळा असलेलीं बंदरें हस्तगत करण्याच्या साहसांत जर्मन नौदलाची आतिशय हानि झाली. पण नॉर्वेसारखा जर्मनीला अगदीं निकट असलेला देश इंग्रजांच्या हातीं पडल्यास होणाऱ्या हानीचा विचार करून जर्मन युद्धश्रेष्ठींनीं आपल्या नौदलाची हानि मुकाट्यानें सोसली. जर्मनी आणि नॉर्वे यांच्यामधील समुद्रावर जर्मनीचें आधिपत्य तेव्हां नव्हतें. डेन्मार्क देश हस्तगत करून त्या देशांत विमानतळ आणि पाणबुड्यांचे तळ स्थापल्यानंतर, त्याचप्रमाणें डेन्मार्कच्या उत्तरेकडील आणि नॉर्वेच्या दक्षिणेकडील समुद्रतीरांवर तोफांच्या बातेऱ्या प्रस्थापित केल्यानंतर मग त्या दोन देशांमधील स्कागेर्राकच्या सामुद्रधुनीवर, जर्मनीचें वर्चस्व प्रस्थापित झालें. तोंपर्यंत त्या स्कागेर्राक सामुद्रधुनींत ब्रिटिश पाणबुड्यांचा आणि प्रथम इतर युद्धनौकांचाहि संचार चालू होता. त्या सामुद्रधुनींतून नॉर्वेकडे जाणाऱ्या किती तरी वाहतुकीच्या नौका जर्मनीच्या शत्रूंनीं बुडविल्या. पण या सर्व हानीला न जुमानतां जर्मनीनें नॉर्वेंत उतरलेल्या आपल्या सैनिकांना साहाय्य पाठविण्याचें कार्य चालूंच ठेवलें आणि सरतेशेवटीं आपल्या पाणबुड्यांच्या जोरावर स्कागेर्राकच्या सामुद्रधुनीचें आधिपत्य जिंकून घेतलें.

## चर्चिल यांचा साहसाचा अभाव

या वेळीं खरें म्हणजे ब्रिटिश नौदलानें माघार घ्यावयाला नको होती. नॉर्वेच्या स्वारींत जर्मनीच्या आठ विनाशिका, एक मोठें क्रूझर आणि एक लहान क्रूझर या साऱ्यांनीं समुद्राचा तळ पाहिला होता. सर्वांत मोठ्या युद्धनौकेपासून इतर अनेक युद्धनौकांची बरीच मोडतोड झाली होती. अशा वेळीं स्कागेर्राकची लढाई तशीच पुढें चालवून नॉर्वेच्या दक्षिणेचीं कांहीं बंदरें ब्रिटिश नौदलानें

जर्मनीची 'बस' खरोखरच चुकली असती. पण चर्चिलसारख्या नौसाधनोद्धतालासुद्धा हें साहस करण्याचा धीर झाला नाही.

## विमानदलाची कामगिरी

युद्धशास्त्राचे सारे सिद्धांत धाब्यावर बसवून जर्मनीनें नऊ एप्रिलला नॉर्वेच्या सहा बंदरांतून मिळून सरासरी ७००० सैनिक उतरवून तो विस्तृत देश हस्तगत करण्याचा प्रयत्न आरंभिला होता. या आक्रमकांचा प्रतिकार करण्याला नॉर्वेच्या सरकाराजवळ सरासरी चाळीस सहस्र सैन्य सिद्ध होतें. त्याव्यतिरिक्त ब्रिटिशांचें बलिष्ठ नौदल नॉर्वेच्या सरकाराला लागेल तें साहाय्य देण्याला एका पायावर उभें होतें. असें असून जर्मनीनें पहिल्या दिवशीं अचानक छापा घालून जिंकलेल्या बंदरांपैकीं एकहि बंदर आपल्या शत्रूंना परत घेऊं दिलें नाहीं. या अभूतपूर्व घटनेचें श्रेय मुख्यतः मार्शल गोएरिंग यांच्या विमानदलाला दिलें पाहिजे.

जर्मन नौदलानें पहिलीं बंदरें जिंकल्यानंतरच्या साऱ्या युद्धाचें दायित्व जर्मन वैमानिकदलानें स्वतःकडे घेतलें होतें. नार्व्हिकपासूनच्या सर्व बंदरांतील जर्मन सैनिकांना अन्न आणि शस्त्रसामुग्री पुरविणें, एकाकी पडलेल्या सैन्याच्या तुकड्यांना परस्परांची माहिती पुरविणें, प्रसंगविशेषीं सैनिकांच्या नव्या तुकड्या नॉर्वेंत आणून उतरविणें, समुद्रतीरासन्निध येऊं पाहणाऱ्या शत्रूच्या नौदलांवर हल्ले करणें, अँग्लोफ्रेंच सैन्य नॉर्वेंत उतरतांच त्याला पाय रोवण्याचीसुद्धां सवड न देतां त्याच्यावर अग्निगोलकांची वृष्टि करणें इत्यादि सर्व कार्यांचा भार जर्मन युद्धश्रेष्ठींनीं आपल्या विमानदलावर टाकला होता आणि हा सारा भार त्या विमानदलानेंहि लीलेनें उचलला. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे नॉर्वेच्या स्वारींत जर्मनीनें आपलें वैमानिकदलच नौदलासारखें वापरलें आणि हा प्रयोग पूर्णपणें यशस्वी झाला.

## ब्रिटिशांचें आगमन

स्वारीच्या प्रारंभापासून पहिल्या आठवड्यांतच जर्मनीनें स्कागेरॉकची सामुद्रधुनी जिंकून घेतल्यामुळें तेव्हांपासून नॉर्वेंत उतरलेल्या सैनिकांना युद्धसामुग्री पोंचविणें आणि नवीन सैन्य उतरविणें हीं कामें नौकांतून होऊं लागलीं आणि विमानदलावरील भार कांहीं अंशानें कमी झाला. या अवधींत विमानदलानें

सहस्रावधि नवीन सैनिक नॉर्वेंत उतरविले होते आणि हलक्या 'रणगाड्यांपासून साऱ्या शस्त्रांचा त्यांना पुरवठा केला होता. यामुळें १५ एप्रिलला ब्रिटिशांनीं जेव्हां नॉर्वेंत अनेक ठिकाणीं आपलें सैन्य उतरलें असल्याची घोषणा केली, तेव्हां जर्मनांचें त्या देशांत घट्ट पाय रोवले गेले होते. दुसरी गोष्ट अशी कीं, नॉर्वेंत उतरविलेलें ब्रिटिश सैन्य केवळ तिसऱ्या प्रतीचें होतें. पहिल्या प्रतीच्या जर्मन सैन्याशीं लढण्याची त्याची सिद्धताच नव्हती. जर्मनीनें यदाकदाचित् नॉर्वेवर स्वारी केलीच तर नॉर्वेच्या दक्षिणेकडील बंदरांत सैन्य उतरवून जर्मनांना तात्पुरता प्रतिकार करावा अशी इंग्लंडच्या युद्धश्रेष्ठींची पहिली योजना होती आणि या योजनेच्या अनुरोधानें त्यांनीं स्वारीला धाडावयाच्या सैन्याची निवड केली होती. या आघाडीच्या सैन्यानें जर्मनांना रोखून धरल्यानंतर इंग्लंडचें पहिल्या प्रतीचें सैन्य आपल्या बलिष्ठ नौदलासह नॉर्वेच्या साहाय्याला यावयाचें होतें. पण जर्मन लोक त्यांच्या बारशाला जेवले असल्यानें त्यांनीं पहिल्याच दिवशीं नॉर्वेतलि सारीं प्रमुख बंदरें व्यापून टाकली आणि ब्रिटिश युद्धश्रेष्ठींची पहिली योजना निरर्थक ठरविली.

## पाय रोवण्याचा प्रयत्न

नॉर्वेच्या प्रमुख बंदरांतून सैन्य उतरविण्याची पहिली योजना विफल झाल्यामुळें अँग्लोफ्रेंच राष्ट्रांना त्या बंदरांच्या शेजारीं सैन्यें उतरवून बंदरें जिंकण्याचा प्रयत्न करावा लागला. या बंदरांपैकीं ओस्लो बंदर हें सर्वोत्कृष्ट होतें. पण त्या राजधानीच्या बंदरांत जर्मन सैन्य फार मोठ्या प्रमाणावर उतरल्याच्या कंड्या पिकल्या असल्यामुळें अँग्लोफ्रेंचांनीं आपलीं सैन्यें ट्रॉंडहाइम बंदराच्या दक्षिणेला आणि उत्तरेला उतरविलीं. या बंदरापासून नॉर्वेच्या अंतर्भागांत सैन्य नेणें सोपें होतें आणि येथून उत्तर भागाचा दक्षिण भागाशीं असलेला संबंध तोडणेंहि शक्य होतें. ट्रॉंडहाइमच्या दक्षिणेला आणि उत्तरेला उतरलेल्या सैन्यानें पहिल्याप्रथम पूर्वेकडे प्रगति करून नॉर्वेच्या सैन्याशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न केला. पण या वेळेपर्यंत त्या सेनेची बहुतेक गठडी वळली असल्यानें नॉर्वेच्या परराष्ट्रमंत्र्यानें अँग्लोफ्रेंच सैन्याला विनंति केली कीं, तुम्ही प्रथम ट्रॉंडहाइमच्या जर्मन सेनेवर हल्ला करा आणि मग सावकाश नॉर्वेजियन सैन्याचा शोध करा. या सूचनेप्रमाणें नामसोसला उतरलेल्या सेनेनें ट्रॉंडहाइमवर चढाई केली. तेव्हां

त्या खाडींतील जर्मन युद्धनौकांनीं अँग्लोफ्रेंच सेनेवर निकराचा मारा करून तिला पिटून लाविलें. खरें म्हणजे असल्या प्रसंगीं अँग्लोफ्रेंच सैन्यानें मागचापुढचा विचार न करतां सरळ ट्रॉंडहाइम बंदरावर चाल करावयाला हवी होती. कारण ज्या नामसोस आणि आंडाल्सनेस बंदरांत तें सैन्य उतरलें होतें, तेथील बंदरांतून अवजड युद्धसामुग्री उतरवून घेण्याची कांहींच सोय नव्हती. त्याचप्रमाणें स्वारीच्या सैन्याबरोबर विमानविनाशक तोफा देण्याचीहि इंग्लंडच्या युद्धविभागाला शुद्ध नसल्यामुळें विमानहल्ल्यांपासून त्याचें संरक्षण होणेंच अशक्य झालें होतें. अँग्लोफ्रेंच सैन्यें उतरल्यानंतर पांच दिवसांनीं जर्मन विमानदलानें त्या मच्छीमारी नौकांच्या बंदरांवर आणि तेथें उतरलेल्या सैन्यावर बॉंबवृष्टि आरंभिली. या वृष्टीमुळें त्या दोनहि बंदरांचा संपूर्ण विध्वंस झाला.

## ब्रिटिशांचें निर्गमन

ट्रॉंडहाइमच्या उत्तरेला उतरलेल्या अँग्लोफ्रेंच सैन्याला नॉर्वेच्या अंतर्भागांत मुळींच प्रगति करतां आली नाहीं. दक्षिणेला आंडाल्सनेसला उतरलेल्या सैन्यानें मात्र अंतर्भागांत प्रवेश करून लोहपथावरील डॉंबास, स्टोएरेन यांसारखीं प्रमुख नगरें हस्तगत केलीं. पण रणगाडे, अवजड तोफा, विमानविनाशक तोफा इत्यादि युद्धसामुग्रीच्या अभावीं त्या सैन्यालाहि जर्मन सैन्याशीं बरोबरीच्या नात्यानें टक्कर देतां येईना. पुढें तर तें सैन्य वेढलें जाण्याचाच जेव्हां धोका उत्पन्न झाला, तेव्हां त्यानें मुकाट्यानें माघार घेतली. याप्रमाणें संपूर्ण अपयश पदरीं पडल्यानंतर अँग्लोफ्रेंच सरकारांनीं मेच्या पहिल्या आठवड्यांत आपलीं सैन्यें दक्षिण नॉर्वेमधून काढून घेतलीं. हीं सैन्यें परत गेलीं, तेव्हां त्यांची ‘ बस ’ जरी चुकली नाहीं तरी त्या वाहनांतून जाणाऱ्या उतारूंप्रमाणेंच तीं रिकाम्या हातानें परत गेलीं. हीं सैन्यें परत जात असतां जर्मन विमानांनीं त्यांच्या संरक्षणार्थ आलेल्या तीन विनाशिका बुडवून ब्रिटिश नौदलालाहि चांगलाच हात दाखविला.

मेच्या प्रारंभीं दक्षिण नॉर्वेची लढाई संपली तरी उत्तर नॉर्वेतील लढाई तशीच पुढें चालूं होती नॉर्वेच्या स्वारीच्या प्रारंभापासून नार्व्हिक बंदरांतील जर्मन सेनेला ब्रिटिश नौदलानें आणि सैन्यानें वेढा घातला होता. २८ मेला या स्थळीं ब्रिटिशांना यश येऊन त्यांचें सैन्य नार्व्हिक नगरांत शिरलें. तरीसुद्धां तेथील जर्मन सैन्य त्यांना शरण गेलें नाहींच. त्यानें अंतर्भागांत माघार घेऊन लढाई तशीच

चालू ठेविली. या वेळीं ब्रिटिशांची फ्रान्समध्यें ड्युंकेर्कहून माघार घेण्याची सिद्धता झाली होती. अशा दिवसांत नार्व्हिकचा लढा पुढें चालू ठेवण्यांत अर्थ नाहीं, असें ठरवून इंग्लंडच्या युद्धविभागानें तेथूनहि आपलें सैन्य परत घेतलें.

## निर्गमनांत नौदलाची हानि

नार्व्हिकमधून संयुक्त राष्ट्रांचीं सैन्यें परत जाऊं लागलीं असतांना जर्मनीच्या शार्नहॉर्स्ट आणि ग्नाइसेनाउ या सुप्रसिद्ध युद्धनौकांनीं इंग्लंडची ग्लोरियस नांवाची एक विमानग्राहक नौका, दोन विनाशिका, एक तेलवाहू नौका आणि एक पुरवठ्याची नौका यांना समुद्राचा तळ दाखविला. दक्षिण नॉर्वेतील माघारीच्या प्रसंगीहि जर्मनीनें सैन्यवाहक नौकांपेक्षां युद्धनौका बुडविण्याकडेच विशेष लक्ष्य दिलें होतें. इंग्रजांच्या सैनिकांपेक्षा इंग्रजांच्या नौदलावरच जर्मन विमानदलाचा अधिक कटाक्ष असल्याचें पुढें ड्युंकेर्कच्या पिछेहाटीच्या प्रसंगींहि दिसून आलें, पण नौदलांतील सर्वांत बलाढ्य नौका बुडवूं शकतील, इतके प्रचंड अग्निगोल करण्याकडे जर्मनीनें दुर्लक्ष्यच केलें होतें. नॉर्वेच्या युद्धांतच इंग्लंडची ४२००० टनांची रॉडने ही युद्धनौका जर्मन विमानांच्या तावडींत सांपडली असतां तिच्यावर टाकलेल्या सहस्र पौंड वजनाच्या अग्निगोलानें तिची सांगण्याजोगी कांहींच हानि झाली नाहीं. उलटपक्षीं युद्धाच्या शेवटच्या दिवसांत द्वादश सहस्र पौंड वजनाचा प्रचंड अग्निगोल टाकून इंग्लंडनें जर्मनीची टिरपिट्झ ही युद्धनौका रसातळाला पोंचविली. सांगण्याचा मुद्दा हा कीं, नौदलाचा विध्वंस करण्याच्या दृष्टीनें जर्मनीनें आपल्या विमानदलाची वाढ केलेली नव्हती. भुईवरील युद्धाच्या दृष्टीनेंच त्या राष्ट्रानें आपलें वैमानिक सामर्थ्य वाढविलें होतें आणि त्या कार्यक्षेत्रांत तें अत्यंत यशस्वीहि ठरलें.

नॉर्वेच्या युद्धांत अँग्लो-फ्रेंचांचा सपशेल पराभव होण्याचें एक प्रमुख कारण हें होतें कीं, नौदल, विमानदल आणि सैन्य या सर्वांनीं परस्परांशीं सहकार्य करून युद्धयोजना आंखण्याची आणि ती सिद्धीला नेण्याची आवश्यकता इंग्लंडला अद्यापि पटली नव्हती. जर्मनींत हीं तीनहि दलें एकाच संरक्षणमंत्र्याच्या अधिकाराखालीं असत आणि त्यामुळें त्यांचा एकांगीपणा नष्ट होऊन आधुनिक युद्धाच्या सर्वव्यापी स्वरूपाची त्यांना यथार्थ कल्पना आली होती. त्याचप्रमाणें त्यांच्यांतील परस्परांविषयींच्या मत्सरालाहि आळा पडला होता. पण इंग्लंड




फ्रान्स व जर्मनीच्या सरहद्दी (पृ. ९०)

हें नेहमींच युद्धशास्त्रांत मागसलेलें राष्ट्र असल्यामुळें नॉर्वेतील पराजयाचें कडू कोयनेल गिळेपर्यंत आधुनिक युद्धशास्त्राची त्या राष्ट्राला कल्पनाहि आली नव्हती.

## चेंबरलेनचा राजकीय अंत

नॉर्वेमधील पराजयामुळें चेंबरलेनमंत्रिमंडळाचें आयुष्य संपुष्टांत आलें. त्या स्वारीच्या प्रारंभीं हिटलेरची ' बस ' चुकली असल्याची सुवार्ता मि. चेंबरलेन यांनीं आपल्या देशबांधवांना सांगितली होती. पण नॉर्वेतील स्वारीत प्रकट झालेल्या अंदाधुंदीमुळें इंग्लंडच्या जनतेला इतकें नक्की कळून आलें कीं, हिट-लेरची ' बस ' प्रसंगविशेषीं चुकत असली तरी त्याच्याजवळ तें वाहतुकीचें अर्वाचीन यंत्र तरी आहे, पण आपल्या मंत्रिमंडळाजवळ मात्र भार वाहण्या-साठींच जन्माला आलेल्या एका प्राण्यावांचून दुसरें कोणतेंच वाहतुकीचें साधन नाहीं. वास्तविक पाहतां युद्धशास्त्राच्या नियमाप्रमाणें नॉर्वेच्या स्वारींत हिटलेरचा सपशेल पराजय व्हावयाला हवा होता. पण शत्रूचें साहस त्याच्या अंगावर उलटविण्याला स्वतःची युद्धसाधनांच्या दृष्टीनें आणि युद्धशास्त्रविषयक नवीन कल्पनांच्या दृष्टीनें जी सिद्धता असावी लागते, तिच्या अभावीं हिटलेरच्या साहसापासून इंग्लंडला कांहींच लाभ करून घेतां आला नाहीं. यामुळें इंग्लंडनें चेंबरलेनला काढून चार्चिलला मुख्य मंत्री केलें.

: १२ :

# पश्चिम आघाडीवरील सामसूम

दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभापासून तों १९४० च्या मे महिन्यापर्यंत पश्चिम आघाडीवर सामान्यतः सामसूम होती, असें म्हणतां येईल. युद्धारंभानंतर ८ सप्टेंबरला फ्रेंचांनीं जर्मनीवर चढाई आरंभिली आणि सारब्रुकेन, सारगेमुंड इत्यादि लहानलहान जर्मन नगरांच्या दिशेनें दोनतीन मैल प्रगति केली. या चढाईंत फ्रेंचांनीं जर्मनीचा सरासरी ४० चौरस मैल प्रदेश हस्तगत केला. ही चढाई चालूं झाल्यापासून एका आठवड्यांतच थांबली. कारण तोंपर्यंत पोलंडची जर्मनीनें गठडी वळविली होती. पुढें १६ ऑक्टोबरच्या सुमाराला पोलंडच्या युद्धांत विजयी झालेले जर्मनीचे सैनिक पश्चिम आघाडीवर येऊन पोंचतांच जर्मनीच्या सीमेचें उल्लंघन करणाऱ्या फ्रेंच सैनिकांनीं लगेच माघार घेतली आणि ते आपल्या माजिनो तटबंदीच्या आश्रयाला येऊन राहिले. या वेळेपासून पश्चिम आघाडीवर युद्धकाळीं अत्यंत विचित्र दिसणारी शांतता प्रस्थापित झाली. या शांततेच्या काळांत माजिनो आणि सीगफ्रीड या दोन तटबंद्यांच्या मधील युद्धक्षेत्रांत टेहेळ्यांच्या हालचाली मात्र चालूं असत. या हालचालींतून-सुद्धा जर्मनीचे जितके युद्धबंदी पकडले जात त्याच्या चौपट फ्रेंच सैनिक शत्रूंच्या हातीं सांपडत.

## ब्रिटिशांची मार्गप्रतीक्षा

ऑक्टोबरपासून मेपर्यंतच्या अवधींत जर्मनीनें पश्चिम आघाडीवर कांहींच हाल-चाल कां केली नाहीं याचीं कारणें आतां सांगितलीं पाहिजेत. यांपैकी एक महत्त्वाचें कारण असें होतें कीं, पोलंडची लढाई संपल्याबरोबर लगेच जर्मनीनें फ्रान्सवर चढाई केली असती तर त्या चढाईनें एकट्या फ्रान्सचाच कांटा निघाला असता, इंग्लंडचा निघाला नसता. कारण युद्धारंभापासून पांच आठवड्यांत फ्रान्समध्यें अवघें दीड लक्ष इंग्लिश सैन्य उतरलें होतें. इंग्लंडचें सैन्य, शस्त्रसामुग्री आणि मोटारीप्रभृति वाहतुकीचीं साधनें मोठ्या प्रमाणावर फ्रान्समध्यें उतरल्यावांचून

पश्चिमयुरोपांत होणाऱ्या पराभवाचा खरा धक्का इंग्लंडला जाणवला नसता. तेव्हां इंग्लंडला रंगणांत ओढून आणण्याच्या दृष्टीनें जर्मनीनें फ्रान्सवर चढाई करण्याला विलंब लावणेंच इष्ट होतें. दुसरें कारण असें कीं, इंग्लंड आणि फ्रान्स यांच्याशीं निर्वाणीची लढाई लढण्यांत जर्मनसेना गुंतली असतांना पूर्वेकडून रशियानें जर्मनीवर अचानक हल्ला केल्यास तो थोपवून धरण्याइतकी त्या वेळीं जर्मनीची युद्धसिद्धता झालेली नव्हती. यामुळें जर्मनीनें निदान तीनशें डिव्हिजन सैन्य उभारल्यावांचून पश्चिम आघाडीवर चढाई करावयाची नाहीं असें ठरविलें होतें. यांपैकीं १२० डिव्हिजन सैन्य जर्मनीनें युध्दारंभापासून फ्रान्सवरील चढाईला प्रारंभ होईपर्यंतच्या काळांतच उभें केलें. इतकें सैन्य उभें करण्याला पहिल्या महायुध्दांत जर्मनीला चार वर्षें लागलीं होतीं, हें लक्ष्यांत घेतलें म्हणजे नाझी जर्मनीच्या कर्तृत्वाची वाचकांना यथार्थ कल्पना येईल.

## नव्या सैन्याचें शिक्षण

या नवीन उभारलेल्या आणि जुन्या सैन्यांचें शिक्षण सारखं चालूंच होतें. साऱ्या जर्मनीला कवाईत शिकविण्याच्या मैदानाचेंच स्वरूप आलें होतें. नवीन नवीन शस्त्रांचा उपयोग करावयाला शिकविणें, सांघिक हालचाली करणें, शत्रूंच्या किल्ल्यांच्या किंवा तटबंद्यांच्या नमुन्याची तटबंदी करून ती फोडण्याचें सैनिकांना शिक्षण देणें, इत्यादि कार्यक्रम जर्मन सैन्यांत सतत चालूं असत. पहिल्या महायुद्धानंतर जर्मनींत सक्तीचें सैनिकीशिक्षण बंद झाल्यामुळें सर्व तरुण पिढीला एकाच दर्जाचें युद्धशिक्षण मिळालें नव्हतें. ती उणीव याच वेळीं भरून काढण्यांत आली. याच वेळीं विद्युयुद्धाकरितां उभारलेल्या कोऱ्या करकरीत अशा रणगाड्यांच्या वीस सैन्यविभागांचेंहि प्रायोगिक शिक्षण चालूं होतें. त्याचप्रमाणें जर्मनीच्या कारखान्यांचें नागरिकांना लागणाऱ्या वस्तूंचें उत्पादन थांबवून त्यांचें युद्धोपयोगी कारखान्यांत परिवर्तन करण्याचें कार्यहि याच अवधींत उरकलें गेलें.

## रक्तशोषणाची दहशत

ही सारी युद्धसिद्धता प्रत्यक्ष युद्ध चालूं असतांना जर्मनीला कशी करतां आली, याचा आतां विचार केला पाहिजे. याचें पहिलें उत्तर असें आहे कीं

जर्मनीच्या शत्रूंनीं अगदीं अक्षरशः आपला जीव मुठींत घेऊन जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें असलें तरी आपल्या माजिनो तटबंदीबाहेर पडून जर्मनीवर चढाई करण्याची त्यांची मुळींच सिद्धता नव्हती. पहिल्या महायुद्धाच्या दिवसांत सारें फ्रेंच सैन्य चढाईच्या आवेशानें भारलेलें होतें. ही परिस्थिति लक्ष्यांत घेऊन तेव्हांच्या जर्मन सेनापतींनीं फ्रेंच सैन्याला आपल्या सैन्यावर हल्ले चढविण्याला उद्युक्त करून फ्रेंचांचा फार मोठ्या प्रमाणावर संहार केला. फ्रेंच राष्ट्र पांढरें फटफटीत होईपर्यंत त्याचें रक्तशोषण केलें पाहिजे हें पहिल्या महायुद्धांतील जर्मन सेनापतींचें घोषवाक्य होतें. रक्तशोषणाचा अनुभव फ्रेंचांच्या इतक्या प्रमाणांत नसला तरी बऱ्याच मोठ्या प्रमाणावर इंग्रजांनाहि आला होता. तेव्हां-पासून फ्रेंच राष्ट्रानें चढाई या शब्दाची दहशत घेतली होती. फ्रान्सची ही मनःस्थिति पाहून इंग्लंडनेंहि युरोपांतील युद्धांतून भाग घेण्याकरितां दशलक्षांनीं सैन्य पाठविणें हें इंग्लंडच्या प्राचीन परंपरेच्या विरुद्ध आहे असें ठरविलें होतें. युद्ध न करतांच फ्रान्सनें जर्मनीला शरण जऊं नये, एवढ्यासाठीं फ्रेंचांच्या सहायाला सैन्य पाठविण्याचें आश्वासन इंग्लंड देत होतें. पण फ्रान्सच्या संरक्षणा-करिता किती सैन्य पाठवावें लागेल, याची दोनहि देशांच्या सेनापतींना यथार्थ कल्पना नव्हती. दुसऱ्या महायुद्धांत फिरून आपल्यावर रक्तशोषणाचा प्रयोग होऊं नये याकरितां फ्रान्सनें आपल्या पूर्वसीमेवर अवाढव्य व्यय करून माजिनो तटबंदी बांधली होती आणि या तटबंदीच्या अभेद्यपणावर फ्रेंच जनतेचा अगाध विश्वास होता. या विश्वासामुळे फ्रान्सच्या सामरिक विद्यालयांत आणि अधि-कारावर असलेल्या वरिष्ठ सेनापतींत चिकित्सक दृष्टीनें युद्धशास्त्राचा अभ्यासहि होईनासा झाला होता. अगदीं १९३९ मध्यें प्रसिद्ध झालेल्या अतिशय वरिष्ठ पदावर अधिष्ठित असलेल्या फ्रेंच सेनापतीच्या ग्रंथांतून रणगाड्यांचा चढाईला कांहींहि उपयोग होत नाहीं अशा आशयाची वाक्यें आढळतात. याच विद्वान् सेनापतींनीं विमानांचा उल्लेखसुद्धा आपल्या ग्रंथांतून केलेला नाहीं. फ्रान्सच्या युद्धविभागांत सर्वच सेनापति इतके मूर्ख होते असें नव्हे, पण दुर्दैवानें जे मूर्ख होते त्यांच्याच हातीं सत्ता होती.

## अचल बचावाची अखंड आघाडी

फ्रान्समधील अधिकारी युद्धशास्त्रज्ञांचें मत असें होतें कीं, आधुनिक शस्त्रा-

त्यांच्या प्रगतीमुळें अचल बचाव करणाऱ्या सैन्याला केव्हांहि चढाई करणाऱ्या सैन्याचे सर्व प्रयत्न हाणून पाडून त्याचा संहार करतां येईल. या मूल सिद्धांतावरून दुसरा उपसिद्धांत असा निघत होता कीं, आपल्या देशाच्या सीमेवर अचल बचावाची एक अखंड आघाडी उभारली तर ती फोडून शत्रूला अंतर्भागांत प्रवेश मिळविणें अशक्य होईल. अखंड आघाडी ही अभंगच राहील, हा केवळ फ्रेंच सेनापतींचा भ्रम होता. हें दुसऱ्या महायुद्धांतील अनुभवानें सर्वांनाच कळून आलें आहे. असो. त्या चुकीच्या सिद्धांतावरून फ्रेंच सेनापतींनीं पुढचा चुकीचा निष्कर्ष असा काढला कीं अखंड आघाडीचें संरक्षण करणें हेंच काय तें फ्रेंच सैन्याचें खरें कार्य आहे. या निष्कर्षाचे परिणाम किती भयंकर होऊं शकतात, याची सामान्य वाचकांना कल्पना येणें शक्य नाहीं. ही कल्पना प्रत्यक्ष सैन्यांत काम केलेल्या लोकांना लगेच येईल. शत्रूंना अडविण्याकरितां आपल्या सर्व सीमांवर तटबंदी करून अखंड आघाडी उभारली म्हणजे सैन्याकडे केवळ त्या तटबंदीच्या संरक्षणाचें काम येतें. असल्या संरक्षणाच्या कामामुळें सैनिक प्रत्यक्ष युद्धाला जितके अपात्र बनतात, तितके इतर कोणत्याहि कारणानें बनत नाहींत. अर्थात् साऱ्याच फ्रेंच सैन्याचें तटबंदीवरील पाहरेकऱ्यांत रूपांतर झालें नव्हतें हें मलाहि मान्य आहे. आपली फळी अभंगच राहील असा विश्वास जरी फ्रेंच सेनापतींना वाटत होता तरी एखाद्या ठिकाणीं त्या फळीला चीर पडली तर त्या चिरेंतून शत्रुसैन्याचें पाणी झिरपूं नये, याकरितां थोडेंबहुत शिलकी सैन्य ठेवण्याची सावधगिरी त्यांनीं घेतली होती. पण आपली अखंड फळी एकाच आघातासरशीं फुटून जाईल आणि मग जर्मन सैन्याचा लोंढा थांबविण्याचें काम शिलकींत ठेवलेल्या अल्पस्वल्प सैन्याच्या हातून होणार नाहीं, असल्या अशुभ कल्पना फ्रेंच सेनापतींच्या स्वप्नांतसुद्धा आल्या नव्हत्या. त्यांच्यांतील द्रुाचार्यांचें मत असें होतें कीं, फ्रान्सच्या पूर्व आणि उत्तर सीमेकडूनच जर्मनीची स्वारी येऊं शकते, तेव्हां या २५० मैल लांबीच्या सीमेवर सरासरी २० लक्ष सैन्य यांत्रिक तोफांसह तटबंदीच्या आणि बुरुजांच्या आश्रयानें शत्रूंचा प्रतिकार करण्याकरितां ठाण मांडून बसलें तर तीन वर्षेपर्यंत तरी जर्मनांना फ्रान्समध्यें प्रवेश मिळणार नाहीं. मला स्वतःलाहि असें आठवतें कीं, अँग्लोफ्रेंच युद्धशास्त्रज्ञांच्या लेखनावरून माजिनो तटबंदीवर जर्मनांना तीन महिने तरी प्रतिरोध होऊं शकेल अशी माझी स्वतःची समजूत झाली होती. पण फ्रेंचांच्या प्रमाणेंच माझ्याहि

दुर्दैवानें जर्मनांचा निर्वाणिचा हल्ला चालूं झाल्यानंतर फ्रेंच सीमेवरील अभेद्य तट-बंदीनें त्यांना तीन दिवससुद्धां अडवून धरलें नाहीं आणि माझ्या युद्धशास्त्राच्या ज्ञानाच्या मर्यादा मला तत्काळ कळून आल्या.

## फ्रान्सची सृष्टिविरहित आघाडी

अखंड आघाडी उभारण्यांत फ्रेंच सेनापतींचा हेतु असा होता कीं, जर्मनांना आपल्या उघड्या बगलांवर हल्ले करण्याची संधि मिळूं नये. पण युध्दांतल्या बगला कांहीं रविवर्म्याच्या विश्वामित्राच्या चित्रांतील उघड्या बगलेप्रमाणें आधींपासून उघड्या नसतात. एखाद्या नाक्याच्या ठिकाणीं आपलें पुष्कळसें सामर्थ्य एकत्रित करून प्रहार केला असतां शत्रूच्या बगला उघड्या पडतात आणि मग बगला उघड्या पडलेलीं सैन्यें सपशेल वेढलीं जाऊन त्यांचा नायनाट होतो. पण ही कल्पना मुळीं फ्रेंच सेनापतींच्या मेंदूंत शिरेना. त्यांचें म्हणणें असें होतें कीं, आपली आघाडी म्हणजे कांहीं विशिष्ट गुणसंपन्न आहे, त्यामुळें वर उल्लेखिल्या-सारखे अपघात तिथें होणार नाहींत. फ्रान्सच्या युध्दयोजना विभागाच्या उपप्रमु-खानें १९४० च्या मार्चमध्यें असें बोलून दाखविलें होतें कीं इतर आघाड्यां-प्रमाणें फ्रेंच आघाडी ही ठिकठिकाणीं वांकलेली नसून अगदीं ताठ आहे. या आघाडीवर आल्प्स पर्वतापासून उत्तर समुद्रापर्यंत अभेद्य तटबंदी उभारलेली आहे. या तटबंदीच्या मागें अतिशय उत्कृष्ट असें लोहपथांचें जाळें पसरलेलें असल्यानें तिला पाठीमागून युध्दसामुग्रीचा आणि नवीन सैनिकांचा पुरवठा-करणेंहि अतिशय सुलभ आहे. तेव्हां एवंगुणविशिष्ट अशा पवित्र फ्रेंच आघाडीचा भंगच काय, पण विनयभंगसुध्दां होऊं शकणार नाहीं.

## युद्धशास्त्रांतील कोडीं

रतिशास्त्रांतला एक सिध्दांत असा आहे कीं, 'कांते नूनं रतिश्रांते कामिनी पुरुषायते.' युध्दशास्त्रांत संरक्षक व्यूहांचा उपयोगहि असाच होऊं शकतो. त्या व्यूहांवर चढाई करून करून प्रतिपक्षी श्रांत झाला म्हणजे बचाव करणाऱ्या पक्षानें प्रतिचढाई करून त्याचा सपशेल पराजय करावयाचा असतो. पण अशा प्रतिचढाईलासुध्दां साध्या चढाईच्याच शस्त्रांची आवश्यकता असते. पण फ्रान्सच्या दुर्दैवानें त्या देशाजवळ चढाईचीं शस्त्रें मोठ्या प्रमाणावर नव्हतींच. इतकेंच नव्हे

तर त्या शस्त्रांवर त्या देशाच्या प्रसिध्द सेनापतींचा विश्वासहि नव्हता. स्वतः मार्शल पेतँ यांनीं एकदां म्हटलें होतें कीं, रणगाडे आणि विमानें हीं युध्दशास्त्रां-तलीं कोडींच आहेत. याचा अर्थ असा नव्हे कीं, यांच्यासारखीं महत्त्वाचीं कोडीं सोडवून स्वराष्ट्राचा किंवा निदान स्वतःचा लाभ होण्याची त्यांना अपेक्षा होती. त्यांच्या म्हणण्यांतला ध्वनि असाच होता कीं, कोडीं सोडविणें हा रिकामटेकड्यांचा धंदा आहे, त्यांनीं तो खुशाल करावा; मात्र राष्ट्ररक्षणाचा भार वाहणाऱ्यांनीं असल्या कोड्यांच्या नादीं मुळींच लागूं नये. मार्शल पेतँ यांचें स्वतःचें वर्तन अगदीं अक्षरशः या विचारसरणीला अनुसरूनच होतें आणि त्यामुळेंच फ्रान्सच्या अधःपाताचें बरेंचसें दायित्व त्यांच्या वांट्याला आलें. याच्या उलट त्याच दिव-सांत जेनेराल द गोल हे एक अख्यात फ्रेंच सेनापति रणगाड्यांच्या हालचालींचा विशेष अभ्यास करण्यांत दंग झाले होते. या विषयावर त्यांनीं १९३४ मध्यें एक ग्रंथहि प्रसिध्द केला. पण त्या ग्रंथांतील विचारसरणी व्यवहारांत आणून तिची सत्यता पटवून देण्याचा प्रयोग जेनेराल द गोल यांच्या जर्मन शत्रूंनीं फ्रान्स देशावरच करून दाखविला.

## मार्शल ब्लोंबेर्ग यांच्या कानगोष्टी

या ठिकाणीं एका मौजेच्या गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. फ्रेंचांच्या अनुकरणानें इंग्रज युद्धतज्ज्ञहि इतःपर चढाईचे दिवस उरले नाहींत, या सिद्धांतावर विश्वास ठेवूं लागले होते आणि जर्मनीचे युद्धश्रेष्ठीहि इंग्लंडच्या तज्ज्ञांशीं बोलतांना चढाईच्या अपेशीपणावर आपला अढळ विश्वास असल्याचें ढोंग करीत. कॅप्टन लिडेल हार्ट या इंग्लंडच्या युद्धतज्ज्ञानीं लिहिलें आहे, ' If we can credit the German staff with a sense of realities, the possibility of a serious German offensive in the West becomes more than doubtful. And from my own knowledge of Field Marshal Von Blomberg I can add that he reached a clear appreciation of the advantages of the defensive long before most of the military chiefs of Europe. ' मार्शल ब्लोंबेर्ग यांनीं

कॅप्टन लिडेल हार्ट यांना किती छान बनविलें होतें, हें मात्र या उताऱ्यावरून उत्कृष्ट रीतीनें कळून येतें.

## चढाईच्या शस्त्रांचा अभाव

असो; कांहीं अंशीं स्वतःच्याच मूर्खपणामुळें आणि कांहीं अंशीं, शत्रूच्या बनवाबनवीमुळें फ्रेंच सरकारानें आपल्या सैन्याला चढाईचीं शस्त्रें पुरविण्याची अक्षम्य हयगय केली. रणगाडे आणि विमानें हीं मार्शल पेतँ यांनीं म्हटल्याप्रमाणें कोर्डी नव्हतीं, तर तीं प्रयोगावस्थेंत असलेलीं शस्त्रें होतीं. असल्या शस्त्रांचा उपयोग कसा करावा, हें त्यांच्याशीं नित्य क्रीडा केल्यावांचून समजण्याजोगें नव्हतें. पण युद्धशास्त्रांत परिवर्तन व्हावयाचें असल्यास तें केवळ प्रयोगावस्थेंतील शस्त्रांनींच होणें शक्य असतें, हें ओळखून फ्रेंच सरकारानें त्यांच्याकडे अधिक लक्ष्य द्यावयाला पाहिजे होतें. त्यांच्याकडे दुर्लक्ष्य केल्यानें फ्रान्सला केवळ चढाईचीच नव्हे, तर बचावाची लढाईसुद्धां लढणें अशक्य झालें. कारण फ्रेंच युद्धशास्त्राप्रमाणें एखाद्या ठिकाणीं त्यांच्या अखंड आघाडीचा भंग झाला तर शत्रूच्या सैन्याहून अधिक सैन्य आणून ती आघाडी पुनश्च सांधण्याचा प्रयत्न करणें एवढा एकच उपाय फ्रेंच सेनापतींच्या हातीं राहिला. या संकुचित विचारसरणीनें सैन्याची हालचाल करण्याचें शास्त्रच फ्रेंच सेनापति सपशेल विसरून गेले. सरड्याची धांव जशी कुंपणापर्यंत, तशी फ्रेंच सेनापतींची धांव माजिनो तटबंदीपर्यंत, अशी युद्धापूर्वी फ्रान्समधील युद्धतज्ज्ञांची शोचनीय अवस्था झाली होती.

## पहिल्या महायुद्धाचीं विलंबित फळें

खरें म्हणजे फ्रान्समधील या घातुक परिस्थितीकडे इंग्लिश युद्धतज्ज्ञांनीं थोडें फार लक्ष्य द्यावयाला पाहिजे होतें. पण फ्रेंच तज्ज्ञांच्या संसर्गानें त्यांचीहि मति या दिवसांत भ्रष्ट झाली होती. पहिल्या महायुध्दांत झालेल्या ब्रिटिश सैन्याच्या संहाराची हाय खाल्लेल्या इंग्लंडच्या नेत्यांनीं पुनश्च इतक्या मोठ्या प्रमाणावर युरोपखंडांत सैन्य पाठवावयाचें नाहीं असा आपल्या मनाशीं दृढनिश्चय केला होता. याचा अर्थ असा होतो कीं पहिल्या महायुद्धांत जर्मन सेनेनें गाजविलेल्या पराक्रमाचीं फळें दुसऱ्या महायुद्धाचा प्रारंभ होण्याच्या




मॅजिनो व सिगफ्रिड तटबंदी (पृ. १०१)




इंग्लिश खाडीवर हल्ला (पृ. १४९)

सुमारास नुकतीं दृग्गोचर होऊं लागलीं होतीं. पहिल्या महायुध्दांत जर्मनीनें अँग्लोफ्रेंच सैन्यांचा पिढ्यानपिढ्या लक्ष्यांत राहील असा संहार केला नसता तर दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभीं पश्चिम आघाडीवर जर्मनीला इतका स्वस्त विजय मिळाला नसता. यासाठींच भगवद्गीतेनें मानवाला सांगितलें आहे, ' कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदा च न. '

## इंग्लंडचा दूरदर्शीपणा

फ्रान्समधील युद्धशास्त्रज्ञांवर विसंबून ब्रिटिशांनीं अभिनव रणनीतीकडे दुर्लक्ष्य केलें असलें तरी त्यांनीं चढाईच्या शस्त्रांकडे फ्रेंचांप्रमाणें दुर्लक्ष्य केलें नव्हतें. रणगाड्यांचा शोध आणि उपयोग इंग्रजांनीं इतरांच्या आधीं केला असल्यानें त्या शस्त्राच्या संशोधनाकडेहि व्हिकर्स, आर्मस्ट्रॉंग इत्यादि ब्रिटिश शस्त्रोत्पादकांनीं सतत लक्ष्य पुरविलें होतें. यामुळें रणगाड्यांच्या बाबतींत ब्रिटिश लोक जर्मनांच्या फारसे मागें राहिले नव्हते. विमानदलाच्या बाबतींत तर त्यांनीं जर्मनांच्याहि पुढें प्रगति केली होती. ब्रिटिश विमानविभागानें प्रथमपासूनच अवजड बॉंबफेकी विमानें बांधण्यावर भर दिला होता. या विमानांचा केवळ जर्मनीवर बॉंबवर्षाव करण्यासाठींच नव्हे, तर जर्मनीच्या अभेद्य युद्धनौका रसातळाला नेण्याकरितांहि इंग्लंडला अतिशय उपयोग झाला. या बॉंबफेक्या विमानांप्रमाणेंच ब्रिटिशांचीं लढाऊ विमानेंहि अतिशय उत्कृष्ट होतीं. फ्रान्सनें कोणी म्हणून मानलेल्या या चढाईच्या शस्त्रांकडे इंग्लंडनें लक्ष्य पुरविलें होतें, म्हणूनच १९४० मध्यें फ्रान्सच्या पाडावानंतरहि इंग्लंडला आपला प्रतिकार चालू ठेवतां आला.

: १३ :

# पश्चिम युरोपांतील सार्वत्रिक चढाई

## मंत्रिमंडळांतील भांडणें

नॉर्वेच्या स्वारींत जर्मनीला विजय मिळाल्यानंतर इंग्लंड आणि फ्रान्स या दोनहि देशांतून पराजयाला कारणीभूत झालेल्या मंत्र्यांना अधिकारावरून काढण्याची चळवळ चालू झाली. इंग्लंडांत चेंबरलेनच्याविरुद्ध अविश्वासाचा ठराव येऊन त्याची पार्लमेंटांत ७ ते ९ मे या दिवशीं निकराची चर्चा झाली. या चर्चेत चेंबरलेनपक्षाचा बहुमतानें विजय झाला तरी त्याला, देशाचा पाठिंबा आपल्याला नाहीं हें स्पष्ट कळून आलें. त्यामुळें १० मे या दिवशीं जर्मनीच्या सार्वत्रिक चढाईचा प्रारंभ होतांच त्यानें संध्याकाळीं आपलें त्यागपत्र जॉर्ज राजांच्या स्वाधीन केलें. फ्रान्समध्येंहि मुख्य प्रधान पोल रेनो आणि संरक्षण-मंत्री दालादिए यांच्यामध्यें कडाक्याचें भांडण उद्भवलें होतें. मुख्य प्रधानांना फ्रान्सचे तेव्हांचे मुख्य सेनापति गामेलँ यांना पदच्युत करून त्यांच्या जागीं जनरल वेगां यांची नेमणुक करावयाची होती. पण या बाबतींत त्यांना संरक्षण-मंत्र्यांचा तिव्र विरोध होत होता. हीं भांडणें इतक्या थराला गेलीं होतीं कीं, ९ मेला मुख्य मंत्री आणि संरक्षणमंत्री हे दोघेहि परस्परांशीं सहकार्य करायला नको म्हणून त्यागपत्र द्यावयास सिद्ध झाले होते अशी सुसंधि साधून जर्मनीनें पश्चिम आघाडीवरील सार्वत्रिक चढाईला प्रारंभ केला.

## छत्रीधारी सैन्याचा प्रभाव

१० मेला पहाटें ४॥ वाजतां जर्मन विमानांनीं बेल्जम, हॉलंड आणि फ्रान्स या देशांतील विमानतळांवर अचानक हल्ले आरंभिले. एकट्या फ्रान्समध्यें त्या दिवशीं नान्सी, काले, लाओन, लिल, कोल्मार, आबेव्हिल इत्यादि विमान-तळांवर हल्ले होऊन फ्रेंचांच्या अल्पस्वल्प विमानांपैकीं पुष्कळशीं विमानें जागच्या जागींच विनष्ट झालीं. फ्रान्समध्यें निदान छत्रीधारी सैनिक पहिल्या दिवशीं आकाशांतून उतरले नाहींत आणि त्यांनीं विमानतळ व्यापण्याचा प्रयत्नहि केला

नाहीं. उलटपक्षीं हॉलंड आणि बेल्जम यांच्यामध्यें या छत्रीधारी सैनिकांनीं पहिल्या दिवसापासूनच अतिशय गोंधळ उडवून दिला. बेल्जमच्या लिएज येथील किल्ल्यांपैकीं सर्वांत बलिष्ठ किल्ला एबेन एमाएल हा अचानक उतरलेल्या सैनिकांच्या प्रभावानेंच जर्मनीला पहिल्याच दिवशीं जिंकतां आला. याच वेळीं हॉलंडमध्यें प्रवाशांच्या वेषानें नौकांतून सैनिक उतरूं लागले. या सैनिकांनीं हेग बंदरच व्यापण्याचा प्रयत्न केला, पण तो फसला. याच्या उलट बेल्जम आणि हॉलंड यांच्या सीमेवरील मोएर्डिक येथील पूल आणि रॉटरडॅम येथील वालहाव्हेनचा विमानतळ हे छत्रीधारी सैनिकांनीं तत्काळ जिंकले आणि ते परत घेण्याचे शत्रूचे सारे प्रयत्न त्यांनीं निष्फळ केले.

## जर्मनांची बेल्जममधील प्रगति

युद्धाच्या पहिल्या तासांतच जर्मनीनें डच लोकांपासून मास्ट्रिक्ट येथील पूल जिंकून तिकडून बेल्जममध्यें सैन्य ओतण्याला प्रारंभ केला. याच वेळीं दक्षिणेकडूनहि आल्बर्ट कालव्यावरील बेल्जमची फळी फोडून जर्मन सैन्य आंत घुसूं लागलें होतें. स्वारीच्या पहिल्या दिवशींच दुपारपर्यंत जर्मन सैन्यें मोठ्या प्रमाणावर बेल्जममध्यें शिरलीं. याच वेळीं ब्रुसेल्स, अँटवर्प इत्यादि नगरांवरहि जर्मनीचे बॉंबहल्ले चालू झाले. स्वारी झालेल्या सरकारांत हॉलंडच्या सरकारापेक्षां बेल्जमचें सरकार अधिक सावध होतें. आपल्या देशाच्या रोखानें जर्मन सैन्याची हालचाल चालूं झाल्याचें त्यांना आदल्या रात्रींच कळलें होतें. तेव्हांच लिओपोल्ड राजांनीं सेनापतीचा अधिकार स्वतःकडे घेऊन सार्वत्रिक सैन्यभरतीची आज्ञा घोषित केली आणि अँग्लोफ्रेंच सरकारांना आपल्या सहायासाठीं बोलाविलें. बेल्जमहॉलंडच्या साहाय्याला सैन्य पाठवावयाचें आधींपासूनच ठरलेलें होतें. तरीसुद्धां आयत्या वेळीं हालचालींत कांहीं घोटाळा झालाच. विशेषतः सेदां आणि दिनान्त या किल्ल्यांमधील प्रदेश व्यापण्याचें काम ज्या नवव्या फ्रेंच सैन्याला दिलें होतें, तें आपल्या नेमलेल्या ठिकाणीं वेळेवर येऊन पोंचलें नाहीं. त्यामुळें त्या सैन्याला पक्की मोर्चेबंदी करून आत्मसंरक्षणाची व्यवस्था करतां आली नाहीं. याच दिवशीं जर्मन सैन्यें हॉलंडबेल्जममध्यें खोलपर्यंत घुसल्या, नंतर ॲमस्टरडॅम आणि ब्रुसेल्स येथील जर्मन राजदूतांनीं त्या त्या देशच्या परराष्ट्रमंत्र्यांची भेट घेऊन त्यांच्याकडे शरणागतीची मागणी केली. ही मागणी

अर्थात् त्यांनीं झिडकारून टाकली. याच दिवशीं लुक्सेंबुर्गचा अरक्षित प्रांत जर्मनांनीं व्यापला आणि तेथील डचेस शालात ही फ्रान्सला पळून गेली.

## जर्मन रणगाड्यांचा स्वैरसंचार

दुसरे दिवशीं जर्मन रणगाड्यांच्या स्वैरसंचाराला प्रारंभ झाला. आर्दान्नच्या अरण्यांतून मोन्तमेदी आणि सेदां या दुर्गाच्या दिशेनें जर्मनीचे रणगाडे आणि सैन्यवाहक मोटारी यांची दौड चालू झाली. बेल्जमच्या सेनेकडून त्यांना कोठेंहि नांव घेण्याजोगा प्रतिकार होईना. वाटेंतील पूल उडवून देण्यासाठीं ज्यांची नेमणूक झाली होती. त्यांनींहि आपलीं कामें योजनेप्रमाणें पार पाडलीं नाहींत. त्यामुळें जर्मन सैन्याची वाहतूक त्या मार्गांनीं निरंकुशपणें होऊं लागली. दि. ११ ला मि. चर्चिल यांनीं आपलें मंत्रिमंडळ बनविलें. या मंत्रिमंडळांत श्रमिक पक्षाच्या पुढाऱ्यांनींहि भाग घेतला.

चढाईच्या तिसऱ्या दिवशीं म्हणजे १२ मेला जर्मनांनीं हॉलंडचे उत्तरेचे दोन प्रांत पूर्णपणें जिंकले. याच दिवशीं युद्धाच्या शेवटच्या दिवसांत प्रसिद्धीला आलेल्या आर्नहेमच्या जवळचा पूलहि जर्मनांच्या हातीं आला. याच दिवशीं जर्मन पक्षाला मिळालेल्या डच लोकांनीं हॉलंडच्या राजधानींत धुमाकूळ घालून तेथील पाणी, वीज, गॅस यांचा पुरवठा बंद पाडला. याचप्रमाणें विमानांच्या आगमनाची वार्ता घोषित करणारे भोंगेहि तेव्हांच बंद पडले. जर्मनीचे छत्रीधारी सैनिक हॉलंडमध्यें सर्वत्र उतरत होते आणि देशांतील जनतेंत मिसळून सार्वत्रिक गोंधळ उडवून देत होते.

## फ्रेंच फळी फुटली

बेल्जममध्येंहि या वेळेपर्यंत ब्रुसेल्सपासून ५० मैलांवर जर्मन सैन्य येऊन पोंचलें होतें. फटफटीवरील टेहळे कदाचित् याहूनहि अधिक जवळ गेले असतील. पण राजधानीच्या रोखानें होणाऱ्या या प्रगतीपेक्षां मज ( Meuse ) नदीतीरावरील नवव्या फ्रेंच सैन्याची फळी सेदां आणि दिनान्त या दुर्गांसन्निध फुटली, ही या दिवशींची सर्वांत महत्त्वाची घटना होय. सेदांजवळील सर्व पूल जर्मनांच्या हातीं लागले. ही फळी फुटल्याची वार्तासुद्धां फ्रेंचांच्या युद्धश्रेष्ठींना २४ तासांनंतर कळली, अशी बोलवा आहे. ही फळी फुटली तेव्हां फ्रेंच आणि ब्रिटिश

सैन्यें बेल्जममध्यें अधिकाधिक खोल घुसत होतीं. जनरल जिरो यांच्या हाता-खालील सातवें फ्रेंच सैन्य या वेळीं हॉलंडच्या सीमेवर जाऊन पोंचलें होतें. या सैन्यानें दुसऱ्या दिवशीं हॉलंडचा झलिंड प्रांतहि व्यापला. दुसरीं फ्रेंच सैन्यें आल्बर्ट कालव्याशेजारच्या बेल्जियन सैन्याला मिळून जर्मनांचा प्रतिकार करीत होतीं. हीं सारीं सैन्यें बेल्जममध्यें खोल शिरत असतांना जर्मनांनीं त्यांच्यावर चुकूनसुद्धां एखादा बॉंब टाकला नाहीं. कारण जर्मन सेनेची पश्चिम समुद्रकिना-ऱ्याकडे प्रगति होत असतांना दुर्बल ॲंग्लोफ्रेंच सैन्यें पूर्वेकडे धाव घेऊं लागलीं तर तीं जर्मनांच्या तावडींतून सुटण्याचा संभव फार थोडा होता. ॲंग्लोफ्रेंच सैन्याला या वेळीं पळपुट्या बेल्जियन सैनिकांकडून किंवा निराश्रित नागरिकां-कडून जो अडथळा झाला तेवढाच त्यांच्या मार्गांतील अडथळा. आल्बर्ट कालव्या-वरील बेल्जमची फळी चार दिवस तरी टिकाव धरील, अशी ॲंग्लोफ्रेंचांची कल्पना होती आणि त्या हिशोबानें त्यांनीं बेल्जमच्या साहाय्याला सैन्यें पाठ-विण्याच्या योजना आंखल्या होत्या. पण ही फळी पहिल्या तासांतच फुटल्यानें त्या अविचारी योजनांचा त्यांच्याच सैनिकांना सांपळ्यांत कोंडण्यासाठीं उपयोग होत होता.

## हॉलंडची घटका भरली

१३ मेला हॉलंडची घटका भरूं लागली. सर्व उत्तर हॉलंड आधींच जर्म-नीच्या हातीं गेला होता. जर्मन पायदळ हेगपासून तीस मैलांवर येऊन पोंचलें होतें आणि देशद्रोह्यांच्या साहाय्यानें जर्मनांनीं विल्हेल्मिना राणीलाच पकड-ण्याचा प्रयत्न चालविला होता. हें संकट टाळण्याकरितां हॉलंडची राणी इंग्लं-डला निघून गेली. बेल्जममध्यें जर्मनांची प्रगति आणि नागरिकांची पळापळ सारख्याच वेगानें चालू होती. बेल्जममध्यें सार्वत्रिक पळापळ चालू झाल्यानें फ्रेंच सरकाराला बेल्जमच्या विश्वासघाताचा संशय येऊं लागला. याकरितां फ्रेंच संरक्षणमंत्र्यांनीं लिओपोल्ड राजांची भेट घेतली. या भेटींत उभयतांमध्यें बरींच भांडणें झालीं असावींत. याच दिवशीं प्रधानमंत्री या नात्यानें मि. चर्चिल यांनीं प्रथमच पार्लमेंटांत प्रवेश केला आणि ब्रिटिश जनतेनें यापुढें श्रम, रक्त, अश्रू आणि घाम यांचा अपरिमित व्यय करण्याला सिद्ध असावें, असें त्यांनीं बजावून सांगितलें.

## हॉलंडची शरणागति

१४ मेला विल्हेल्मिना राणीनें एक घोषणा करून हॉलंडमधील सर्वाधिकार सेनापति विंकेल्मानच्या स्वाधीन केले. या सेनापतींनीं त्याच दिवशीं संध्याकाळीं सर्व डच सैन्याला जर्मनांना शरण जाण्याची आज्ञा दिली. या आज्ञाक्षेत्रांतून झीलंड प्रांत तेवढा वगळला होता. या शरणागतीच्या घोषणेवरून असें कळतें कीं हॉलंडच्या चार लक्ष सैन्यापैकीं एक लक्ष सैन्य ठार किंवा घायाळ झालें होतें. पण ही माहिती विश्वसनीय वाटत नाहीं. कदाचित् त्याच दिवशीं रॉटरडॅम नगरावर जर्मन वैमानिकांनीं दीड तास बॉबवृष्टि करून तिथल्या सरासरी तीस सहस्र नागरिकांना ठार किंवा घायाळ केलें होतें. त्यांचाहि समावेश सेनापतींनीं सैनिकांच्या हानींतच केला असावा.

हॉलंडच्या शरणागतीच्या पाठोपाठ बेल्जममधील ॲंग्लो-फ्रेंच सैन्यानें माघार घेण्याला प्रारंभ केला. या सैन्याला माघार घेण्याची आज्ञा दुसरे दिवशीं संध्याकाळीं मिळाली, हें येथें सांगून ठेवणें आवश्यक आहे. या वेळेपर्यंत जर्मन सैन्यानें नामूरच्या किल्ल्यापर्यंत प्रगति केली होती. शत्रूच्या प्रगतीचा हा वेग पाहून ब्रिटिश वैमानिकांनीं आतांपर्यंत सुरक्षित राहिलेले पूल पाडण्याचा प्रयत्न केला. या आणीबाणीच्या लढाईत आपल्या सैन्याला प्रत्यक्ष साहाय्य करण्याचा ब्रिटिश विमानदलाचा हा जवळ जवळ एकुलता एक प्रयत्न होय. कारण आघाडीवरील सेनेला साहाय्य करण्यापेक्षां रूर प्रांतांतील उद्योगधंद्यांवर बॉबहल्ले करण्यानें शत्रूची अधिक त्रेधा होईल, अशी ब्रिटिश विमानदलाच्या प्रमुखांची कल्पना होती. याच दिवशीं ब्रिटिश नौदलविभागानें तीसपासून शंभर फुटापर्यंतच्या लांबीच्या लहान नौकांची माहिती देशांतील सर्व कोळ्यांनीं सरकारला तत्काळ पुरवावी अशी आज्ञा घोषित केली. याच नौकांनीं मेच्या अंतीं डुंकेर्क ( Dunquerque ) बंदरातील कोंडलेलें ब्रिटिश सैन्य सोडवून नेलें.

## जर्मनांची फ्रान्समध्यें प्रगति

१५ मेला फ्रेंच सैन्याची परिस्थिति अधिकाधिक अवघड होऊं लागली. ज्या नवव्या सैन्याची फळी फोडून जर्मनीनें फ्रान्समध्यें प्रवेश केला, त्याचा या वेळेपर्यंत पूर्ण निःपात झाला होता. नामूरपर्यंत येऊन पोंचलेल्या जर्मनांनीं आतां मज नदी ओलांडून सांब्र नदीकडे चढाई आरंभिली. याच वेळीं सेदांचा

किल्ला जिंकून पुढें गेलेल्या जर्मन सैन्यानें रेतेलपर्यंत प्रगति केली. शत्रूची इतकी प्रगति झाल्यानंतर फ्रेंचांनीं प्रथमच आपली फळी फुटल्याचें मान्य केलें. शत्रूंवर प्रतिहल्ले चालू असल्याचें ते सांगतच होते. पण दुर्दैवानें त्यांच्या शब्दावर कोणा-चाच विश्वास बसेना. उत्तरेला ब्रुसेल्सवर जर्मनांचें दडपण अधिकाधिक येऊं लागलें. बेल्जियन सरकारचीं कार्यालयें ब्रुसेल्स सोडून ऑस्टेंडला जाऊं लागलीं. नगरांतील तारायंत्र आणि आकाशवाणी बंद पडलीच होती. याच दिवशीं राजधानींत सैनिकांची गर्दी झाल्यामुळें जर्मनीला तिच्यावर विमानहल्ला करावा लागेल, अशी धमकी जर्मन नभोवाणीनें दिली. अशी परिस्थिति पहात अस-तांनासुद्धा ब्रिटिश विमानदलानें ब्रुसेल्सचें संरक्षण न करतां ऱ्हाइन नदीतीरा-वरील प्रदेशांत अतिशय मोठी बॉंबवृष्टि केली. याच दिवशीं जर्मन सैन्य स्विट्-झर्लंडमध्यें घुसून माजिनो तटबंदीला वळसा घालणार अशा कंड्या पिकल्या. या काल्पनिक संकटाला तोंड देण्याकरितां त्या तटस्थ राष्ट्रानेंहि आपलें सैन्य एकत्रित केलें. याच दिवशीं प्रे. रूझव्हेल्ट आणि त्यांचे परराष्ट्रमंत्री मि. कॉर्डेल हल्ल यांनीं आपसांत वाटाघाटी करून जर्मनीच्या वतीनें युद्धांत न पडण्याचा आदेश मुस्सोलिनींना दिला.

## पारीसमधील तारांबळ

१६ मेला बेल्जियन सरकारानें आपली राजधानी ऑस्टेंडला नेली. तोंपर्यंत अँटवर्पपासून ब्रुसेल्सपर्यंतची आघाडी ब्रिटिश आणि बेल्जियन सैन्यानें शत्रूला निकराचा प्रतिरोध करून आपल्या हातीं राखली होती. पण फ्रेंच फळी फोडून पुढें गेलेल्या जर्मन सैन्याच्या अनपेक्षित प्रगतीमुळें त्या सैन्याला ब्रुसेल्सच्या पश्चिमेकडे माघार घ्यावी लागली. सेदां किल्ल्यापाशीं फळी फोडणारी जर्मन सेना या दिवशीं पारीसपासून ६० मैलांवर येऊन पोंचली. यामुळें फ्रान्सचे मुख्य सेनापति गामेलँ यांचा धीर सुटून त्यांनीं प्रधानमंत्र्यांना सांगितलें कीं आज रात्रींच जर्मन सैन्य पारीसला पोंचणार नाहीं असा भरंवसा मला देतां येत नाहीं. पारीसच्या संरक्षणाचा भार ज्या सेनापतीवर सोंपविला होता, त्यानेंहि राज-धानी अन्यत्र नेल्यास पारीसचें संरक्षण करणें सुलभ जाईल, असें सुचविलें. परिस्थितीची भीषणता लक्ष्यांत येतांच मो. रेनो यांनीं मो. दालादिए यांचें संरक्षणमंत्र्याचें पद स्वतःच घेतलें. त्याच दिवशीं परराष्ट्रविभागांतील कागद-

पत्र जाळण्याचीहि प्रधानमंत्र्यांनीं आज्ञा दिली. ही वार्ता राजधानींत पसरतांच तिथें आकांत माजला. पण दुपारीं आघाडीवरून वार्ता आली कीं पारीसच्या रोखानें जर्मन सैन्य चाल करीत नाहीं; ही शुभवार्ता कानीं येतांच मो. रेनो यांनीं फ्रेंच सरकार पारीस सोडणार नसून लोकांत त्यासंबंधीं पसरलेल्या सार्‍या कंड्या खोट्या असल्याचें ठासून सांगितलें. या भाषणाच्या पाठोपाठच पारीसच्या अंतर्गत संरक्षणाचा भार पोलीसकडून काढून घेऊन सैन्याकडे दिल्याचें आज्ञापत्रक प्रसिद्ध झालें.

याच दिवशीं मि. चर्चिल हे रेनो, दालादिए आणि गामेलँ यांच्याकडून परिस्थिति समजून घेण्याकरितां पारीसला आले आणि त्या सर्वांची बैठकहि झाली. याच वेळीं वाशिंग्टन येथें प्रे. रूझव्हेल्ट यांनीं कॉंग्रेस आणि सेनेट यांची संयुक्त बैठक भरवून त्यांच्याकडून आत्मसंरक्षणाकरितां ५०००० विमानें आणि ११८ कोटि डॉलर यांची मागणी केली.

## फ्रेंचांचा धीर खचला

१७ मेला जर्मनांनीं ब्रुसेल्स आणि लुव्हें हीं नगरें हस्तगत केलीं. ब्रिटिश युद्धश्रेष्ठींनींहि ब्रुसेल्सच्या पश्चिमेला आपलें सैन्य आणलें असल्याचें मान्य केलें, पण या आघाडीवर ब्रिटिश सैन्याचा पराजय झाल्याचें त्यांनीं नाकारलें. ब्रिटिशांच्या विमानविभागानेंहि गेल्या सप्ताहांत जर्मनीचीं १०००विमानें निकामी झालीं असल्याचें सांगून जनतेला धीर देण्याचा प्रयत्न केला. उलटपक्षीं याच दिवशीं फ्रेंच युद्धश्रेष्ठींचा धीर अगदींच खचला. कारण गेल्या चारपांच दिवसांत सेदां येथें पडलेलें खिंडार रुंदावत जाऊन आतां तें सुमारें साठ ते सत्तर मैल रुंद झालें होतें. यामुळें जनरल गामेलँ यांनीं आपल्या सैन्याला निर्वाणीचा संदेश पाठवून तत्काळ विजय मिळविण्याचा आदेश दिला.

## पेतँचा मंत्रिमंडळांत प्रवेश

१८ मेला जर्मनांनीं एस्न नदी गांठली. या वेळेपर्यंत जर्मनीचा रोख पारीसकडे नसून इंग्लिश खाडींतील बंदरांकडे आहे, हें स्पष्ट झालें होतें. या वेळेपर्यंत जर्मनीनें सरासरीं ८० डिव्हिजन सैन्य उपयोगांत आणलें होतें. यांतील सुमारें दहा डिव्हिजन सैन्य यंत्रचालित होतें. या व्यतिरिक्त २५०० पासून ३०००


खाडी
लीट्रिपोर्ट
डीप
फ्रीकँप
ली हाव्र
ट्रोव्हाइल
सैन नं.
रोएन
व्हरनॉन
पाँटाईस
सेंट डेनीस
पॅरीस
अॅबिव्हिली
आरास
कॅब्रे
व्हॅलेन्सिएसीसं
शॉलॅरॉय
ओइज नं.
लाओन
सोइसान्स
रीम्स
एस्न नं.
सेडन
मॉनमेडी
व्हर्डून्स
शॉलन्स

फ्रान्स (पृ. ११४)


स्पाडा भू.
ट्रिपेटी भू.
डिक्टमो
सुडा
मॅलेका
सुडाचा उपसागर
मालेमी
कॅस्टेली
कॅनी
क्री
रॅथिम्नो
रेटिमो
स्टँडियाबेट
(कॅंडिया)
हेराक्लिऑन
ट
सिडेरो भू.
क्रिओ भू.
कॅंडिया
लासिथी
मेसारा उपसागर
कॅस्टेली
0
10
20

क्रीट (पृ. २१३)

पर्यंत रणगाडे चढाईंत भाग घेत होते. यांपैकीं सर्वांत मोठे रणगाडे सुमारें ७० ते ८० टनांचे होते. याच दिवशीं जर्मनांनीं अँटवर्प बंदर हस्तगत केलें. पहिल्या महायुद्धांत चढाई चालूं झाल्यापासून ६६ दिवसांनीं या बंदराचा पाडाव झाला होता. पण या खेपेला अवघ्या नऊ दिवसांतच या महत्त्वाच्या बंदराचा पाडाव झाला. लिएज आणि नामूर येथील किल्ले मात्र अजून जर्मन हल्ल्यांचा प्रतिकार करीत होते. युद्धाला इतकें आणीबाणीचें स्वरूप आलें असतांनासुद्धां ब्रिटिश वैमानिकदल आघाडीवरील युद्धांत भाग न घेतां जर्मनीच्या हांबुर्ग आणि ब्रेमेन बंदरांवर बाँबवर्षाव करून आपल्या मनाचें समाधान करून घेत होतें. याच दिवशीं मो. रेनो यांनीं फ्रेंच मंत्रिमंडळाची पुनर्रचना करून मार्शल पेतँ यांना उपप्रधान-मंत्र्याचें पद दिलें. पुढें फ्रान्सच्या शरणागतीच्या राजकारणांत यांनींच प्रमुख भाग घेतला असल्यानें त्यांच्या मंत्रिमंडळांतील प्रवेशाचा दिवस लक्ष्यांत ठेवणें आवश्यक आहे. याच दिवशीं विमानकारखान्यांतील श्रमिकांनीं १२ तास काम केलेंच पाहिजे, अशी आज्ञा फ्रेंच सरकारानें काढली. वेळ गेल्यावर झोपा लावण्याचें हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे.

## गामेलँ यांची पदच्युति

१९ मेला सँ केंतँ (सेंट क्वेंटिन) हें महत्त्वाचें ठाणें जर्मनांनीं जिंकलें. या विजयामुळें जर्मनीचा इंग्लिश खाडीकडील मार्ग मोकळा झाला. त्याचप्रमाणें ब्रुसेल्सच्या दक्षिणेकडून पुढें सरकत असलेल्या जर्मन सैन्याचाहि जनरल राइशेनाउ यांच्या रणगाडादळाला पाठिंबा मिळूं लागला. या दिवशीं बेल्जममधून माघार घेणारे ब्रिटिश सैन्य कांब्रेला येऊन पोंचलें. पहिल्या महायुद्धांत याच रणभूमीवर ब्रिटिश सैन्यानें रणगाडादळाचा प्रथम मोठ्या प्रमाणावर उपयोग करून जर्मनीची फळी फोडली होती. पण तेव्हांपासून रणगाड्यांकडे दुर्लक्ष्य केल्याचें प्रायश्चित्त दुसऱ्या महायुद्धांत ब्रिटिशांना घ्यावें लागत होतें. याच दिवशीं हॉलंडच्या झीलंड प्रांतांतील लढाई संपून तो देश पूर्णपणें जर्मनांच्या हातीं आला. याच दिवशीं जनरल गामेलँ यांना पदच्युत करून त्यांच्या जागीं जनरल वेगां यांची मुख्य सेनापति म्हणून नेमणूक झाली. जनरल वेगां हे पहिल्या महायुद्धांतील विजयी सेनापति मार्शल फोक यांचे युद्धयोजनाप्रमुख होते. या ऐतिहासिक कारणाकरितांच पराजय टाळण्याच्या आशेनें मो. रेनो यांनीं त्यांची नेमणूक

केली होती. याच दिवशीं मि. चर्चिल यांनीं एक उत्साहजनक भाषण करून युद्धपरिस्थिति सुधारत आहे असा आपला विश्वास व्यक्त केला. त्याचबरोबर असेंहि सांगितलें कीं फ्रेंच सरकारानें कोणत्याहि परिस्थितींत आपण जर्मनीला शरण जाणार नाहीं, असें आपल्याला आश्वासन दिलें आहे. याचे आदले दिवशीं इटालींतील 'पोपोलो दितालिया' या सि. मुस्सोलिनींच्या मुखपत्रानें 'इतःपर इटाली युद्धांत पडल्यासारखाच आहे,' असें घोषित केलें होतें. त्याच घोषणेला अनुलक्षून भाषण करतांना इटालीचे परराष्ट्रमंत्रि काउंट चियानो यांनींहि जगाचें भवितव्य ठरविणाऱ्या या महायुद्धापासून इटालीला अलिप्त राहतां येणार नाहीं, अशी घोषणा केली.

## फ्रेंच सैन्यें विस्कळित झालीं

२० मेला जर्मनीची इंग्लिश खाडीकडील चढाई अधिकच निकरावर आली. सँ केंतँपासून पुढें प्रगति करून पेरोन हें लोहपथांचें केंद्र ओलांडून आमियां (अमीन्स) या अति महत्त्वाच्या नगराकडे जर्मनीच्या फटफटीवरील आघाडीच्या सैन्यानें चढाई चालू केली. पहिल्या महायुद्धांत जर्मनीला आमियां नगर जिंकतां न आल्यामुळेंच पश्चिम आघाडीवर अँग्लोफ्रेंच सैन्याकडून त्या देशाचा पराभव झाला होता. हें लक्ष्यांत घेतलें म्हणजे या चढाईचें खरें महत्त्व कळून येतें. या दिवशीं जर्मन टेहेळ्यांनीं आमियांच्या उपनगरांतून प्रवेश करून तेथें कांहीं काळ अतिशय धुमाकूळ घातला. पण या टेहेळ्यांना लौकर साहाय्य न आल्यानें दोनतीन तासांनंतर ते मारले गेले. याच दिवशीं पारीसमध्यें फ्रेंच मंत्रिमंडळाची सभा भरली असतां मार्शल पेतँ यांनीं युद्धपरिस्थिति अगदीं बिघडून गेली असल्याचा अभिप्राय व्यक्त केला. त्यांनीं असेंहि सांगितलें कीं, आघाडीवरील फ्रेंच सैन्यें अलग पडलीं असल्यानें आणि त्यांचें राजधानीशीं नियमित दळणवळण न उरल्यानें कोणत्याहि योजनेप्रमाणें हालचाली करणें त्यांना अशक्य झालें आहे. बेल्जम आणि फ्रान्स यांमधील पळापळहि इतक्या मोठ्या प्रमाणावर चालू झाली होती कीं निराश्रितांच्या वाहनांनीं सारे मार्ग भरून गेले होते. त्यामुळेंहि सैन्याच्या हालचालींना अडथळा येत होता.

## इंग्लिश खाडीवर जर्मन सैन्य

२१ मेला जनरल राइशेनाउ यांच्या रणगाडादळानें पेरोन, आमियां आणि आबेव्हिल हीं ठिकाणें जिंकून इंग्लिश खाडी गांठली. आबेव्हिलकडे म्हणण्यासारखा अडथळा न झाल्यामुळें त्या रणगाडादळानें तशीच बूलोन्य बंदराकडे दौड केली. याच यांत्रिक सेनेनें आरास नगरहि जिंकलें. जनरल राइशेनाउ यांच्या या विजयामुळें उत्तर फ्रान्स आणि बेल्जम या भागांतील फ्रेंच, इंग्लिश आणि बेल्जियन मिळून सुमारें दहा लक्ष सैन्य जर्मनांच्या वेढ्यांत अडकलें. अर्थात् या सैन्याला पळून जाण्याला समुद्रावरील वाट तेवढी मोकळी होती. जर्मन सैन्यानें इंग्लिश खाडी गांठल्याची वार्ता कळतांच जनरल वेगां यांनीं विमानांतून जर्मन सैन्य ओलांडून उत्तरेच्या फ्रेंच सैन्याला भेट दिली आणि उत्तरेकडून आणि दक्षिणेकडून एकाच वेळीं हल्ले करून जर्मन पाचर कापून टाकण्याच्या योजना ठरविल्या. या योजना स्वतः जनरल वेगां यांनीं कृतींत उतरविल्या नाहींत, असा आरोप पुढें इंग्लिश सेनापतींनीं केला. याच दिवशीं सातव्या फ्रेंच सैन्याचे नवनियुक्त सेनापति जनरल जिरो यांना जर्मन सैन्यानें पकडून नेल्याची वार्ता बेर्लिनच्या नभोवाणीनें सांगितली. याच दिवशी मो. रेनो यांनीं एक अतिशय स्पष्ट भाषण करून आतांपर्यंत संयुक्त राष्ट्रांचा जो पराजय झाला त्याचीं कारणें सांगितलीं.

## चर्चिलची पारीसला भेट

२२ मेला उत्तरेला वेढ्यांत सांपडलेल्या सैन्यानें जर्मन सैन्यावर प्रतिचढाई करून आरास नगर परत मिळविलें; पण दक्षिणेकडून जनरल वेगां यांनीं कांहींच हालचाल केली नाहीं, त्यामुळें आदल्या दिवशींच्या योजना साऱ्या फुकट गेल्या! उत्तरेच्या सैन्याला सोडविण्याचा प्रयत्न करण्याऐवजीं सोम आणि एस्न नद्यांवर नवी फळी उभारण्याचा उद्योग मुख्य सेनापतींनीं आरंभिला. या प्रकाराची कल्पना येतांच मि. चार्चिल यांनीं पारीसला येऊन मो. रेनो आणि जनरल वेगां यांची भेट घेतली, आणि उत्तरेला वेढ्यांत सांपडलेल्या सैन्याच्या मुक्ततेसाठीं काय करावें याची चर्चा केली. या चर्चेनंतर मि. चार्चिल हे तडक लंडनला निघून गेले. याच दिवशीं जर्मनांनें इंग्लिश खाडींतील बूलोन्य, ग्युंकेर्क, (डंकर्क) काले, दिएप इत्यादि बंदरांवर बाँबवृष्टि आरंभिली. हे विमानहल्ले अर्थातच तीं

बंदरें निकामीं करून टाकलीं. म्हणजे उत्तरेच्या वेढ्यांत अडकलेल्या सैन्याला समुद्रमार्गानें निसटून जाणें अशक्य होईल, या अपेक्षेनेंच आरंभिले होते. याच दिवशीं जर्मन विमानांनीं पारीसच्या भोंवतालच्या लोहपथकेंद्रांवरहि विमान-हल्ले केले. ब्रिटिश विमानांचे हल्ले नेहमीप्रमाणें रूर भागावर चालूंच होते. पण त्याचबरोबर मज नदीतीरावरील पुलांवरहि त्यांनीं बाँबवृष्टि केली. याच दिवशीं ब्रिटिश पार्लमेंटानें आणीबाणीचा प्रसंग आला असल्यामुळें सरकारला सर्वाधिकार देण्याचा निर्बंध संमत केला. या निर्बंधानें देशांतील व्यक्ति, संपत्ति, उद्योगधंदे यांचा राष्ट्ररक्षणाकरितां हवा तसा उपयोग करण्याचा अधिकार मंत्रिमंडळाला मिळाला.

## बूलोन्यचा पाडाव

२३ मेला जर्मन वैमानिकांनीं इंग्लिश खाडींतील फ्रेंच बंदरांवर आणि त्यांतल्या त्यांत बूलोन्य आणि आव्ह यांच्यावर निकराचे बाँबहल्ले केले. यांपैकीं पहिलें बंदर संध्याकाळीं जर्मनांना शरणहि गेलें. त्याच्या आधीं दुपारीं मि. चर्चिल यांनीं पार्लमेंटांत बोलतांना जर्मनांनीं आबेव्हिल जिंकलें असलें तरी बूलोन्य अजून लढविलें जात आहे आणि जर्मनांच्या वेढ्यांत सांपडलेलीं संयुक्त सैन्यें सोडविण्यासाठीं जनरल वेगां यांनीं हालचाली आरंभिल्या आहेत, असें सभासदांना आश्वासन दिलें होतें. या आश्वासनांत कितपत तथ्य होतें, हें इंग्लंडच्या प्रधानमंत्र्यांना माहीत होतेंच. त्यांतून कांहीं संशय उरलाच असल्यास तो दूर करण्याकरितां जर्मनांनीं आरास जिंकणाऱ्या ब्रिटिश सैन्यावर प्रतिचढाई करून त्याला पिटून काढलें, यामुळें तो नष्ट झालाच असला पाहिजे. या दिवशीं फ्रेंच मंत्रिमंडळानें फ्रेंच नागरिकांना आपलीं घरेंदारें सोडून पळून जाण्याला मनाई करण्याचें आज्ञापत्रक प्रसिद्ध केलें. पळापळीचा सांसर्गिक रोग सर्वत्र पसरल्यानंतर या आज्ञापत्रकाचा उपयोग थोडाच होता. त्याचप्रमाणें कारखाने हलवून सुरक्षित भागांत नेण्यालाहि फ्रेंच सरकारानें मनाई केली. याच दिवशीं इंग्लंडमध्यें सर ओस्वाल्ड मोस्ले आणि त्यांचे निकटचे सहकारी यांना अटक झाली. फ्रान्समध्येंहि असल्या संभाव्य देशद्रोह्यांना अटक करण्याचें सत्र चालूं झालें होतें.

## आपसांतील लाथाळी

२४मेला बूलोन्य जिंकणाऱ्या जर्मन सैन्यानें कालेपर्यंत प्रगति केली. या व्यतिरिक्त बेल्जममधील मोबज, तूर्ने, घेंत हीं सारीं महत्त्वाचीं ठिकाणें जर्मनांच्या हातीं पडलीं. याच दिवशीं फ्रेंच सेनापतींनीं वेढ्यांत सांपडलेल्या संयुक्त सैन्याची सुटका करणें अशक्य असल्याचें पर्यायानें सांगून टाकलें. बेल्जममध्यें कोंडलेल्या सैन्याची सुटका न होण्याचा सारा दोष फ्रेंचांनीं ब्रिटिशांवर लादला आहे. पण उलटपक्षीं ब्रिटिशांचें म्हणणें असें आहे कीं फ्रेंच सेनापतींनीं दक्षिणेकडून चढाई करण्याला विलंब लाविल्यामुळेंच जनरल वेगां यांच्या साऱ्या योजना फसल्या. ते म्हणतात कीं २१मेला ब्रिटिश सैन्यानें चढाई करून आरास नगर जिंकलें आणि ते दोन दिवस आपल्या हातींहि राखलें; पण या अवधींत फ्रेंचांनीं कांहींच हालचाल न केल्यामुळें जर्मनांना ब्रिटिशांवर प्रतिचढाई करून ब्रिटिशांना तेथून पळवून लावतां आलें; तरी सुद्धां २६ मेला पुनश्च संयुक्त सैन्यानें एकदम जर्मन सैन्यावर प्रतिचढाई करावी या योजनेला ब्रिटिशांनीं आपली संमति दिली. पण २५ मेला एकाएकीं बेल्जमच्या राजांनीं शरणागति पत्करल्यानें ब्रिटिशांना २६ ला हल्ला करणें अशक्यच झालें. याच दिवशीं ब्रिटिश वैमानिक दलाच्या प्रमुखांनीं प्रसिद्ध केलें कीं गेल्या दोन आठवड्यांत जर्मनीचीं निदान १५०० विमानें पाडलीं गेलीं. याच दिवशीं लॉर्ड हॅलिफाक्स यांनीं स्पेनचा अनुनय आरंभिला आणि सर सॅम्युएल होअर हे लौकरच स्पेनला सम्राटांचे दूत म्हणून जाणार असल्याची वार्ता प्रसिद्ध झाली. अमेरिकेंतील इंग्लंडचे राजदूत लॉर्ड लोदियन यांनीं याच दिवशीं इंग्लंड, फ्रान्स आणि बेल्जम यांच्या सरकारांच्या वतीनें युद्धामुळें निराश्रित झालेल्या जनतेला साहाय्य करण्याची अमेरिकन सरकारला विनंति केली. प्रे. रूझव्हेल्ट यांनींहि याच दिवशीं ५०००० स्वयंसेवकांना एका वर्षांत वैमानिकांचें शिक्षण देण्याचा संकल्प प्रकट केला.

२५ मेला वेढ्यांत सांपडलेल्या संयुक्त सैन्याची परिस्थिति अधिकच अवघड होऊं लागली. ओस्तेंद ( ऑस्टेंड ), काले आणि द्युंकेर्क ( डंकर्क ) एवढींच बंदरें आतां संयुक्त सैन्याच्या हातीं राहिलीं होतीं. घेंत आणि कूर्त्रे हीं ठिकाणें जर्मनीच्या ताब्यांत गेल्यामुळें त्यांनीं एके वेळीं एकेकाचा कांटा काढण्याच्या तत्त्वाप्रमाणें आतां बेल्जियन सैन्यावर निकराचे हल्ले आरंभिले होते. या हल्ल्यांना

तोंड देणें अशक्य झाल्यानें लिओपोल्ड राजांनीं जर्मनीला शरण जाण्याचा निश्चय केला. ही वार्ता बेल्जियन मंत्रिमंडळानें स्वतःच लंडनला जाऊन मि. चर्चिल यांना कळविली. याच दिवशीं फ्रेंचांनीं सुमारें १५ सेनापतींना पदच्युत करून त्यांच्या जागीं नवीन तरुण सेनापतींच्या नेमणुका केल्या.

## इटालीची युद्धप्रवेशाची सिद्धता

२६ मेला बूलोन्य पडल्याचें फ्रेंच सरकारानें मान्य केलें. याच दिवशीं आपण काले जिंकल्याचें जर्मनीनें प्रसिद्ध केलें. परिस्थिति अधिकाधिक अवघड झाल्यामुळें मो. रेनो यांनीं लंडनला जाऊन मि. चर्चिल यांची भेट घेतली. बेल्जमच्या आगामी शरणागतीमुळें ओढवणाऱ्या संकटाला तोंड कसें द्यावें, याची त्या उभयतांत चर्चा झाली. त्याचप्रमाणें इटालीच्या संभाव्य युद्धप्रवेशाचाहि त्यांनीं विचार केला. याच दिवशीं सर एडमंड आयर्नसाईड यांना युद्धयोजनाप्रमुखाच्या जागेवरून काढून त्यांचें पद सर जॉन डिल्ल यांना देण्यांत आलें. याच दिवशीं ब्रिटिश सरकारानें वेढ्यांत सांपडलेल्या सैन्याला सोडविण्याकरितां जनतेच्या मालकीच्या नौका मागविल्या. या लहान नौकांनींच पुढें डुंकेर्कच्या वेढ्यांतील अँग्लोफ्रेंच सैन्याची सुटका केली. या वेळीं इटालीच्या युद्धप्रवेशाची सिद्धता होऊं लागली होती. जर्मनीच्या विजयामुळें इटालीलाहि आफ्रिकेंत इतकाच सुलभ विजय मिळेल, असें गुडघ्याला बाशिंग बांधणाऱ्या अनेक उतावळ्या नवऱ्यांना वाटूं लागलें होतें. या वेळीं सि. व्हिर्जिनियो गायदा यांनीं जनतेला आठवण दिली कीं तटस्थ इटालीवर देखरेख करण्याकरितां संयुक्त राष्ट्रांचें १२ लक्ष सैन्य गुंतून पडलें आहे, एवढी आपण जर्मनीची कामगिरी बजावीत आहोंत, तें पुरें आहे. पण या सूचनेकडे लक्ष्य न देतां इतर पुढारी इटालीला युद्धांत पडण्याबद्दल चिथावणी देत होते. जून १० ते २० या अवधींत जर्मनी पारीस जिंकून लंडनवर चढाई करील, अशी इटालियनांची कल्पना होती. त्याकरितां त्या अवधींत चढाई करण्याचा इटालियन सरकारचा विचार होता. याच दिवशीं प्रे. रूझव्हेल्ट यांनीं जगांतील सर्वांत बलिष्ठ युद्धयंत्र निर्माण करण्याचा आपला संकल्प नभोवाणीवरून घोषित केला.

## बेल्जमची शरणागति

२७ मेला लिओपोल्ड राजांनीं बेल्जियन सेनेचे प्रमुख या नात्यानें जर्मनीकडे शस्त्रसंधीची मागणी केली आणि बेल्जियन सैन्यानें आपल्या ताब्यांतील प्रमुख ठाणीं सोडून देऊन माघार घेण्याला प्रारंभ केला. यापूर्वीच बेल्जमचें मंत्रिमंडळ पारीस येथें जाऊन बसलें होतें. आणि त्या मांत्रिमंडळानें स्वतंत्र सांधि न करण्याचें आश्वासन संयुक्त राष्ट्रांना दिलें होतें. आपल्या राजांनीं जर्मनीला शरण जावयाचें ठरविलेलें पाहून त्या देशभ्रष्ट मंत्र्यांनीं फ्रेंच प्रधानमंत्र्यांशीं वाटाघाटी आरंभिल्या. बेल्जमचे राजे शरण गेले तरी निदान त्या देशाची गणना अँग्लो-फ्रेंचांनीं शत्रुराष्ट्रांत करूं नये, एवढाच या वाटाघाटींचा उद्देश होता. याच दिवशीं इटालीनें युद्धांत पडूं नये, याकारितां इटालियन नौकांची झडती घेण्याचा अधिकार सोडून देण्याची इंग्लंडनें सिद्धता व्यक्त केली. मात्र याकरितां अशा नौकांवरून इटालीला येणारा माल इटालीनें स्थलमार्गानें जर्मनीला न धाडण्याचें इंग्लंडला आश्वासन द्यावें एवढीच इटालीला विनंति केली. एखाद्या राष्ट्राला तटस्थ ठेवण्याला असल्या सवलती पुऱ्या पडत नाहींत, एवढेंहि या सवलती देऊं करणाऱ्या राष्ट्रनेत्यांना कळलें नव्हतें! असो, याच दिवशीं व्यापारासंबंधीं वाटाघाटी करण्याच्या निमित्तानें सर स्टॅफोर्ड क्रिप्स हे मॉस्कोला गेले. जर्मनी आणि रशिया यांच्या कलहाग्नीवर तेल ओतण्याचें कार्य सर स्टॅफोर्ड यांनीं किती कुशलतेनें केलें असेल, याची कॉंग्रेस आणि लीग यांच्या कलहांत त्यांनीं बजावलेल्या कामगिरीवरून आपल्याला कल्पना करतां येते.

## शरणागतीचा परिणाम

२८ मेला जर्मनांनीं लिओपोल्ड राजांच्या शस्त्रसंधीच्या मागणीला नकार दिला. तेव्हां त्यांनीं पूर्णपणें शरण जाण्याचें ठरवून त्याच दिवशीं पहाटे ४ वाजतां शस्त्रें खालीं ठेविलीं. ही वार्ता प्रसिद्ध होतांच लिओपोल्ड राजांवर संयुक्त राष्ट्रांकडून शिव्याशापांची वृष्टि होऊं लागली. प्रथम पारीसमधील देशभ्रष्ट बेल्जियन मंत्रिमंडळानें आपल्या राजांचा निषेध केला. त्यानंतर थोड्या वेळानें फ्रान्सचे प्रधानमंत्रि मो. रेनो यांनीं नभोवाणीवरून भाषण करून लिओपोल्ड राजांच्या विश्वासघाताचा तीव्र निषेध केला. मि. चर्चिल यांनीं मात्र या वेळीं इतरांपेक्षां थोडा संयम व्यक्त करून सेनापति या नात्यानें लिओपोल्ड राजांनीं केलेल्या

कृतीवर टीका करण्याचें नाकारलें. पण त्याचबरोबर त्यांच्या शरणागतीमुळें ब्रिटिश सैन्याची परिस्थिति आतिशय अवघड झाल्याचेंहि त्यांनीं जनतेला सांगितलें आणि प्रारंभीं पराजय झाले तरी अंतिम विजय मिळेपर्यंत लढण्याचा निश्चय त्यांनीं व्यक्त केला.

## ब्रिटिशांचें पलायन

२९ मेला संयुक्त राष्ट्रांनीं जर्मनीच्या सांपळ्यांत अडकलेल्या आपल्या सैनिकांना ढुंकेर्क बंदराच्या मार्गानें सोडविण्याचा प्रयत्न आरंभिला. या वेळेपर्यंत ओस्तेंदचें बंदरहि जर्मनीनें जिंकलें असल्यानुळें ढुंकेर्कवांचून पलायनाचा दुसरा मार्ग उरला नव्हता. या बंदराच्या शेजारीं समुद्र आतिशय उथळ असल्यानें मोठ्या नौकांना बंदरापासून १२ मैलांवर थांबावें लागे. अगदीं लहान नौकांनासुद्धां समुद्रतीरापासून सुमारें अर्ध्या मैलावर उभे रहावें लागे. प्रत्यक्ष ढुंकेर्कच्या बंदरांत विनाशिकांपेक्षां अधिक मोठ्या नौकांचा प्रवेश होत नसे. या बंदरावरहि जर्मन विमानांचे हल्ले सतत चालूं होते. ढुंकेर्कच्या परिसरांत तीन लक्षांहून अधिक सैनिक एकत्रित झाले असून आपली सुटका होण्यापूर्वी तें बंदर जर्मनांच्या हातीं पडूं नये यासाठीं ते निर्वाणीच्या धैर्यानें लढत होते. या लढाईचा मुख्य भार इंग्रजांनीं त्यांच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणें फ्रेंच सैनिकांवरच टाकला होता. या लढाईंत पहिल्या फ्रेंच सैन्याचे आधिपति जनरल प्रिऊ यांना ३० मेला जर्मनीनें त्यांच्या हाताखालील सर्व अधिकाऱ्यांसह अटक केली. याच दिवशीं नवीन ब्रिटिश सैन्य फ्रान्सच्या साहाय्याकरितां उतरलें असल्याची इंग्रजांनीं घोषणा केली. हें सैन्य बोर्दो बंदराकडे उतरविलें होतें. वास्तविक पाहतां हें सबंध सैन्य नसून एक डिव्हिजन इतकीच त्याची संख्या होती. असो; याच दिवशीं फ्रेंच सरकारानें आपण इटालीला संतुष्ट करण्याला सिद्ध असल्याचें लेखी आभिवचन सि. मुस्सोलिनींना दिलें. पण या वचनाचा इटालीच्या प्रधानमंत्र्यांनीं उपयोग करून घेतलेला दिसत नाहीं. याच दिवशीं जर्मनीनें डॉ. साइस इन्क्वार्ट यांना हॉलंडचे सर्वाधिकारी नेमलें. याच पापाबद्दल त्यांना पुढें न्युरेंबेर्ग येथें फांशी देण्यांत आलें.

## युद्धपथावरील इटाली

३१ मेला दाट धुकें पडल्यामुळें ब्रिटिश सैन्याची सुटका करण्याचें काम




जर्मनीचें वाढतें साम्राज्य (पृ. १२२)

बरेंच सुकर झालें. या दिवशींच लंडनमधील तज्ज्ञांनीं ¾ सैन्याची सुटका झाली असल्याची अटकळ केली. पण ती बहुधा अतिशयोक्ति होती. कारण, मग उर-लेलें सैन्य काढून नेण्याचें काम आणखी चार दिवस चालण्याचें कांहीं कारण नव्हतें. असो; याच दिवशीं पारीस येथें अँग्लोफ्रेंच राष्ट्रप्रमुखांची बैठक होऊन उरलेल्या फ्रान्सचा बचाव करण्याच्या प्रश्नाचा विचार झाला. याच वेळीं बेल्ज-मच्या देशभ्रष्ट सरकारानें आपल्या राजांची निंदा करणारे ठराव प्रसिद्ध केले. रोममधील अमेरिकेचे राजदूत, हिंदुस्थानाच्या परिचयाचे मि. फिलिप्स यांनीं याच दिवशीं सि. मुस्सोलिनींची भेट घेऊन त्यांना अमेरिकेच्या अध्यक्षांचा नवीन आदेश ऐकविण्याचा प्रयत्न केला. पण सि. मुस्सोलिनींनीं त्यांना भेटच दिली नाहीं. तेव्हां तो संदेश बहुधा काउंट चियानोंच्या कर्णरंध्रांत प्रविष्ट करूनच मि. फिलिप्स यांना कृतकृत्य व्हावें लागलें. याच दिवशीं फ्रेंच सरकाराशीं बोलणें करण्यालाहि सि. मुस्सोलिनींनीं नकार दिला.

१ जूनला अँग्लोफ्रेंच राष्ट्रप्रमुखांचें पत्रक प्रसिद्ध होऊन लढाई तशीच निकरानें चालविण्याचा संकल्प त्यांनीं व्यक्त केला. आदल्या दिवसाच्या बैठकींत इटालियन आक्रमणाला तोंड कसें द्यावें आणि रशियाचें साहाय्य कसें मिळवावें, याहि प्रश्नांची चर्चा झाली होती. पण स्वाभाविकपणेंच त्यांचा प्रकट पत्रकांत उल्लेख झाला नाहीं. याच वेळीं नॉर्वेंतील नार्व्हिक बंदर सोडून देऊन अवशिष्ट सैन्य परत आणण्याचाहि बेत ठरला. याच दिवशीं इटालीनें इंग्लंड आणि फ्रान्स यांच्याबरोबर जीं कांहीं व्यापारी बोलणीं चालू होतीं, तीं बंद केलीं असल्याची घोषणा केली. इटालीच्या परराष्ट्रखात्याचें मुखपत्र जें 'रेलाझिओनी इंतेरनाझि-ओनाली,' त्यानें अँग्लोफ्रेंचांविरुद्ध लौकरच युद्धाची घोषणा होणार असल्याचें प्रसिद्धहि करून टाकलें. याच दिवशीं जर्मन वैमानिकांनीं इटालीलगतच्या फ्रेंच प्रांतांवर बाँबवृष्टि आरंभिली. ही बाँबवृष्टि दुसऱ्या दिवशींहि तशीच चालू राहिली. तिचा उद्देश अर्थात् फ्रान्सविरुद्ध युद्ध पुकारण्याला इटालीला उत्तेजन देणें हाच होता. २ जूनला मि. अँथनी इडन यांनीं ड्युंकेर्कच्या मार्गानें ⅘ ब्रिटिश सैन्याची सुटका झाली असल्याची घोषणा केली, मात्र त्या सैन्याचें सारें साहित्य शत्रूच्या हातीं पडलें असल्यानें त्याची भरपाई करण्यासाठीं आपल्या परिश्रमांची पराकाष्ठा कर-ण्याची त्यांनीं इंग्लंडच्या कामगारांना विनंति केली. या दिवशीं इटाली युद्धांत पडणार असल्याच्या इटालियन पुढाऱ्यांच्या गर्जना चालूच होत्या. अशा वेळीं

आपल्यालाहि कदाचित् युद्धांत भाग घ्यावा लागेल, अशा आशयाचें भाषण तुर्कस्थानाच्या प्रधानमंत्र्यांनीं केलें आणि त्यामुळें इटाली शत्रूला मिळाला तर तुर्कस्थान आपल्या पक्षाला मिळेल, अशी आशा कित्येक अँग्लोफ्रेंच नेत्यांना वाटूं लागली.

## स्टॅफोर्ड क्रिप्स मॉस्कोकडे

३ जूनला पारीसच्या परिसरांवर जर्मन विमानांनीं बरीच मोठी बॉबवृष्टि केली याच दिवशीं धंकेर्कचा बचाव करणाऱ्या सैन्याची फळी फोडून जर्मन सैन्य त्या बंदरांत घुसूं लागलें आणि दुसरे दिवशीं त्या सैन्यानें धुंकेर्कचा पुरता ताबा घेतला. मि. चर्चिल यांनीं याच दिवशीं एक विस्तृत भाषण करून आतांपर्यंतच्या युद्धाचें समालोचन केलें. ते म्हणाले "बेल्जममध्यें ब्रिटिश सैन्य नेण्याची रणनीति सपशेल चुकीची होती. या चुकीच्या रणनीतिमुळें इंग्लंडच्या ३३५००० सैन्याला आपलीं शस्त्रास्त्रें टाकून पळून यावें लागलें. यांत सुमारें ३०००० सैनिक गमावले, ते वेगळेच." या साऱ्या चढाईंत जर्मनीचे अवघे १०००० सैनिक ठार आणि ४०००० घायाळ झाले होते. येवढी हानि सोसून जर्मनीनें हॉलंड, बेल्जम, इंग्लंड आणि फ्रान्स यांच्या सरासरी १५ लक्ष सैन्याचा चक्काचूर केला होता. या लढाईंत मिळालेली युद्धसामुग्री नवीन ८० डिव्हिजन सैन्य उभारण्याला पुरेशी होती. ४ जूनलाच सर स्टॅफोर्ड क्रिप्स यांची मॉस्को येथें इंग्लंडचे राजदूत म्हणून नेमणूक झाल्याचें आणि त्यांच्या नेमणुकीला रशियाची संमति मिळाली असल्याचें प्रसिद्ध झालें.

## सोमनदीची लढाई

५ जूनला दुसऱ्या महायुध्दांतील सोम नदीच्या लढाईला तोंड लागलें. ही लढाई लाओंपासून इंग्लिशखाडीपर्यंतच्या शंभर मैलांच्या आघाडीवर मुख्यत: लढली गेली. या दिवशीं मो. रेनो यांनीं परराष्ट्रीय राजकारणांतले मानापमान बाजूला ठेवून स्वतः प्रे. रूझव्हेल्ट यांच्याकडे वैमानिक साहाय्याची याचना केली. याच दिवशीं शार्ल जूलियाँ मास्सों या फ्रेंच वैमानिक दलांतलि एके काळच्या कप्तानाला आणि त्याच्या तिघां साथीदारांना जर्मनांना फ्रेंच विमानतळांची विश्वसनीय माहिती पुरवून फ्रान्सच्या वैमानिकदळाच्या विनाशाला कारणीभूत झाल्या-

बद्दल देहांत प्रायश्चित्त मिळालें. याच दिवशीं अमेरिकेनें सहा लक्ष रायफली आणि २५०० तोफा संयुक्त राष्ट्रांना विकण्याची सिध्दता व्यक्त केली.

६ जूनला मो. रेनो यांनीं आपल्या मंत्रिमंडळाची पुनश्च पुनर्घटना करून जेनेराल द. गोल यांना युद्धमंत्र्यांच्या चिटणिसाचें पद दिलें आणि मो. दालादिए यांना मंत्रिमंडळांतून काढून टाकलें. या पुनर्घटनेनंतर 'आतां आम्ही शत्रूला थोपवून धरूं शकूं' अशी आशा मो. रेनो यांनीं नभोवाणीवरून व्यक्त केली. याच वेळीं आबेव्हिल आणि शमँ दे दाम या आघाडीच्या दोनहि टोकांवर फ्रेंच सैन्यानें पुन्हा माघार घेतली. मो. रेनो यांच्या विनंतीला मान देऊन प्रे. रूझव्हेल्ट यांनीं ५० विमानें संयुक्त राष्ट्रांकडे थोड्या पर्यायानें धाडलीं! जिथें ५००० तरी विमानांची आवश्यकता होती, तिथें ५० पाठवून काय कात होणार होता, हें उघडच आहे. ७ जूनला मो. रेनो यांनीं आपल्या युद्धमंडळाची पुनश्च पुनर्घटना केली. या साऱ्या पुनर्घटनांवरून फ्रान्सची लोकसत्ता आत्मसंरक्षणाला किती निरुपयोगी बनली होती, याची मात्र चांगली कल्पना येते. असो. या दिवशीं सोम नदीतीरावरील फळी अनेक ठिकाणीं फुटली आणि ८ जूनला तर सुमारें साठ मैलांच्या आघाडीवर फ्रेंच सैन्यानें १५ ते २० मैलांची माघार घेतली. या माघारीच्या वार्तेमुळें इटालीला युद्धांत प्रवेश करण्याला अधिकच प्रोत्साहन मिळालें. याच दिवशीं सर सॅम्युएल होअर हे एके काळचे भारतमंत्रि माद्रिद येथील ब्रिटिश राजदूताच्या कामावर दाखल झाले. अमेरिकेंतील कारखानदारांकडे आतांपर्यंत आठ सहस्र विमानांची मागणी नोंदली असून एकंदर २००० विमानें हातीं पडलीं असल्याचें संयुक्त राष्ट्रांच्या क्रयसमितीनें प्रसिद्ध केलें.

## इटालीचा युद्धप्रवेश

९ जूनला जर्मनीनें माजिनो तटबंदीच्या पिछाडीवर हल्ला करण्याच्या उद्देशानें रेतेल आणि आर्गोन्न या भागांत मोठी चढाई आरंभिली. या चढाईचें स्वरूप पाहून फ्रेंच सरकारानें पारीस सोडून जाण्याची पूर्वसिद्धता करण्याला प्रारंभ केला. नागरिकांनींहि पळापळ आरंभिली. या दिवशीं रुआँ जिंकून पारीसकडे जर्मन सैन्यानें दौड आरंभिली जर्मन सैन्य ३५ मैलांवर येऊन पोंचल्यानें फ्रेंचांचा सर्वत्र धीर खचूं लागला. दुसरे दिवशीं बोव्हे नगराच्या बाजूनें जर्मन

सेना २५ मैलांवर येऊन ठेपली. फ्रान्सच्या या निर्वाणीच्या प्रसंगीं मि. चर्चिल यांनीं मो. रेनो यांना एक तार पाठवून फ्रान्सला साहाय्य करण्याची इंग्लंड पराकाष्ठा करीत असल्याचें कळविलें. याच दिवशीं म्हणजे जर्मन चढाईला एक महिना झाल्यानंतर इटालीनें अँग्लोफ्रेंचांविरुद्ध युद्ध पुकारलें.

## फ्रान्सचा संपूर्ण पराजय

११ जूनला मार्न नदीच्या उत्तरेला जर्मन सैन्याच्या माऱ्यापुढें फ्रेंच सैन्याचा टिकाव न लागल्यामुळें तें सैन्य नदी ओलांडून दक्षिणेला निघून आलें. सेन नदीच्या कांठच्या फ्रेंच सैन्याची फळी आधींच फुटून जर्मनीचे रणगाडे पारीसच्या आसमंतांत येऊन पोंचले होते. याच दिवशीं फ्रान्सची राजधानी मुसलमानांवर मिळविलेल्या विजयानें इतिहासांत प्रसिद्ध असलेल्या तूर्स नगरीला गेली. त्याबरोबर इतर निर्वासितांनींहि तिकडेच धाव घेतली आणि तिची लोकसंख्या कांहीं तासांतच पूर्वीच्या चौपट झाली. याच दिवशीं मि. चर्चिल, मि. ईडन, जनरल डिल्ल आणि इतर अधिकारीहि मो. रेनो यांच्याशीं वाटाघाटी करण्याकरितां तिथें आले. याच दिवशीं इंग्लिश पार्लमेंटांत मि. ॲटली यांनीं इटालीच्या युद्धघोषणेवर भाषण करून इटालियन लोकांना लौकरच आपल्या कृतीचा पश्चात्ताप होईल अशी धमकी दिली. इटालियन विमानांनीं माल्टा आणि सुएझ यांवर हल्ले करून युद्धाचा प्रारंभ केला.

१२ जूनला जर्मन युद्धपत्रिकेनें फ्रान्सच्या लढाईत आपला संपूर्ण विजय झाल्याची घोषणा केली. या दिवशीं जर्मन सैन्य पारीसपासून १२ मैलांवर जाऊन पोंचलें आणि फ्रेंच राजांच्या राज्याभिषेकाचें नगर म्हणून प्रसिद्ध असलेलें रेम्स त्यांच्या हातीं पडलें. नॉर्मंडीची राजधानी रूआँ ही यापूर्वीच त्यांनीं जिंकली होती. मार्न नदी जर्मनांनीं ओलांडल्याचें या दिवशीं फ्रेंचांनीं मान्य केलें. पण वस्तुस्थिति त्याहून अधिक भयंकर होती. फ्रेंच सैन्याच्या वरिष्ठ सेनापतींचें आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांशीं दळणवळण उरलें नसल्यानें अनेक ठिकाणीं खालचे अधिकारी आणि सैनिक युद्धत्याग करून घरांकडे चालते झाले. तूर्सवर जर्मनांनीं बॉंबवृष्टि केली. इंग्लिश प्रधान आपली वाटाघाट संपवून घरीं गेले. त्यांच्यामागें फ्रेंच प्रधानमंडळाची सभा भरली असतां जनरल वेगां यांनीं जर्मनीकडे शस्त्रसंधीची याचना करण्याचा उपदेश केला. तेव्हां फ्रेंच प्रधानमंडळानें

मि. चर्चिल यांना परत वाटाघाटीसाठीं बोलावण्याचें ठरविलें. कारण इंग्लंडला सोडून स्वतंत्र संधि न करण्याचें अभिवचन फ्रान्सनें दिलेलें होतें.

## पारीसची शरणागति

१३ जूनला तीन बाजूंनी जर्मनांनीं पारीस वेढलेलें पाहून अमेरिकेचे राजदूत मि. बुलिट यांच्या वतीनें ती नगरी जर्मनांच्या स्वाधीन करण्याचें तेथील फ्रेंच सेनापतींनीं ठरविलें. याच दिवशीं फ्रेंच प्रधानमंडळाची सभा भरून तिनें ब्रिटिश प्रधानांशीं शरणागतीच्या प्रश्नाची वाटाघाट करण्याची सूचना केली. ही सूचना अर्थात् मि. चर्चिल यांनीं धुडकावून दिली. मो. रेनोंच्या बरोबर बोलणीं करून ते परस्पर लंडनला निघून गेले. फ्रेंच मुख्य प्रधानांनी या दिवशीं प्रे. रूझव्हेल्ट यांना आपल्या साहाय्यासाठीं धावून येण्याची विनंति केली.

१४ जूनला जर्मनांनीं पारीस नगरी आपल्या ताब्यांत घेतली. इंलिश खाडीं-तील आव्हृ बंदर याच दिवशीं त्यांच्या हातीं पडलें आणि शेरबूर्गकडे त्यांची चढाई चालू झाली. फ्रेंच युद्धपत्रिकेनें मान्य केलें कीं जर्मनांच्या त्वरित प्रगती-मुळें त्यांचे आतां 'माजिनो' तटबंदीवर पिछाडीकडून हल्ले चालू झाले आहेत आणि या हल्ल्यांच्या प्रतिकाराला त्या तटबंदीवरील तोफांचा मुळींच उपयोग होण्याजोगा नाहीं. याच दिवशीं फ्रेंच सरकार तूर्स सोडून बोर्दोला गेलें.

## मार्शल पेतँ प्रधानमंत्रि

१५ ला म्हणण्याजोगी विशेष घटना कांहीं घडली नाहीं. पण १६ जूनला मि. चर्चिल यांनीं इंग्लंड आणि फ्रान्स यांचें संयुक्त साम्राज्य करण्याची संधि मरूं घातलेल्या तिसऱ्या फ्रेंच लोकसत्ताक राज्याला दिली. पण त्या संधीचा त्यांना उपयोगच करावयाचा नव्हता. फ्रेंच प्रधानांच्या विनंतीला प्रे. रूझव्हेल्ट यांच्याकडून उत्तर आलें होतें. पण त्यांत फ्रान्सच्या वतीनें युद्ध पुकारण्याचें आश्वासन नसल्यानें तेंहि पराजित फ्रान्सच्या मंत्रिमंडळाला आशाजनक वाटेना. त्यांच्या साऱ्या आशा आतां शस्त्रसंधीवर खिळून राहिल्या होत्या. या महत्त्वाच्या प्रश्नाची चर्चा संपूर्ण मंत्रिमंडळांत होऊन १३ विरुद्ध ११ मतांनीं जर्मनीकडे शस्त्रसंधीची मागणी करण्याचा निर्णय झाला. मंत्रिमंडळाचा निर्णय आपल्या धोरणाविरुद्ध झालेला पाहून मो. रेनो यांनीं लगेच अधिकारत्याग केला. तेव्हां

फ्रान्सच्या अध्यक्षांनीं मार्शल पेतँ यांना नवें मंत्रिमंडळ बनविण्याची आज्ञा केली. त्यांचें मंत्रिमंडळ आधींपासून सिद्धच होतें. त्याला अध्यक्षांची संमति मिळतांच स्पेनचे राजदूत सिन्योर लकेरिका यांच्या द्वारा मार्शल पेतँ यांनीं जर्मनीकडे शस्त्रसंधीची मागणी केली. ही वार्ता मि. चर्चिल यांना कळली तेव्हां ते पुनश्च फ्रान्सला जाण्याच्या मार्गावरच होते. लगेच आगगाडींतून उतरून त्यांनीं आपलें कार्यालय गांठलें आणि निदान फ्रेंच नौदलाला इंग्लडकडे जाण्याचा आदेश देण्याची सूचना फ्रेंच सरकाराला त्यांनीं केली. कारण तें जर्मनांच्या हातीं लागण्यापासून इंग्लंडला मोठाच धोका होता. असो, याच दिवशीं माजिनो तटबंदीच्या रक्षणासाठीं ठेवलेलें फ्रेंच सैन्य पिछाडीकडून जर्मनांचा हल्ला आला म्हणून तटबंदी सोडून पळून गेलें. अर्थात तें सारें लौकरच जर्मनांच्या अटकेंत सांपडलें, हें सांगायला नकोच.

## फ्रेंच-शरणागतीच्या वाटाघाटी

१७ जूनला मार्शल पेतँ यांनीं नभोवाणीवरून, जर्मनीला शरण जाण्याकरितां आपण आपल्या हातीं अधिकार घेतला असल्याची घोषणा केली. या घोषणेला प्रत्युत्तर म्हणून जर्मनीनेंहि हेर हिटलेर आणि सिन्योर मुस्सोलिनी हे फ्रान्सशीं कोणत्या अटींवर संधि करावा, याच्या वाटाघाटीसाठीं लौकरच म्यूनिच येथें भेटणार असल्याचें प्रसिध्द केलें. या घोषणेप्रमाणें १८ जूनच्या दुपारीं जर्मनी आणि इटाली यांचे राज्यकर्ते म्यूनिच येथें भेटले आणि त्यांनीं फ्रान्सवर लादावयाच्या अटी निश्चित केल्या. या अटी स्पॅनिश सरकाराला कळविण्यांत आल्या आणि त्या सरकाराकडून स्पेनचे फ्रान्समधील राजदूत सिन्योर लकेरिका यांना त्या अटी कळल्या. मग त्यांनीं त्या फ्रेंच सरकाराला कळविल्या. परराष्ट्रीय राजकारणांत असले द्राविडी प्राणायाम नेहमींच करावे लागतात. याच दिवशीं मि. चर्चिल यांनीं पुन्हा एकवार भाषण करून युध्द चालूं ठेवण्याचा इंग्लंडचा निर्धार आणि जय मिळाल्यास फ्रान्सचाहि पुनरुध्दार करण्याचा संकल्प व्यक्त केला. त्यांच्या मागून जेनेराल द गोल यांनीं ब्रिटिश नभोवाणीवरून भाषण करून स्वतंत्र फ्रान्सच्या चळवळीचा झेंडा फडकविला.

असो. जर्मनीच्या अटी फ्रान्सला कळल्यानंतर मुख्यतः दोन प्रश्नांसंबंधी चर्चा चालूं झाली. एकतर संधीवर स्वाक्षरी करण्याकरितां कोणाची नेमणूक कराव-

याची आणि फ्रेंच नौदल जर्मनांच्या हातीं लागूं द्यावयाचें कीं नाहीं ? यांपैकीं दुसरा प्रश्न इंग्लंडच्या जीवनमरणाचा असल्यानें त्यासंबंधीं चर्चा करण्याकरितां हिंदुस्थानाच्या परिचयाचे नौदलमंत्रि मि. ॲलेक्झांडर, मुख्य नौदलपति सर डडले पौंड, आणि मुंबईचे पूर्वीचे प्रांताधिपति लॉर्ड लॉइड ही सारी मंडळी बोर्दोला येऊन बसली होती. या मंडळींना व्यक्तिशः आश्वासनें भरपूर मिळालीं. पण सरकारी रीत्या आश्वासन देण्याला नवें फ्रेंच सरकार सिद्ध होईना. हें दुबळें फ्रेंच सरकार अजूनहि जर्मनीविरुद्ध लढेल, अशी कित्येकांना आशा वाटत होती. पण त्या सरकारचे गृहमंत्रि मो. पोमारे यांनीं जर्मनीला प्रतिकार करण्याचा उपदेश केल्याबद्दल जेव्हां द गोल यांचा धिःक्कार केला आणि त्यांना इंग्लंडहून फ्रान्सला परत येण्याची आज्ञा सोडली, तेव्हां ती आशा सोडावीच लागली. याच वेळीं फ्रेंच साम्राज्याची विल्हेवाट लागावयाची असल्यास इंडोचायनाची व्यवस्था आपल्या इच्छेप्रमाणें झाली पाहिजे, असें जपानी राष्ट्राच्या नेत्यांनीं प्रतिपादण्यास प्रारंभ केला.

## फ्रेंच पराभवाची मीमांसा

२० जूनला शस्त्रसंधीच्या अटींवर स्वाक्षरी करण्याकरितां मार्शल पेतँ यांनीं जनरल हुंत्झीगेर, रेअरॲडमिरल मोरिस लल्युक्, विमानदलाचे अधिपति बेर्जेरे आणि परराष्ट्रीय विभागांतील एक तज्ज्ञ मो. लेऑं नोएल् यांच्या नेमणुकी केल्या. पहिल्या महायुद्धांत जर्मनांनीं ज्या ठिकाणीं आणि ज्या आगगाडीच्या डब्यांत शरणचिठ्ठी लिहून दिली होती, त्याच ठिकाणीं आणि त्याच आगगाडीच्या डब्यांत या प्रतिनिधींकडूनहि जर्मनीनें पुढें शस्त्रसंधीच्या अटींवर स्वाक्षरी घेतली. असो, या दिवशींची सर्वांत महत्त्वाची घटना म्हणजे फ्रान्सच्या पाडावावर झालेलें मार्शल पेतँ यांचें भाषण होय. या भाषणांत ते म्हणाले, 'पहिल्या महायुद्धांत फ्रेंच सैन्याचा मोठ्या प्रमाणावर संहार होऊनसुद्धां तीन वर्षांच्या लढाईनंतर फ्रान्सजवळ ३२८०००० सैनिक होते. उलटपक्षीं चालू महायुद्धांत आमची कांहींच हानि न होऊनसुद्धां यंदाच्या मे मासाच्या प्रारंभीं आमच्याजवळ अवघें २७॥ लक्ष सैन्य होतें. पहिल्या महायुद्धांत इंग्लिशांच्या ८५ इटालियनांच्या ५८ आणि अमेरिकनांच्या ४२ इतक्या डिव्हिजन्स फ्रान्सच्या वतीनें लढत होत्या. उलटपक्षीं इंग्लंडच्या अवघ्या १० डिव्हिजन्स या युद्धांत

आमच्या साहाय्याला आल्या. सैनिकांच्या कमतरतेपेक्षाहि शस्त्रांची कमतरता आम्हांला अधिक जाणवत होती. आमच्या वैमानिकांच्या सहापट तरी शत्रूचे वैमानिक होते. पहिल्या महायुद्धाच्या मानानें आतां आम्हांला मित्रहि कमी होते, पुत्रहि कमी होते आणि शस्त्रेंहि कमी होतीं. पहिल्या महायुद्धांतील विजयापासून आतांपर्यंत फ्रेंच लोकांनीं विलासांत दिवस घालविले त्याचा हा परिणाम आहे. या काळयाकुट्ट दिवसांत फ्रेंच लोकांबरोबर मार्गदर्शक म्हणून मी रहावयाचें ठरविलें आहे.'

## युद्ध चालविण्याची शक्याशक्यता

परिस्थिति इतकी वाईट असूनसुद्धां जर्मनीशीं तशीच पुढें लढाई चालूं ठेवण्याचा उपदेश कांहीं फ्रेंच नेते करीतच होते. त्यांच्या उपदेशांत काय अर्थ होता, हें मला तरी कळत नाहीं. आफ्रिकेंतून लढाई चालू ठेवण्याच्या उपदेशाचा परिणाम इतकाच झाला असता कीं १९४० च्या जुलैतच जर्मनीनें टयूनिस, अल्जीरिया, मोरोक्को इत्यादि फ्रान्सचे प्रांत हस्तगत केले असते. ही गोष्ट तेव्हां घडून आली असती म्हणजे त्याच वर्षी जनरल रोम्मेलची इजिप्तवरहि स्वारी झाली असती. हीं सारीं संकटें मार्शल पेतँ यांच्या शरणागतीमुळें टळलीं आणि इंग्रजांना इटालियनांविरुद्ध स्वस्तं विजय मिळविण्याला संधि सांपडली. या साऱ्या परिस्थितीचा विचार न करतां इंग्लिश इतिहासकार मार्शल पेतँ यांची निंदा करीतच असतात. असो, मार्शल पेतँ यांनीं मात्र वस्तुस्थिति ओळखून भलत्या नादीं न लागतां जर्मनीकडून शस्त्रसंधीच्या अटी मिळतांच त्यांच्यावर स्वाक्षरी करण्याचा कानमंत्र आपल्या प्रतिनिधींना दिला आणि त्याप्रमाणें २२ जूनला फ्रान्सच्या शस्त्रसंधीवर फ्रेंच आणि जर्मन प्रतिनिधींची स्वाक्षरी झाली. पाठीमागून इटालीबरोबरहि एक वेगळा शस्त्रसंधि फ्रान्सला करावा लागला!

या ठिकाणीं आफ्रिकेंतून लढाई चालूं ठेवण्याच्या प्रश्नाची आणखी थोडी चर्चा केली पाहिजे. अनेक युद्धतज्ज्ञांचें म्हणणें असें आहे कीं फ्रान्सच्या लढाईत पराभव होतांच फ्रेंच सेनापतींनीं आपल्या सैन्यांना सरळ भूमध्य समुद्रावरील बंदरांकडे पळ काढण्याचा आदेश द्यावयाला पाहिजे होता, म्हणजे फ्रेंच सैन्यांतील मोठा भाग उत्तर आफ्रिकेंत बचावून नेतां आला असता आणि भूमध्य समुद्रावर अँग्लोफ्रेंच आरमाराचेंच आधिपत्य असल्यामुळें जर्मनांना आफ्रिकेंत

सैन्य उतरवून त्याचा पाठलाग करतां आला नसता. आपण असें गृहीत धरूं कीं फ्रान्सला उत्तर आफ्रिकेंत पांचसात लक्ष सैनिकांना सुरक्षित नेतां आलें असतें. पण या सैनिकांना शस्त्रास्त्रांचा पुरवठा त्या भागांत होणें फारसें शक्य नव्हतें. स्वतः फ्रान्समधील लढाईंत जिथें फ्रेंचांना आधुनिक शस्त्रास्त्रांचा तुटवडा पडला, तिथें आफ्रिकेंत काय दिवे लागणार होते, तें उघडच आहे. अँग्लो-फ्रेंचांच्या नौदलानें जर्मनांना आफ्रिकेंत उतरणें अशक्य केलें असतें, या म्हणण्यालाहि पुढील इतिहासाचा पाठिंबा मिळत नाहीं. १९४२ च्या अंतीं ज्याप्रमाणें जर्मनांनीं तडकाफडकीं टयूनिसमध्यें प्रथम विमानांतून सैन्य उतरवून तें बंदर हस्तगत केलें आणि मागाहून तेथें जलमार्गानें सैन्य आणलें त्याप्रमाणेंच १९४० मध्येंहि त्यांनीं आफ्रिकेंतून युद्ध चालू ठेवूं पाहणाऱ्या फ्रेंचांना हात दाखविला असता. या वेळीं अँग्लोफ्रेंचांच्याकडे विमानें आणि रणगाडे यांचा दुष्काळच असल्यानें नुसत्या मनुष्यबळाचा आफ्रिकेंतहि फारसा उपयोग झाला नसता. उलटपक्षीं जर्मनीला फ्रेंचांचे उत्तर आफ्रिकेंतील प्रांत व्यापतां आले असते, तर ब्रिटिशांच्या नौदलाचेंहि भूमध्यसमुद्रांतून उच्चाटन झालें असतें. एकंदरीनें पाहतां मार्शल पेतँ यांनीं जर्मनीला शरण जाऊन इंग्रजांवर उपकारच केले असें म्हणावें लागतें. फ्रान्सनें आफ्रिकेंतून युद्ध चालविण्याचें मान्य केलें असतें तर इंग्लंडला दंडेलीनें फ्रेंच नौदल आपल्या ताब्यांत घ्यावें लागलें नसतें, एवढा मात्र इंग्लंडचा लाभ झाला असता.

## फ्रेंच नौदलाचा प्रश्न

फ्रान्सला स्वतंत्रपणें शस्त्रसंधि करावा लागेल असें दिसूं लागल्यापासून इंग्रजांनीं मो. रेनो यांना बजावून ठेवलें होतें कीं फ्रेंच नौदलाला इंग्लंडच्या बंदरांतून आसरा घेण्याची आज्ञा देत असाल तरच फ्रान्सला स्वतंत्र शस्त्रसंधि करण्याला इंग्लंड आपली संमति देईल. पुढें मार्शल पेतँ यांचें सरकार अधिकारावर आल्यानंतरहि इंग्लंडनें त्यांना या अटीची वरचेवर आठवण दिली होती. तरीसुद्धां फ्रेंच नौदलाला इंग्लंडला जाण्याची आज्ञा देण्यासारखें कटु कर्तव्य त्यांच्याकडून होईना. फ्रान्समधल्या सर्व प्रमुख नेत्यांनीं आणि फ्रेंच नौदलाचे प्रमुख ॲडमिरल दार्लों यांनींहि आपलें नौदल जर्मनांच्या हातीं पडूं देणार नाहीं, असें आश्वासन मात्र इंग्लंडच्या मंत्र्यांना दिलें होतें. त्याप्रमाणें शस्त्रसंधीच्या अटींत

फ्रेंच नौदल हें फ्रेंचांच्या बंदरांत आणि फ्रेंचांच्या ताब्यांतच रहावें, अशी अट फ्रेंच प्रतिनिधींनीं घातली होती आणि तिला जर्मनीची संमतिहि मिळाली होती. इंग्लंडच्या प्रधानमंत्र्यांना तेवढ्या अटीवर विश्वास ठेवून स्वस्थ बसणें अशक्यच होतें. कारण फ्रेंच नौदल जर्मनीच्या हातीं पडलें असतें तर जर्मनी समुद्रावर-सुद्धां इंग्लंडला वरचढ झाला असता, असें एका इतिहासकारानें लिहिलें आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणें फ्रेंच नौदल जर्मनांच्या हातीं पडल्यास ब्रिटिशांच्या १४ युद्धनौकांविरुद्ध शत्रूंच्या १९ युद्धनौका, ब्रिटनच्या ६० प्रहरी युद्धनौकाविरुद्ध शत्रूंच्या ४६ प्रहरी युद्धनौका आणि इंग्लंडच्या १८२ विनाशिकांविरुद्ध शत्रूंच्या २५० विनाशिका होऊन समुद्रावरील वर्चस्वहि जर्मनीकडे जाण्याचा बराच संभव होता. या वेळीं फ्रेंच नौदल मुख्यतः इंग्लंड, इजिप्त आणि उत्तर आफ्रिकेंतील ओरान बंदर या तीन ठिकाणीं विभागलें गेलें होतें. यांपैकीं इंग्लंड आणि इजिप्त देशांच्या बंदरांतील फ्रेंच युद्धनौका आपल्या कबजांत घेणें इंग्लंडला अगदीं सोपें होतें. पण ओरान येथील फ्रेंच नौदल स्वतःच्या बंदरांत असल्यामुळें तें हस्तगत करणें अवघड होतें. यासाठीं ब्रिटिश वैमानिकांनीं चोरून त्या बंदराभोंवतीं पाण-सुरुंग पेरले आणि त्यानंतर ३ जुलैला ब्रिटिश युद्धनौकांनीं ओरान बंदराची कोंडी करून तेथील फ्रेंच नौदलाला शरण येण्याची आज्ञा केली. ही आज्ञा झिडकारून फ्रेंच युद्धनौकांनीं ब्रिटिशांशीं लढण्याचा प्रयत्न केला. या वेळच्या चकमकांत फ्रेंचांची स्ट्रासबुर्ग ही युद्धनौका कोंडी फोडून फ्रान्समधील तूलों बंदरीं जाऊन पोंचली. इतर बहुतेक साऱ्या युद्धनौकांचा ब्रिटिशांनीं विध्वंस केला. याच दिवशीं इंग्लंड आणि इजिप्त येथील फ्रेंच नौदल ब्रिटिशांनीं हस्तगत केलें. हा मि. चर्चिल यांचा पहिला पराक्रम होय.

## दाकारची लढाई

जर्मनीशीं झालेल्या शस्त्रसंधीनें फ्रान्सचा उत्तरेचा सारा भाग जर्मनीच्या ताब्यांत गेला होता आणि दक्षिणेचा भाग मार्शल पेतँ यांच्या सरकाराच्या हातीं राहिला होता. हें सरकार अर्थात् जर्मनीचें मांडलिक म्हणूनच अधिकार चालवीत होतें. ही पराधीन स्थिति ज्यांना मान्य नव्हती असे जनरल द गोलसारखे कांहीं प्रमुख फ्रेंच पुढारी होते. त्यांनीं इंग्लंडमध्यें स्वतंत्र फ्रेंच सरकार स्थापन केलें. हें सरकार स्थापन केल्यावर जनरल द गोल यांनीं फ्रेंच साम्राज्यांतील उप-

निवेशांनीं मार्शल पेतँ यांचा अधिकार न मानतां आपलाच अधिकार मानावा अशी खटपट आरंभिली. पण या त्यांच्या खटपटीला म्हणण्यासारखें यश आलें नाहीं. इंडोचायनाचे गव्हर्नर जनरल कात्रू हे मार्शल पेतँ यांच्या विरुद्ध होते. पण त्यांना पदच्युत करण्यांत आलें. सीरिया आणि उत्तर आफ्रिका या भागांतील फ्रेंच उपनिवेशांनींहि मार्शल पेतँ यांच्या सरकाराला मान्यता दिली. मध्य-आफ्रिका आणि हिंदुस्थान येथील फ्रेंचांनीं मात्र जनरल द गोल यांनाच पाठिंबा दिला. पश्चिम आफ्रिकेंतील सेनेगाल या प्रांतांतील फ्रेंचहि आपल्या पक्षाला मिळण्याला उत्सुक आहेत, अशी १९४० च्या सप्टेंबरमध्यें जनरल द गोल यांना वार्ता लागली. या प्रांतांतील दाकार बंदर सामरिकदृष्ट्या फार महत्त्वाचें असल्यानें मि. चर्चिल यांनाहि तें हस्तगत करण्याची उत्कंठा होतीच. यासाठीं त्यांनीं जनरल द गोल यांच्याबरोबर बरेंच ब्रिटिश नौदल देऊन त्यांना दाकार हस्तगत करण्यासाठीं पाठविलें. पण या कारस्थानाची वार्ता मार्शल पेतँ यांच्या सरकारला आगाऊ कळल्यामुळें त्यांनीं ब्रिटिशांच्या प्रतिकाराकरितां दोन प्रहरी युद्धनौका पाठवून बचावाची सारी सिद्धता करून ठेवली होती. त्यामुळें ब्रिटिश नौदलासह जनरल द गोल हे दाकारला पोंचल्यावर त्यांच्या स्वागताप्रीत्यर्थ फ्रेंच नौदलानें तोफांचा भडिमार आरंभिला आणि या वेळीं दाकारचें बंदर लढून जिंकून घेण्याची इंग्लंडची सिद्धता नसल्यानें फ्रेंच नौदलाला पाठ दाखवून ब्रिटिश युद्धनौकांना घराकडे वळावें लागलें. याप्रमाणें ओरान येथें झालेल्या मानहानीचें फ्रेंचांनीं उसनें फेडलें. या ठिकाणीं फ्रान्सच्या पहिल्या लढाईचा अध्याय समाप्त होतो.

: १४ :

# फ्रान्सच्या पराजयाची मीमांसा

१९४० च्या मे आणि जून महिन्यांत झालेला फ्रान्सचा संपूर्ण पराजय ही ऐतिहासिक दृष्ट्या एक अत्यंत महत्त्वाची घटना असल्यानें या घटनेची चिकित्सा सविस्तरच केली पाहिजे. पहिल्या महायुद्धानंतर कांहीं काळपर्यंत फ्रान्स हें सामरिक दृष्ट्या युरोपांतील सर्वांत बलिष्ठ राष्ट्र होतें. पुढें रशियाच्या सामरिक पुनरुज्जीवनानंतर फ्रान्स जरी दुसऱ्या प्रतीचें राष्ट्र बनलें तरी १९३८ पर्यंत जर्मनीलासुद्धां फ्रेंच युद्धयंत्राची भीति वाटण्याजोगीच परिस्थिति होती. असें असून हि १९४० मध्यें जर्मनीच्या आघातांचा दोन महिने प्रतिकार करतां न येण्याइतकी फ्रान्सची केविलवाणी अवस्था झाली. या परिवर्तनाचीं राजकीय कारणें उघडच आहेत. याकरितां त्यांची इथें फारशी चर्चा न करतां मुख्यतः सामरिक कारणांचीच मीमांसा करण्याचा विचार आहे.

## विमानांकडे दुर्लक्ष्य

एके काळीं फ्रान्सचें वैमानिक दल साऱ्या युरोपखंडांत पहिल्या प्रतीचें होतें. पण त्या वेळीं जर्मनीसारखीं राष्ट्रें निःशस्त्रच होतीं. पुढें जर्मनींत नाझी पक्षाचें राज्य चालूं झाल्यानंतर फ्रान्सनें आपलें वैमानिक वर्चस्व टिकविण्याचा जवळजवळ प्रयत्नच केला नाहीं. १९३४ मध्यें १००० आघाडीचीं विमानें आणि २०० शिलकी विमानें फ्रेंच वैमानिक दलांत असावींत, असा ठराव फ्रेंच पार्लमेंटानें केला. या योजनेपैकीं अवघीं ६३७ विमानें १९३६ च्या जूनपर्यंत फ्रेंच वैमानिक दलांत येऊन पोहोचली होतीं. या वेळेपर्यंत जर्मनीच्या वैमानिक दलाची झालेली अनपेक्षित प्रगति पाहून फ्रेंचांच्या विमानविभागानें इतःपर १५०० आघाडीचीं विमानें आणि १००० शिलकी विमानें आपल्याला आवश्यक आहेत असें ठरविलें. ही नवी योजना १९३९ पर्यंत व्यवहारांत यावयाची होती. पण पुढें सहा महिन्यांतच आपली योजना अगदींच तुटपुंजी असल्याची जाणीव फ्रेंचांच्या विमानश्रेष्ठींना होऊन त्यांनीं आघाडीचीं २६०० आणि शिलकी

१५०० इतक्या विमानांची सरकाराकडे मागणी केली. पण मार्शल पेतँ, जनरल गामेलँ आणि ॲडमिरल दार्लो इत्यादि युद्धश्रेष्ठींनीं वरील मागणी एकमतानें फेटाळली. पुढें १९३८ सारख्या चिंताजनक वर्षाच्या आयव्ययपत्रकांत विमान-विभागावरील व्यय वाढविण्याच्या ऐवजीं एक खर्व फ्रँकांनीं कमीच केला. पुढें त्या वर्षाच्या मे महिन्यांत झेकोस्लोव्हाकियाचें प्रकरण उद्भवल्यानंतर फ्रेंच युद्ध-श्रेष्ठींना आपली चूक दिसून आली आणि आघाडीचीं २६०० आणि शिलकी १५०० विमानांची मागणी त्यांनीं मान्य केली. ही मागणी मान्य केली तरी ती शक्य तितक्या लौकर पूर्ण करण्याची कांहींच व्यवस्था झाली नव्हती. त्या-मुळें १९४० च्या मे महिन्यांतसुद्धां फ्रेंचांजवळ २५०० हून अधिक विमानें नव्हतीं. यांतलीं ६०० विमानें उत्तर आफ्रिकेंत, ४०० इटालीच्या सीमेवर आणि ३५० नौदलाच्या अधिकाराखालीं असल्यानें तीं जर्मनीशीं चाललेल्या जीवन-मरणाच्या युद्धांत भाग घेत नव्हतीं. या अचरटपणावर अधिक टीका करण्याची आवश्यकताच नाहीं.

## छत्रीधारी सैनिकांची हयगय

दुसऱ्या महायुद्धांत विमानांतून उड्या टाकणाऱ्या छत्रीधारी सैनिकांचा किती उपयोग झाला ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. फ्रेंच वैमानिक दलांत छत्रीधारी सैनिकांच्या तुकड्या १९३६ मध्यें प्रथम प्रयोगार्थ अस्तित्वांत आल्या. यांची १९३८ मध्यें मोठ्या प्रमाणावर वाढ करण्याचा वैमानिक विभागाचा संकल्प होता. पण छत्रीधारी सैनिक हे केवळ सर्कशींतील खेळ करून दाखविण्याचाच उपयोगी आहेत, प्रत्यक्ष युद्धांत त्यांचा कांहींच उपयोग नाहीं. असें फ्रेंच युद्ध-श्रेष्ठींचें मन असल्यानें त्यांनीं नवें छत्रीधारी सैन्य शिकवून सिद्ध तर केलें नाहींच, उलट अर्धा शिकविलेल्या छत्रीवाल्यांना पायदळ सैन्यांत धाडून दिलें. ही चूक सुधारण्याची इच्छा नॉर्वेच्या पराजयानंतर फ्रेंच युद्धश्रेष्ठींना झाली. पण फ्रान्सच्या शरणागतीपर्यंत कांहीं ती सुधारली गेली नाहीं. फ्रेंच विमानविभा-गांतहि वैमानिक युद्धाचे कांहीं अभ्यासक होते. विमानदलांच्या सैन्यांची रचना कशी करावी आणि त्यांचा उपयोग कसा करावा याचा त्यांनीं चांगला अभ्यास केला होता. पण या तरुण तज्ज्ञांच्या कल्पना त्यांच्या वरिष्ठांना न पटल्यामुळें त्यांना त्यांची नेमणूक त्या विभागांतील कारकुनी कामावर केली. फ्रान्सच्या वैमा-

निक उत्पादनाचीहि अशीच दुर्दशा होती. युद्धाच्या आरंभीं फ्रान्समध्यें महिन्याला अवघीं १२० युद्धोपयोगी विमानें निघत होतीं आणि १९४० च्या एप्रिलमध्यें हा आंकडा ३५० ला पोंचला होता. याच्या उलट युद्धारंभीं जर्मनींत महिन्याला ८०० युद्धोपयोगी विमानें सिद्ध होत होतीं, तर १९४० च्या मे महिन्यांत हा आंकडा १७०० वर गेला होता. फ्रेंच वैमानिकदलाच्या दौर्बल्याची वर जी कहाणी सांगितली, तिच्यांतच १० मेला फ्रेंचांच्या विमानतळांवर झालेल्या जर्मनांच्या बाँबवृष्टीमुळें जी हानि झाली तिची भर टाकली पाहिजे. ही हानि मुख्यतः देशद्रोही फ्रेंचांनीं जर्मनांना पुरविलेल्या माहितीमुळेंच झाली आणि या विश्वासघाताबद्दल त्यांना देहांत प्रायश्चित्तहि मिळालें. पण तत्पूर्वी फ्रेंचांच्या लढाऊ विमानांपैकीं अर्धीमुर्धीं तरी भूमीवरच नष्ट झालीं होतीं.

फ्रान्सच्या लढाईंत फ्रेंचांना ब्रिटिश विमानदलाचेंहि मोठ्या प्रमाणावर साहाय्य होत होतें. पण या वेळीं इंग्लंडच्या वैमानिकदलाला स्वपक्षाच्या सैन्याशीं सहकार्य करण्याची संवय नव्हती. जर्मन वैमानिकांचें शिक्षण आणि त्यांच्या विमानांची रचना हीं मुख्यतः हातघाईच्या लढाईंत स्वपक्षाला शक्य तितकें साहाय्य करण्याच्या उद्देशानेंच निश्चित केलेलीं होतीं. उलटपक्षीं लांब पल्ल्यावरील लक्ष्यावर अधिकांत अधिक बाँबवर्षाव अचूक करण्यावर ब्रिटिश विमानदलाचा सारा भर होता. शिक्षणांतलि आणि रचनेंतील या प्रभेदामुळें इंग्रजांच्या विमानदलाचा फ्रान्सच्या लढाईंत बेताचाच उपयोग झाला. याचीं कांहीं उदाहरणें दिलीं म्हणजे या प्रभेदाचें स्वरूप वाचकांच्या ध्यानांत येईल.

## विमानदलाचे विविध उपयोग

उदाहरणार्थ, हॉलंड जिंकतांना जर्मनांनीं आपल्या छत्रीधारी सैनिकांचा अतिशय उपयोग केला. जर्मनांची भूमिसेना भूमीवरून प्रगति करीत असतांना त्यांचे छत्रीधारी सैनिक हॉलंडमध्यें अक्षरशः शेंकडों ठिकाणीं आकाशांतून उतरत होते आणि विमानतळ हस्तगत करणें किंवा महत्त्वाचे कारखाने, पूल, वीज, गॅस, पाणी यांच्या पुरवठ्यांचीं केंद्रें निकामी करणें यांसारखे उद्योग करीत होते. उलटपक्षीं जर्मनांच्या कारखान्यांवर आणि वाहतुकीच्या साधनांवर ब्रिटिश वैमानिक दलाचाहि अविरत मारा चालू होता. पण या माऱ्याबरोबरच छत्रीधारी सैनिकांचेहि लगेच हल्ले होत नसल्यानें आणि त्यांच्या मागोमाग भूमीवरील

सैन्याचीहि चढाई होऊं शकत नसल्यानें ब्रिटिश वैमानिक दलाच्या १९४० च्या मेमधील परिश्रमांचा तेव्हां चालू असलेल्या जीवनमरणाच्या लढ्यावर फारच थोडा परिणाम झाला. जर्मन वैमानिक दलाचें शिक्षण रणक्षेत्रांत तत्काल विजय मिळविण्याच्या दृष्टीनें अतिशय उपयुक्त होतें. उलटपक्षीं इंग्रजांचें वैमानिक दल हें भविष्यकाळीं कधीं तरी जय मिळण्याच्या आशेनें जर्मनांची असंबद्ध हानि करीत होतें. या असंबद्ध हानीला जर्मनांनीं तेव्हां ब्रिटिश वैमानिक दलाच्या मुखपत्रां-तून प्रसिद्ध होणाऱ्या प्रलापांपेक्षां अधिक महत्त्व दिलें नाहीं आणि तें देण्याचें कांहीं कारणहि नव्हतें.

## ‘ अनंतहस्तें कमलावरानें ’

धान्य भरडतांना जात्याची एक तळी स्थिर असते आणि दुसरी फिरत राहते. त्याप्रमाणें शत्रूला भरडण्यालासुध्दा भूमीवरील सैन्याच्या स्थिर तळीला विमा-नांतून टाकलेल्या छत्रीधारी सैनिकांच्या फिरत्या तळीची आवश्यकता असते, अशी जर्मनीच्या नेत्यांची समजूत होती. याच तत्त्वाला अनुसरून त्यांनीं फ्रान्सच्या लढाईंत हॉलंडमध्यें छत्रीधारी सैनिकांचा उपयोग केला. याचें सर्वांत चांगलें उदाहरण म्हणजे रॉटरडॅम येथील वालहावेन विमानतळावर जर्मनांनीं चढाईच्या प्रारंभींच केलेला छत्रीधारी सैनिकांचा हल्ला होय. छत्रीधारी सैनिक उतरविण्याला विमानतळाइतकें उपयुक्त स्थळ दुसरें नाहीं. अशा तळांवर उतरतांना अपघात कमी होतात आणि तो तळ हस्तगत झाला कीं ‘ अनंतहस्तें कमलावरानें । देतां किती घेशिल दो करानें’ इतक्या प्रमाणांत आपल्या विमानदलाकडून आकाशां-तून साहाय्य येऊं लागतें. वालहावेनच्या लढाईंत जर्मनांना हाच अनुभव आला. त्यांनीं अकस्मात् आकाशांतून छत्रीधारी सैनिकांची वृष्टि करून तो तळ जिंकल्या-नंतर भूमीवरून डच सैनिकांनीं आणि आकाशांतून ब्रिटिश वैमानिकांनीं त्यांच्या-वर निकराचा प्रतिहल्ला केला. पण भूमीवरून लढणारें डच सैन्य संख्या, शस्त्रें आणि शिक्षण या दृष्टीनें जर्मनांच्या तोडीचें नव्हतें आणि आकाशांतून त्यांना साहाय्य करणाऱ्या ब्रिटिश विमानदळांत छत्रीधारी सैनिक नसल्यानें त्यांना भूमी-वर उतरतां येत नव्हतें. युध्दाच्या अंतीं आर्नहेममध्यें ब्रिटिशांनीं जे सहस्रावधि छत्रीधारी सैनिक निष्कारण बळी दिले, ते जर युध्दारंभीं ब्रिटिशांच्या जवळ

असते तर ! पण ही व्यर्थ चर्चा करण्याच्या नादाला शाहण्या लोकांनीं लागूं नये हेंच खरें !

## युद्धशास्त्राचें अज्ञान

छत्रीधारी सैनिकांच्या अभावाप्रमाणेंच वैमानिक दलाचा आधिकांत अधिक उपयोग कोठें होऊं शकेल, याची कल्पना अँग्लोफ्रेंच युद्धश्रेष्ठींना मुळींच नसल्यानेंहि त्या राष्ट्रांची अतिशय हानि झाली. याचें सर्वांत संस्मरणीय उदाहरण म्हणजे जनरल कोरापच्या सैन्याला जर्मन चढाईच्या आरंभीं अत्यंत आवश्यक असलेला वैमानिक दलाचा पाठिंबा दिलेला नव्हता हें होय. अँग्लोफ्रेंचांनां हॉलंड-बेलजमच्या साहाय्याकरितां जें ३१ डिव्हिजन सैन्य नेलें, तें सेदां किल्ल्याशेजारच्या आघाडीवरून नेलें. ही बलिष्ठ सेना हलविल्यानंतर ती आघाडी कांहीं काळ उघडी पडणें स्वाभाविक होतें. ती शक्य तितक्या लौकर व्यापण्याची आज्ञा जनरल कोरापच्या सैन्याला मिळाली होती. पण त्या आघाडीवर जेव्हां जर्मनांची टोळधाड आली, तेव्हां त्यांचें अद्यापि अर्धें सैन्य आघाडीवर उपस्थित झालें नव्हतें. या घटनेंत थोडाफार हयगयीचा भाग आहेच. पण असल्या हयगयीची शक्यता वरिष्ठ सेनापतींनीं विचारांत घ्यावीच लागते. नाहीं तर अनपेक्षित परिस्थितीला ते तोंड तरी कसे देणार ? तेव्हां ही सारी परिस्थिति ध्यानांत घेऊन सेदां आघाडीच्या संरक्षणासाठीं एखाद्या बलिष्ठ वैमानिक दलाची अँग्लोफ्रेंच युद्धश्रेष्ठींनीं योजना केली असती तर जर्मनांना ती आघाडी अनायासानें फोडून आबेव्हिलपर्यंत दौड करतां आली नसती. आर्दान्सच्या अरण्यांतून जर्मनीच्या रणगाड्यांना इतक्या सुलभतेनें सेदांकडे चढाई करतां येईल, अशी अँग्लोफ्रेंच युद्धश्रेष्ठींची कल्पना नव्हती असें कोणी म्हणतील. पण असें म्हणणाऱ्यांनीं रणगाड्यांच्या हालचाली कधींच पाहिल्या नव्हत्या, असें म्हणावें लागेल. अरण्यांतून रणगाड्यांना जो अडथळा होऊं शकतो, त्याचा उपयोग केवळ त्या रणगाड्यांवर विमानांतून बॉंबहल्ला करण्याला होऊं शकतो. कारण वैमानिक दलाचा रणगाड्यांवरील हल्ला यशस्वी होण्याचा संभव त्यांच्या मार्गांतील अडथळ्यांबरोबरच वाढत जातो. या नियमाचा अनुभव १९४४ च्या अंतीं मार्शल रुंडस्टेड यांनीं पुनश्च एकवार जेव्हां आर्दान्सच्या अरण्यांतूनच चढाई केली तेव्हां त्यांना आला. तोच अनुभव युद्धारंभींहि जर्मन सेनापतींना आला असता. पण तेव्हां

रणगाडे काय किंवा विमानें काय, या दोनहि आधुनिक शस्त्रांचे गुणदोष अँग्लो-फ्रेंच युद्धशास्त्रज्ञांना सारखेच अज्ञात होते.

## सूर मारणारीं विमानें

जर्मन चढाईच्या प्रारंभापासून शत्रूच्या वाहतुकीच्या मार्गांवर आणि विशेषतः त्यांच्या हातीं पडलेल्या पुलांवर अँग्लोफ्रेंच वैमानिकदलानें सतत हल्ले चालू ठेवावयाला हवे होते. यांपैकीं मास्ट्रिक्टच्या पुलावर, किंवा मजनदीच्या पुलांवर ब्रिटिश वैमानिकांनीं हल्ले केल्याचा उल्लेख आढळतो. बेल्जमची लढाई संपत आली असतांनाहि अशाच एका महत्त्वाच्या पुलाचा विध्वंस करण्याकरितां कांहीं ब्रिटिश वैमानिकांनीं प्राणार्पण करून मरणोत्तर व्हिक्टोरिया क्रॉस मिळविला. पण एकं-दरीनें असल्या हल्ल्यांचे उल्लेख कमीच आढळतात. पूल, आगगाड्या, रणगाडे इत्यादिकांवर नेमका मारा करण्याचें उत्कृष्ट साधन म्हणजे सूर मारणारीं विमानें होत. असलीं विमानें अँग्लोफ्रेंचांकडे मुळींच नव्हतीं. जर्मनांचीं सूर मारणारीं विमानें आपल्या सैन्याला अगदीं जवळून पाठिंबा देऊं शकत. पहिल्या महायुद्धांत हल्ला चढविण्यापूर्वी शत्रूंवर तोफांचा भडिमार करावा लागे. तें कामहि दुसऱ्या महायुद्धांत जर्मनीच्या सूर मारणाऱ्या विमानांनीं स्वतःकडे घेतलें होतें. पण अशा प्रकारचीं रणक्षेत्रांतील कर्तव्यें पार पाडण्याला अँग्लोफ्रेंचांचें वैमानिक दल अगदीं अपात्र होतें. त्यांच्या विमानदलाचा मारा भर तेव्हां शत्रूच्या औद्योगिक सामर्थ्याचा विध्वंस करण्यावर होता. म्हणजे जर्मनीचें विमानदल हें मुख्यतः रणांगणांतील शस्त्र होतें आणि अँग्लोफ्रेंचांचें वैमानिकदल हें शत्रूच्या घरादारांचा नि कारखान्यांचा विध्वंस करण्याचें शस्त्र होतें. या दोन विमानदलांतील प्रभेद ब्रिटनवरील वैमानिक हल्ले आणि जर्मनीवरील वैमानिक हल्ले यांची तुलना करण्याच्या प्रसंगीं अधिक ठळकपणें दिसून येतील.

## ब्रिटिश विमानांचा यशस्वी उपयोग

फ्रान्सच्या लढाईंत रणक्षेत्रावर ब्रिटिश विमानांचा यशस्वी उपयोग झाल्याचें एकच उदाहरण म्हणजे डुंकेर्कच्या लढाईचें होय. या वेळीं ब्रिटिश विमानांना यश मिळण्याचें महत्त्वाचें कारण म्हणजे त्यांचे तळ जर्मनीच्या रणगाड्यांच्या प्रभावक्षेत्राबाहेर होते. फ्रान्समधील लढाईंत बहुतेक एकदोन दिवसांनीं ब्रिटि-

शांना आपले विमानतळ बदलावे लागत. या तारांबळीमुळेंहि त्यांच्या विमान-दलाला निर्वेधपणें लढतां येत नसे. पण डुंकेर्कच्या लढाईंतील ब्रिटिश विमान-तळ इंग्लिश खाडीपलीकडे असल्यानें मागची विवंचना न करतां त्यांना जर्म-नांशीं टक्कर देतां आली. या वेळीं ब्रिटिश विमानांना आपलें पराजित सैन्य समुद्रा-वरून सुरक्षित नेणें हें एकच कार्य होतें. याच्या उलट जर्मन विमानदलाला साऱ्या फ्रेंच आघाडीवर शेंकडों महत्त्वाचीं कार्यें होतीं. डुंकेर्कच्या लढाईंत ब्रिटिश विमानदलाचा विजय होण्याचें आणखी एक कारण असें होतें कीं, याच वेळीं ब्रिटिशानीं ' डिफायंट ' हीं अगदीं नवीन पद्धतीचीं विमानें बाहेर काढलीं. या विमानांचें व्यंग कळून येईपर्यंत त्यांच्या तोफांना जर्मन विमानें अगदीं माशां-सारखीं बळी पडलीं. एकदोन दिवस जर्मनीच्या कोणत्याहि विमानांचा त्यांच्या-पुढें निभाव लागेना. नंतर त्यांना त्यांचे दोष कळून आले आणि त्यांनीं 'डिफायंट' विमानाचा इतका विध्वंस केला कीं, पुढल्या इतिहासांत त्यांचें नांवसुद्धां ऐकूं येणार नाहीं. पण डुंकेर्कच्या लढाईंत ब्रिटिशांना विजय मिळवून देण्याचें बरेचसें श्रेय त्यांना द्यावें लागेल.

वरील साऱ्या चर्चेवरून अँग्लोफ्रेंचांचें वैमानिक दल जर्मनांच्या मानानें बरेंच कमी होतें आणि त्या अल्पसंख्य विमानांचाहि रणक्षेत्रांत कसा उपयोग करावा, हें पण त्यांना अवगत नव्हतें, हीं फ्रान्सच्या युद्धांत अँग्लोफ्रेंचांचा पराभव होण्याचीं दोन प्रमुख कारणें कळून येतात. आतां आकाशयुद्धाचें विवेचन थांब-वून आपण भूमियुद्धाकडे वळूं.

## श्लीफेनयोजनेंतील परिवर्तन

भूमियुद्धाचा विचार करतांना प्रथम सेनापतींच्या योजनांचा विचार करावा लागतो. फ्रान्सवरील स्वारीची जर्मनीची सर्वांत प्रसिद्ध योजना म्हणजे काउंट श्लीफेन या सेनापतींची योजना होय. पहिल्या महायुद्धांत या योजनेप्रमाणें जर्मन सेनापतींनीं आपल्या सैन्याच्या हालचाली केल्या नाहींत आणि त्यामुळें तेव्हांची चढाई फसली. ही चूक दुसऱ्या महायुद्धांत जर्मनी करणार नाहीं, अशी फ्रेंच सेनापतींची कल्पना होती आणि त्या कल्पनेला अनुसरून जर्मन सैन्याचा प्रतिकार करण्याच्या आपल्या योजना त्यांनीं आंखल्या होत्या. पण या बाबतींत हेर हिटलेर यांनीं त्यांना सपशेल फसविलें. फ्रान्सच्या पाडावानंतर

१५ जुलैला राइश्टाग सभेपुढें भाषण करतांना ते म्हणाले. ' I succeeded in deceiving the enemy staffs by inverting the Schlieffen plan. In contradiction to the Schlieffen plan of 1914 I arranged for operations to bear mainly on the left wing of the front though ostensibly retaining the principles of the former plan. It was made easier by the enemy himself, who had concentrated all his motorized troops on the Belgian frontier.' उत्तर बेल्जममधून अँटवर्प आणि घेंट या बंदरांच्या दिशेनें चढाई करून इंग्लिश खाडींतील बंदरें हस्तगत करणें हें श्लीफेनयोजनेचें वैशिष्ट्य हातं. या योजनेच्या अगदीं उलट जाऊन म्हणजे उत्तर फ्रान्समधूनच चढाई करून १९४० मध्यें जर्मन सैन्यानें फ्रान्सचा पाडाव केला. हेर हिटलेर यांचा हा डाव कसा साधला याची थोडी चिकित्सा केली पाहिजे.

## अल्सासलोरेनचा मोह

पहिल्या महायुद्धाच्या प्रारंभीं अल्सास आणि लोरेन हे प्रांत जर्मनीच्या हातीं होते. ते त्या युद्धांतील पराजयामुळें फ्रान्सला द्यावे लागले. त्यामुळें शांततेच्या काळांत जरी जर्मनीची फार हानि झाली तरी १९४० च्या युद्धांत ते प्रांत फ्रान्सच्या हातीं असण्यापासून जर्मनीचा लाभच झाला. कारण अल्सासलोरेन प्रांत जिंकण्याच्या नादीं फ्रान्सला लावून नि त्याचें मुख्य सैन्य त्या प्रांतांत एकत्रित करणें भाग पाडून आपण बेल्जमच्या उत्तरभागांतून इंग्लिश खाडीच्या दिशेनें चढाई करावयाची हा जो श्लीफेनयोजनेंतील मुख्य डाव होता तो अल्सासलोरेन प्रांत फ्रान्सच्या हातीं असण्यानें आपोआपच साध्य होत होता. एका जर्मन युद्धतज्ज्ञानें म्हटलें आहे, ' In 1940 French territory extended much farther to the east than it had in 1941. This fact operated to produce exactly the same effect as the French offensive had in 1914, namely to reduce the number of French troops available for the defence of the line Antwerp–

Montmedy.' अल्सासलोरेन हे प्रांत हातीं आल्यानें फ्रान्सच्या सीमेची लांबीहि वाढली होती. लोकसंख्याच कमी असल्यामुळें ज्या राष्ट्रांना आपल्या प्रतिस्पर्ध्यांच्या तोडीचें सैन्य ठेवतां येत नाहीं, त्यांनीं आपल्या सीमेची लांबी वाढविणें म्हणजे आपल्या हातानें आपलें मरण ओढवून आणण्यासारखेंच असतें. याची जाणीव फ्रेंच जनतेला तर राहोच, पण फ्रान्सच्या नेत्यांना तरी कितपत होती याची शंकाच आहे. अल्सासलोरेन हे प्रांत फ्रान्सच्या हातीं असण्याच्या दोषाचें अंशतः माजिनो तटबंदीनें निराकरण झालें होतें. तरीसुद्धां त्या तटबंदीच्या संरक्षणार्थ गुंतून पडलेलें सैन्य हालचालीच्या लढाईला पूर्णपणें निरुपयोगी झाल्यामुळें एकंदरीनें जर्मन चढाईला यश मिळण्याची शक्यता १९१४ पेक्षां १९४० मध्यें पुष्कळच अधिक होती.

## फ्रेंचांची फसवणूक

उलटपक्षीं जर्मनीची आपल्यावर पुनश्च स्वारी झाली तर १९१४ मध्ये ज्या भागांतून फ्रान्सवर चढाई झाली, त्याच भागांतून दुसऱ्यांदा चढाई होणार नाहीं, अशी फ्रेंच सेनापतींची कल्पना होती. ही कल्पना साधार नव्हती असें कोणालाहि म्हणतां यावयाचें नाहीं. कारण लिएज, आर्दान्न, सेदां या मार्गानें पारीसवर चढाई करण्याची योजना श्लीफेन–योजनेच्या विरुद्ध होती आणि ती पहिल्या महायुद्धांत अयशस्वीहि ठरली होती. त्यामुळें १९४० मध्यें तिची पुनरावृत्ति होण्याचा संभव कमीच होता. पहिल्या महायुद्धांत जर्मनीनें एकट्या बेल्जमच्याच तटस्थतेचा भंग केला होता. पण तीहि गोष्ट श्लीफेन–योजनेच्या विरुद्ध होती. कारण एवींतेवीं तटस्थताभंगाचें पाप करावयाचेंच तर मग तें निश्चितपणें लाभदायक होईल इतक्या मोठ्या प्रमाणावर तरी करावें, अशी काउंट श्लीफेन यांची विचारसरणी होती. या विचारसरणीप्रमाणें त्यांनीं एकाच वेळीं फ्रान्स, हॉलंड, बेल्जम या सर्वांवर स्वारी करण्याचा उपदेश आपल्या सरकाराला केला होता. त्यामुळें दुसऱ्या महायुद्धांत जर्मनी हॉलंडच्याहि तटस्थतेचा भंग करणार ही गोष्ट निश्चित होती. डच लोकांनाहि युद्धांत ओढल्यास जर्मनीला पहिल्या महायुद्धांप्रमाणें आपलें चढाईचें सैन्य दक्षिण बेल्जममध्यें एकत्रित न करतां उत्तरेकडे एकत्रित करावें लागेल, असें फ्रेंच युद्धश्रेष्ठींना वाटणें स्वाभाविक होतें आणि काउंट श्लीफेन यांचें मांगणेंहि तसेंच होतें. या साऱ्या गोष्टी लक्ष्यांत घेतल्या

म्हणजे श्लीफेनयोजनेचें बाह्य स्वरूप जसेंच्या तसेंच ठेवून चढाईचा मार्ग मात्र पहिल्या महायुद्धांतलाच ठेवण्यानें फ्रेंच सेनापति चकले, हें हेर हिटलेर यांचें मत अक्षरशः यथार्थ आहे असें म्हणावें लागतें.

## योजना आंगलट आल्या

जर्मनीची चढाई उत्तर बेल्जममधूनच होणार हें गृहीत धरून तिच्यांत भाग घेणाऱ्या सैन्याला उत्तरेकडून आणि दक्षिणेकडून आडकित्त्यांत पकडण्याची योजना फ्रेंच सेनापतींनीं केली होती. सेदां दुर्गाजवळ सरासरी ३१ डिव्हिजन यंत्रचालित सैन्य कोणत्याहि क्षणीं बेल्जमहॉलंडच्या साहाय्याला जाण्यासाठीं त्यांनीं सिद्ध ठेविलें होतें. या सैन्याच्या सेनापतींपैकीं सर्वांत साहसी फ्रेंच सेनापति जनरल जिरो यांना शक्य तितक्या लौकर हॉलंडच्या साहाय्याला जाण्याची सूचना दिलेली होती. म्हणजे जर्मनीच्या पहिल्या आघातांतून वांचलेल्या डच सैन्याशीं सहकार्य करून ॲटवर्पच्या रोखानें चढाई करणाऱ्या जर्मन सेनेवर त्यांनीं वरून हल्ला करावा आणि त्याच वेळीं ॲंग्लोफ्रेंचबेल्जियन अशा संयुक्त सेनेनें खालून हल्ला करून पश्चिमेकडे चाललेल्या जर्मन सेनेचें कांडांत काढावें असा फ्रान्सच्या युद्धश्रेष्ठांच्या मनांतील डाव होता. या योजनेप्रमाणें जनरल जिरो हे शक्य तितक्या त्वरेनें हॉलंडमध्यें शिरले. पण त्यांच्या दुर्दैवानें उत्तर बेल्जममध्यें जर्मनांनीं आपली खरी चढाई केलीच नाहीं आणि त्यामुळें आडकित्त्यांतील सुपारीप्रमाणें त्यांना कापण्याची संधिहि मिळाली नाहीं.

## बेल्जमशी संगनमत

जर्मनीच्या युद्धयोजनेला तोंड देण्याची योजना बेल्जमच्या तटस्थतेमुळें आम्हांला आधींपासून करून ठेवतां आली नाहीं असें अनेक ॲंग्लोफ्रेंच लेखकांनीं लिहिलें आहे. पण तें निव्वळ थोतांड आहे. सर जॉन हॅमर्टन यांनीं संपादिलेल्या दुसऱ्या महायुद्धाच्या इतिहासांतील १५२५ पानावर बेल्जमच्या युद्धश्रेष्ठींनीं ॲंग्लोफ्रेंच युद्धश्रेष्ठींशीं वाटाघाट करून निश्चित केलेली योजनाच दिलेली आहे. त्या योजनेप्रमाणें जर्मनीनें स्वारी केल्यापासून तिसऱ्या दिवशीं ॲंग्लोफ्रेंच सैन्यांनीं जर्मन सैन्याला प्रतिरोध करण्यांत भाग घ्यावा असें ठरलें होतें. या सैन्यानें ॲंटवर्प, नामूर, जिव्ह या रेषेवर जर्मनांना अडवावें आणि

आल्बर्ट कालव्यापासून माघार घेत आलेल्या बेल्जियन सैन्यानें वरील रेषेपैकी ॲंटवर्पपासून लुव्हेनपर्यंतचा भाग संभाळावा असा संकल्प आधींपासून झालेला होता.

## एबेन एमाएलचा पाडाव

युद्धारंभाच्या रात्रींच जर्मनीनें बेल्जियन विमानतळांवर बॉंबहल्ले करून त्या सैन्याचीं अर्धी विमानें भूमीवरच नष्ट केलीं. त्यानंतर पहाटेपासून बेल्जमच्या सीमारक्षक सैन्यावर रणगाडे, सूर मारणारी विमानें आणि पायदळ सेना या सर्वांचे निकराचे हल्ले चालूं झाले. पण या साऱ्या हल्ल्यांपेक्षां त्या दिवशीं लिएजच्या संरक्षक दुर्गांपैकीं एबेन एमाएल या अजिंक्य मानलेल्या दुर्गावर जर्मनांनीं जो हल्ला केला तो युद्धशास्त्राच्या दृष्टीनें चिरस्मरणीय आहे. या दुर्गावर १० मेच्या पहाटेलाच वाऱ्याच्या दिशेनें जाणारीं यंत्रहीन विमानें जर्मनांनीं उतरविलीं; या विमानांतील सैनिकांनीं ठिकठिकाणीं सुरुंग लावून आणि बॉंब फेंकून त्या दुर्गावरील साऱ्या तोफा बंद पाडल्या. याच वेळीं तटाला पडलेल्या भगदाडांतून जर्मन पायदळानें एबेन एमाएलमध्यें प्रवेश केला. या पायदळावर भोंवतालच्या दुर्गांतून तोफांचा मारा होऊं नये, याकरितां शेजारींच आणलेल्या जर्मन तोफा त्या दुर्गांवर भडिमार करीत होत्या. एबेन एमाएलच्या तटांचा स्वतःच्या सैन्याला उपद्रव न होतां विध्वंस करतां यावा, म्हणून शेकडों जर्मन रणगाड्यांनीं त्या तटाशीं धडका घतल्या. आकाशांतून छत्रीधारी सैनिकांची तर त्या दुर्गावर जर्मनीनें एखाद्या शिवलिंगावर धरावी, तशी संततधार धरली होती. या साऱ्या प्रयत्नांना अभूतपूर्व यश येऊन एबेन एमाएलचा अभेद्य दुर्ग चढाईच्या पहिल्या दिवशींच जर्मनांच्या हातीं पडला. लिएजच्या दुर्गांपैकीं इतर दुर्ग पुढें पंधरवडाभर लढत राहिले. पण लढाईतील डावपेंचांच्या दृष्टीनें ते लगेच जिंकण्याची तादृश आवश्यकता नव्हती. एबेन एमाएलचा पाडाव ही किल्ल्यांच्या इतिहासामधील क्रांतिकारक घटना असल्यानें युद्धशास्त्राच्या अभ्यासकांना तिचा काळजीपूर्वक अभ्यास करावा लागेल.

## ॲंग्लोफ्रेंचांची तत्परता

हा दुर्ग इतका तडकाफडकीं जिंकण्याचें कारण असें होतें कीं त्याच्या शेजा-

रींच आल्बर्ट काल्व्यावरील कांहीं महत्त्वाचे पूल होते आणि ते जिंकून त्याच मार्गानें आपलें सैन्य पुढें लोटण्याचा जर्मनांचा संकल्प ठरलेला होता. या ठिकाणचे तीन पूल जर्मनांनीं तत्काळ जिंकून आपलें सैन्य परतीरावर नेलें. तेथें त्यांचा पाय रोवण्यापूर्वी बेल्जियन सैन्यानें प्रतिहल्ला करून एक पूल जर्मनांच्या हातून सोडविला आणि त्याचा विध्वंस केला. पण इतर दोन पूल जर्मनांच्याच हातीं राहिले. तेव्हां बेल्जियन विमानदलांतील १२ विमानांनीं बाँबहल्ला करून ते मोडण्याचा प्रयत्न केला. त्यांच्यापैकीं अकरा विमानें जर्मनांनीं पाडलीं आणि ते पूल अभंगच राहिले. आपल्या विमानांनीं असा मार खाल्लेला पाहून बेल्जियन सेनापतींनीं अँग्लोफ्रेंच विमानदलाचें साहाय्य मागितलें. पण त्यांच्याकडून दोन दिवस कांहीं उत्तरच आलें नाहीं. यावरून युद्धारंभानंतरच्या नवव्या महिन्यांत त्यांची युद्धाची सिद्धता किती उत्कृष्ट होती, हें कळून येईल.

## विमानदलाचें दौर्बल्य

डच आणि बेल्जियन सीमेवरील पूल वेळेवर कां उडविले गेले नाहींत, याची युद्धाच्या इतिहासकारांमध्यें अजून चर्चा चालूंच आहे. कित्येक ठिकाणीं सुरुंगाला बत्ती देण्याचें काम ज्या अधिकाऱ्यांकडे सोंपविलें होतें ते बाँबहल्ल्याला बळी पडल्यामुळें पूल उडविणें अशक्य झालें. कित्येक ठिकाणीं सुरुंगांत दारू कमी असल्यानें किंवा पुलाच्या मर्मस्थानीं सुरुंग लावलेला नसल्यानें त्याला फारसा धक्का पोंचला नाहीं आणि जर्मनीच्या इंजिनियरांनीं त्यांची तत्काळ दुरुस्ती करून ते चालू केले. इतर कित्येक ठिकाणचे अधिकारी हेमगर्भाच्या मात्रेच्या प्रयोगानें जर्मनीनें वश करून घेतले असल्यामुळें तेथील पूल जर्मनांना अभंगच मिळाले. हे सारे पूल जर्मनीच्या हातीं पडण्याला कोणतींहि निमित्तें झालीं असलीं तरी अँग्लोफ्रेंचांच्या वैमानिक दलाच्या दौर्बल्यामुळेंच त्यांचा जर्मनीला उपयोग होऊं शकला, ही गोष्ट निश्चित आहे.

## पूल हातचे जाण्याचे परिणाम

हे पूल जर्मनांच्या हातीं पडण्याचे परिणाम अतिशय भयंकर झाले या युद्धाच्या प्रारंभींच बेल्जमनें सरासरी नऊ लक्ष सैन्य युद्धांत लोटलें होतें. एवढ्या सैन्याचा आघाडीवर शास्त्रशुद्ध रीतीनें उपयोग करतां आला असता तर बेल्ज-

मच्या सीमेवर चारपांच दिवस जर्मनांना थोपवून धरणें अशक्य नव्हतें. पण वर उल्लेखिल्याप्रमाणें जर्मनांना त्यांच्या शत्रूंकडून पुलांच्या देणग्या मिळाल्यानें बेल्जमची फळी ठिकठिकाणीं फुटली आणि कांहीं सैन्यें जरी आघाडीवरच शत्रूशीं लढत राहिलीं, तरी इतरांनीं पलायनाचा सोपा पंथ स्वीकारला. हे सारे पळे सैनिक ११ मेलाच ब्रुसेल्स राजधानीला येऊन पोंचले आणि त्यांनीं आपल्या-बरोबर आणलेल्या कंड्यांनीं साऱ्या देशाला भयभीत करून सोडलें. आल्बर्ट कालव्याच्या आघाडीवर, किंवा त्याच्या जवळपास कांहीं बेल्जियन सैन्यानें दोन तीन दिवस जर्मन सैन्याला यथाशक्ति प्रतिकार केला. नाहीं असें नाही. पण या प्रतिकारानंतर अँटवर्पलूव्हेन रेषेवर जें बेल्जियन सैन्य येऊन पोंचलें, तें सैन्य या संज्ञेला फारसें पात्र राहिलें नव्हतें.

## आज्ञापालनाची व्यवस्था

या वेळीं युद्धाच्या धिसाडघाईत आघाडीवरील वार्ता वरिष्ठांना वेळेवर पोंचत होत्या कीं नाहीं आणि त्या पोंचत असल्या तर त्यांचा विचार करून शत्रूच्या डावपेंचांचा प्रतिकार करण्यासाठीं आवश्यक त्या आज्ञा ते आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना देऊं शकत होते कीं नाहीं याविषयीं शंकाच वाटते. कारण चढाईच्या पहिल्या दिवशीं पूल उडविण्यासंबंधीं झालेला घोटाळा वरिष्ठांच्या कानीं गेला असता आणि त्याचा विचार करून त्यांनीं हाताखालच्या अधिकाऱ्यांना निकडीच्या आज्ञा दिल्या असत्या तर पुन्हां १२ मेला सेदां आणि दिनांत या दुर्गांच्या शेजारीं मज नदीवरील न उडविलेले सहा पूल जर्मनांच्या हातीं लागले नसते. या प्रकरणीं जी चर्चा झालेली वाचनांत आली आहे, तिच्यावरून असें समजतें कीं फ्रान्सच्या युद्धयोजनाविभागानें सेदां आणि दिनांत या भागांतील सेनापति जनरल कोराप यांना जर्मनीची चढाई चालू होतांच कोणकोणत्या गोष्टी केल्या पाहिजेत यासंबंधीं सविस्तर आज्ञा दिल्या होत्या. पण त्यांनी त्या आज्ञा पाळण्याचे परिश्रम मुळीं घेतलेच नाहींत. वस्तुस्थिति अशीच असल्यास आपल्या आज्ञा पाळल्या जाण्याची कांहीं तरी व्यवस्था त्या युद्धयोजनाविभागानें केली होती कीं नाही, असा प्रश्न उपस्थित होतो. अर्थात् यासंबंधीं निरनिराळ्या देशांतून कोणती व्यवस्था करतात, याची मला माहिती नसल्यानें हा प्रश्न असाच अंधारांत सोडला पाहिजे.

## महत्त्वाची फट

खरें म्हणजे सेदांशेजारचे पूल जर्मनांच्या हातीं कसे पडले, याची चर्चा करण्यापूर्वी जर्मन सैन्य दोन दिवसांत तेथपर्यंत कसें येऊन पोंचलें, याची माहिती सांगणें आवश्यक आहे. बेल्जम ओलांडून सेदां दुर्गापर्यंत पोंचावयाचें असल्यास वाटेंत आर्दाॅनचें अरण्य तुडवावें लागतें. या अरण्यांत बेल्जियन लोकांनीं ठिकठिकाणीं लहान किल्ले किंवा बुरूज बांधून त्याच्या संरक्षणाची आपल्याकडून शक्य तितकी सुव्यवस्था केली होती. पण या व्यवस्थेंत एक महत्त्वाची फट राहिली होती. बेल्जमला लागून असलेल्या लुक्सेंबुर्ग या स्वायत्त प्रदेशांतून सेदांकडे जाणें अधिक सोपें होतें. कारण लुक्सेंबुर्गचें एकंदर सैन्य १५६ सैनिकांचें होतें. यामुळें १० मेला जर्मनांनीं आर्दाॅनवर चढाई न करतां प्रथम लुक्सेंबुर्गचा असुरक्षित प्रांत व्यापला आणि त्या भागांतून त्यांनीं आर्दाॅनमध्यें प्रवेश केला. आर्दाॅनचा अवघडपणा लक्षांत घेऊन त्यांनीं आघाडीला फटफटीवरील टेहळे सैन्य धाडलें. या सैन्यानें किल्ले आणि बुरूज यांच्यावर हल्ले करण्याच्या भानगडींत न पडतां सारा सपाट प्रदेश व्यापला. मागाहून रणगाड्यांनीं दुर्गांवर आणि बुरुजांवर चढाई करून ते हस्तगत केले. या पद्धतीनें जर्मनांना दोन दिवसांत आर्दाॅन व्यापून फ्रान्सवर चढाई करतां आली.

## फळी फुटण्याचे परिणाम

मागील प्रकरणांत दिलेल्या दैनंदिनीवरून वाचकांना इतकें माहीत झालें आहे कीं बेल्जम आणि हॉलंड यांच्या साहाय्याला धाडण्यासाठीं सज्ज केलेलें ॲंग्लोफ्रेंच सैन्य सेदां किल्ल्याच्या सन्निधच होतें आणि जर्मनीची चढाई चालू होतांच तें त्या देशांच्या संरक्षणाकरितां तातडीनें बेल्जममधील युद्धाच्या आघाडीवर गेलें. त्या सैन्यानें मोकळा केलेला फ्रेंच आघाडीचा भाग लगेच भरून काढण्याचें काम जनरल गामेलँ यांनीं नवव्या फ्रेंच सैन्याचे सेनापति जनरल कोराप यांच्याकडे सोंपविलें होतें. हे सेनापति १० मेला आपल्या छावणींत अनुपस्थित होते आणि कित्येक तासांनंतर ते आपल्या कामावर आले. सेनापतींचा हा स्वभाव त्यांच्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना पुरता माहीत असल्यानें त्यांनींहि आपल्या सर्व हालचाली संथपणें चालविल्या होत्या. यामुळें जी आघाडी नवव्या फ्रेंच सैन्यानें दोन दिवसांत पूर्णपणें व्यापून तिच्या संरक्षणासाठीं सिद्ध व्हावयाचें होतें ती

आघाडी १२ मेला त्याच नवव्या सैन्याच्या कांहीं तुकड्यांनीं मात्र व्यापर्ली होती ! यामुळें त्याच दिवशीं जेव्हां जर्मनीचे रणगाडे सेदांशेजारीं येऊन पोंचले तेव्हां त्यांना म्हणण्याजोगा विरोधच झाला नाहीं. त्या रणगाड्यांनीं मज नदीवरील सहा अरक्षित पुलांवरून फ्रान्समध्यें प्रवेश केला आणि फ्रान्सच्या आघाडीमध्यें पन्नास मैल रुंद आणि तितकीच खोल अशी पाचर मारली. युद्धशास्त्रज्ञांचें म्हणणें असें आहे कीं पहिल्या महायुद्धांतल्याप्रमाणें समुद्रापासून स्विट्झर्लंडपर्यंतची आघाडी जर स्थिर झालेली असती तर या एका पन्नास मैलांच्या पाचरीमुळें कांहीं फ्रान्सचा पाडाव झाला नसता. पण १९४४ मधील मार्शल रुंडस्टेड यांच्या याच भागांतील चढाईच्या वेळींहि अँग्लोफ्रेंच सैन्याची गठडी वळण्याची वेळ आली होती, हें लक्षांत घेतलें म्हणजे त्यांच्या म्हणण्यांत कांही तथ्य दिसत नाहीं. असो. १९४० च्या मेमध्यें बेल्जमच्या साहाय्याला गेलेल्या ॲंग्लोफ्रेंच सैन्याचा त्या देशांत अद्यापि पाय रोवला नव्हता, इतकेंच नव्हें तर तो रोवला जाऊं नये यासाठीं जर्मनीचें विमानदळ विश्वप्रयत्न करीत होतें. १२ मेला जर्मनांनीं बेल्जममधील नामूर आणि लूव्हेन या दुर्गांवर अतिशय मोठी बॉंबवृष्टि केली. कारण या दुर्गांतूनच अँग्लोफ्रेंच सैन्याला धान्यसामुग्री, दारूगोळा, रहावयाची जागा इत्यादींची व्यवस्था व्हावयाची होती. याच दिवशीं अँटवर्पवर हल्ला करून त्याचाहि जर्मनांनीं अर्धामुर्धा विध्वंस केला. पण नामूर आणि लूव्हेन यांच्याइतकी त्याची दुर्दशा झाली नाहीं. या बॉंबवृष्टीमुळेंच अँटवर्प-लूव्हेन-नामूर या आघाडी-वर टिकाव धरणें अँग्लोफ्रेंचांना अशक्य झालें आणि त्यामुळें सेदांशेजारीं पड-लेल्या भगदाडाचा घातुकपणा अनेकपटींनीं वाढला. जर्मनांच्या निरनिराळया हालचाली एकमेकांशीं अशा संलग्न असत, हें या उदाहरणावरून उत्कृष्ट रीतीनें कळून येतें.

## माजिनोवरील तोफांचें मौन

सेदांसंबंध माजिनो तटबंदीला अचानक भगदाड पडण्याचें आणखी एक महत्त्वाचें कारण इथें सांगितलें पाहिजे. तें हें कीं लुक्सेंबुर्ग प्रांतां-तून आर्दोनकडे जाणारा मार्ग माजिनो तटबंदीच्या जवळूनच जातो. कित्येक ठिकाणीं तर त्या तटबंदीपासून अवघ्या दहा मैलांवरून जर्मनीच्या रणगाड्यांना जावें लागलें. या मार्गानें चढाई केल्यास माजिनो तटबंदीवरील

तोफांच्या माऱ्यानें आपल्या रणगाड्यांची अतिशय हानि होईल अशी जर्मनीला भीति वाटत होती. अगदीं १९३९ च्या उन्हाळ्यांत प्रसिद्ध झालेल्या जर्मन सेनेच्या मुखपत्रांतील लेखांतून ही भीति व्यक्त केलेली आहे. पण जर्मनीची अचानक चढाई चालू झाल्यामुळें माजिनो तटबंदीच्या भागांतील टेहेळ्यांना तिची वार्ता मिळून ती त्या भागांतील फ्रेंच सेनेच्या वरिष्ठांच्या कानावर जाऊन त्यांनीं तोफा डागण्याची आज्ञा देईपर्यंत बराच अवधि लोटला असण्याचा संभव आहे. ही शक्यता लक्षांत घेऊनच जर्मनीनें हें साहस केलें असलें पाहिजे. असलें साहस यशस्वी होणें शक्य आहे कीं नाही, हें आपले प्रतिपक्षी यशस्वी रीतीनें टेहेळणी करूं शकतात कीं नाहींत यावरून सहज ओळखतां येतें. १९४१ मधील रशियावरील चढाईंतहि हाच प्रयोग पुनश्च एकवार यशस्वीपणें जर्मनीनें करून दाखविला. त्याचा उल्लेख पुढें येईलच. या ठिकाणीं तर माजिनो तट-बंदीच्या भागांतच काय ते फ्रेंचांचे टेहळे सैनिक होते. तो भाग ओलांडून बेल्जमच्या दक्षिणेकडून आर्दोनच्या अरण्यांत प्रवेश केल्यानंतर जर्मनांना केवळ बेल्जियन टेहेळ्यांचें भय होतें. त्यांना मिळालेली वार्ता प्रथम त्यांच्या सेना-पतींकडे जाऊन मागाहून ती फ्रेंचांना मिळे. यामुळें जर्मन रणगाड्यांच्या भेदांकडील प्रगतीची वार्ता फ्रेंचांना फार उशिरानें मिळाली आणि त्यामुळें जनरल कोरापच्या सैन्याला असावध गांठून त्याचा विध्वंस करणें जर्मनांना सोपें गेलें.

## फ्रेंचांची फसगत

माजिनो तटबंदीच्या शेजारून रणगाड्यांची चढाई करणें धोक्याचें आहे, अशा आशयाचे जे लेख जर्मन सेनेच्या मुखपत्रांतून प्रसिध्द झाले होते, त्यांमुळें फ्रेंच सेनापतींची फसवणूक झाली असावी अशीहि शंका येते. १९४० च्या जानेवारी आणि फेब्रुवारी महिन्यांत पारीसच्या ल तॉं या पत्रांत भावी जर्मन चढाईच्या रूपरेखेचें वर्णन आलें होतें. त्यांत एका फ्रेंच तज्ज्ञानें असा अंदाज केला होता कीं उत्तर आणि दक्षिण बेल्जममधून जर्मनी चढाईसाठीं रण-गाड्यांच्या तुकड्या आणि भरपूर पायदळ सैन्य पाठवील. मध्य बेल्जममधील जर्मनीची चढाई मात्र बेताचीच होईल. या अंदाजाप्रमाणें उत्तर बेल्जममधील चढाईला तोंड देण्याची सारी सिध्दता फ्रेंचांनीं किंवा संयुक्त राष्ट्रांनीं करून

ठेविली होती. पण दक्षिण बेल्जममधील चढाईला तोंड देण्यासाठीं त्यांनीं कांहींच व्यवस्था केली नव्हती. श्लीफेन योजनेप्रमाणें उत्तरेकडूनच खरी चढाई होण्याची फ्रेंचांची अपेक्षा होती हें जसें अक्षम्य हयगयीचें एक कारण आहे, तसेंच माजिनो तटबंदीच्या जवळून जर्मन रणगाड्यांची चढाई होण्याच्या अशक्यते-संबंधीचे लेख हेंहि एक त्या हयगयीचें कारण असूं शकेल.

जर्मन सेनेनें सेदांसन्निध फ्रेंच फळी फोडल्यानंतर फ्रेंच युद्धश्रेष्ठींनीं माजिनो तटबंदीच्या संरक्षणांत गुंतलेलें सैन्य मोठ्या प्रमाणावर सेदां दुर्गाकडे आणावयाला पाहिजे होतें. कारण आघाडीला भगदाड पडल्यानंतर इतःपर तटबंदीवरील अचल लढाई चालविण्याची शक्यता उरलेली नव्हती. पण इतकी अमोलिक तटबंदी अशी एका क्षणांत सोडून देण्याचें साहस अलौकिक प्रतिभेच्या सेना-पतीकडूनच होऊं शकलें असतें. असल्या सेनापतींचें तेव्हां फ्रान्समध्यें दुर्भिक्ष्य होतें, हें सर्वांनाच माहीत आहे.

## युद्धशास्त्राचे जुने नियम

युद्धशास्त्राचे प्रचलित नियमहि असे तडकाफडकीं निर्णय करण्याला प्रति-कूलच होते. कारण शत्रूनें एखादी अनपेक्षित चढाई आरंभिली म्हणजे ही खरी चढाई आहे की नुसती हुलकावणी आहे हें निश्चितपणें समजण्यासाठीं सेना-पतीनें तीन दिवसपर्यंत कसलीहि प्रतिकाराची योजना करूं नये, असा एक युद्ध-शास्त्रांतला नियम आहे. हा नियम पहिल्या महायुद्धाच्या दिवसांतच निरुपयोगी झाला होता. पण त्या युद्धांतल्या चढाया मुख्यतः पायदळाच्या चढाया असल्यानें तेव्हां तो चालू युद्धांतल्या इतका घातुक होऊन बसला नव्हता. दुसऱ्या महा-युद्धांत विमानें आणि रणगाडे यांच्या संयोगानें चढाया होत असल्यानें त्या नियमाचें युद्धशास्त्रावरील ग्रंथांतून उच्चाटनच करावें लागलें असेल. असो, फ्रेंच सेनापतींनीं त्या वेळीं माजिनो तटबंदीवरील सैन्य हलवून आघाडीवर न आण-ल्यामुळें तें सारें सैन्य पुढें महिन्याभरानें न लढतांच वेढ्यांत सांपडून जर्मनांना शरण गेलें.

## रणगाडे थांबवण्याची आशा

फ्रान्सच्या पाडावाची मीमांसा करतांना एका जर्मन युद्धतज्ज्ञानें लिहिलें

आहे. ' Exactly what happened in the first two days following the rapid destruction of General Corap's army is not yet known. ' पण वरील विवेचनानें त्यावेळीं फ्रेंच सेनापति काय करीत होते, याचा उत्कृष्ट उलगडा होतो. जनरल कोरापच्या सैन्याचा विध्वंस झाल्यानंतर बेल्जममधील सैन्य काढून घेणें आणि माजिनो तटबंदीच्या सैन्यानें फ्रान्समध्यें घुसलेल्या जर्मन सैन्याच्या बगलेवर हल्ला करणें या दोन गोष्टी त्यांनीं लगेच करावयाला पाहिजे होत्या. यांपैकीं एकहि गोष्ट त्यांच्या हातून झाली नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यांच्यापैकीं पुष्कळांना काय चाललें आहे, याची कल्पनाहि आली नाहीं. या वेळीं अनेक अँग्लोफ्रेंच युध्दतज्ज्ञ (?) आपल्या जनतेला असें आश्वासन देत होते कीं जर्मन रणगाड्यांनीं आघाडीला भगदाड पाडलें असलें तरी आपली सैनिकहानि अत्यल्प झाली आहे आणि पुरवठ्याच्या अभावीं शत्रूचे रणगाडे अचल झाले म्हणजे त्याचें सारें चढाईचें सैन्य आपोआपच आमच्या तावडींत सांपडणार आहे! अर्थात् हा भ्रम फ्रान्सचे तेव्हांचे मुख्य प्रधान मो. रेनो यांना झालेला नव्हता. जनरल गामेलँ यांच्या-सारख्या युध्दश्रेष्ठींनाहि झाला नव्हता. पण त्या भ्रमानें फ्रान्समधील पुष्कळच सेनापति ग्रासलेले होते, याविषयीं शंका नाहीं.

## जर्मनांच्या हुलकावण्या

जर्मनीनें फ्रेंच फळी फोडली तेव्हां अँग्लोफ्रेंच सैन्याचे अगदीं बरोबर दोन भाग झाले होते. बेल्जममध्यें या वेळीं त्यांचें ५० डिव्हिजन सैन्य अडकलें होतें आणि जवळ जवळ तितकेंच सैन्य उत्तरफ्रान्सच्या संरक्षणासाठीं उपलब्ध होतें. जर्मनीच्या रणगाड्यांनीं इंग्लिश खाडीकडे सरळ दौड केली असती तर या सैन्याला जर्मनीच्या बगलेवर सहज चढाई करतां आली असती. पण आपल्या-वर अशी प्रतिचढाई होऊं नये, याकरितां जनरल राइशेनाउ यांच्या सेनेनें आपला रोख इंग्लिशखाडीकडे आहे कीं पारीसकडे आहे हें फ्रेंच सेनापतींना कळूंच दिलें नाहीं. मधून मधून दक्षिणेकडे पारीसच्या दिशेनें प्रगति करावयाची आणि त्या दिशेला शत्रूंचा प्रतिकार वाढूं लागला कीं पुन्हां पश्चिमेकडे दौड करावयाची असा क्रम जनरल राइशेनाउ यांनीं चालविला होता. अशा हुलकावण्या देऊनसुध्दां त्यांच्या सैन्यानें अवघ्या अकरा दिवसांत आबेव्हिल बंदर हस्तगत

केलें. श्लीफेनयोजेनप्रमाणें तें चढाईच्या सत्राव्या दिवशीं जर्मनीच्या हातीं पडावें, असा अंदाज होता. अर्थात् काउंट श्लीफेन यांच्या काळीं रणगाड्यांचा शोध लागला नसल्यानें त्यांच्या अंदाजांत आणि दुसऱ्या महायुध्दांतील अनुभवांत इतकें अंतर पडणें स्वाभाविक आहे.

## चर्चिलचें अज्ञान

पारीसवर चढाई करण्याची हुलकावणी दाखवून जर्मन सेनापतींनीं आपला इंग्लिशखाडीकडील मार्ग सुकर करून घेतला, हें विधान फ्रान्सच्या मुख्य प्रधानांनीं २१ मेच्या भाषणांत केलेलें मागाहून आढळलें. माजिनो आघाडीला भगदाड पाडल्यानंतर ओढवलेल्या संकटाचें वर्णन करतांना मो. रेनो यांनी म्हटलें आहे, 'Into this breach poured a German army composed of motorized divisions, which, after having caused a large bulge in the direction of Paris turned west towards the sea, taking in the rear our entire fortified system along the Franco-Belgian frontier and threatening the allied forces still engaged in Belgium, to whom the order to retreat was not given until the evening of May 15.' या एका वाक्यावरूनही मो. रेनो यांना जर्मन रणगाड्यांच्या आक्रमणाच्या भीषणतेची यथार्थ कल्पना असल्याचें कळून येतें. याच्या उलट त्या वेळीं मि. चर्चिल यांना जर्मनीच्या नव्या युद्धतंत्राची भीषणता मुळींच समजून आली नव्हती, असें १९ मेला त्यांनीं पार्लमेंटांत केलेल्या भाषणावरून उघड होतें. ते म्हणतात, 'It would be still more foolish to loose heart and courage or to suppose that well-trained and well-equipped armies numbering three to four millions of men could de overcome within the space of a few weeks or even months by a scoop or raid of mechanized vehicles, however formidable. We may look forward with confidence to the stabiliza-

tion of the front in France and to the general engagement of the masses which will enable the qualities of the French and the British soldiers to be matched squarely against those of their adversaries.' म्हणजे रणगाड्यांच्या चढाईनें कांहीं आठवड्यांत किंवा कांहीं महिन्यांत तीसचाळीस लक्ष सुशिक्षित आणि सुसज्जित सैन्याचा विध्वंस होऊं शकेल, ही गोष्ट तेव्हां मि. चार्चिल यांच्या स्वप्नांतसुद्धां येऊं शकत नव्हती. त्यांना असेंच वाटत होतें कीं जर्मन रणगाड्यांनीं फ्रान्समध्यें कितीहि धुमाकूळ घातला तरी अँग्लोफ्रेंच पायदळाशीं जर्मन पायदळाची टक्कर होऊनच या चढाईचा सोक्षमोक्ष लागणार आहे. जनरल गामेलँ यांच्यासारख्या कांहीं फ्रेंच युद्धश्रेष्ठांना ही कल्पना मान्य नव्हती. बेल्जममधील आपल्या सैन्यावर जर्मन रणगाड्यांचे पिछाडीकडून हल्ले चालू झाले म्हणजे तीं सैन्यें तत्काळ वितळून जातील, याची त्यांना जाणीव होती. यामुळेंच त्यानीं पायदळांच्या टक्करीनेंच या चढाईचें भवितव्य ठरणार आहे, असें प्रतिपादणाऱ्यांच्या विरोधाला न जुमानतां बेल्जममधील अँग्लोफ्रेंच सैन्याला परत फिरण्याची आज्ञा दिली. ही आज्ञा त्यांनीं माजिनो तटबंदीला भगदाड पडल्याबरोबर द्यावयाला हवी होती, असें पुढें मि. चर्चिल यांनींच प्रतिपादिलें आहे. पण ती आज्ञा देण्याला विलंब होण्याचें तात्त्विक कारण आपल्याच १९ मेच्या भाषणांत सांपडण्याजोगें आहे, ही गोष्ट ते सोयीस्कर रीतीनें विसरून गेले.

## रणगाड्यांचें दुर्भिक्ष

फ्रेंचांच्या आघाडीला भगदाड पडल्यानंतर त्यांतून पुढें दौड करीत निघालेल्या जनरल राइशेनाउ यांच्या रणगाड्यांना अँग्लोफ्रेंचांचे रणगाडेच थांबवूं शकले असते. पण त्यांच्यापाशीं रणगाड्यांचें दुर्भिक्ष्यच असल्यानें असे प्रयत्नहि फारच थोड्या ठिकाणीं झाले. १३ आणि १४ मेला दिनांत आणि तीरलमोंत या ठिकाणीं फ्रेंच रणगाड्यांनीं जर्मनांशीं चकमकी केल्या. त्यानंतर १७ आणि १८ मेला पारीसच्या दिशेनें जर्मनांनीं प्रगति करूं नये, यासाठीं लाऑं आणि रेतेल् येथें फ्रेंच रणगाडे जर्मनांना आडवे आले. पण जर्मनांचा खरा रोख पारीसकडे नसल्यामुळें त्यांनीं दिशा बदलून इंग्लिशखाडीचा मार्ग धरला आणि

आपल्याला भिऊन शत्रु पळाल्याचा आनंद फ्रेंचांना स्वस्थपणें उपभोगूं दिला. १८ मेनंतर जनरल राइशेनाउ यांच्या समुद्रगामिनी सेनासरितेला अडविण्याचा फ्रेंचांनीं कोठेंहि प्रयत्न केला नाहीं. एवढ्यावरून रणगाड्यांना प्रतिरोध करण्याला पायदळाचा यत्किंचितहि उपयोग नाहीं, याचा तर अनुभव आलाच; पण त्यानंतर लौकरच याच रणगाड्यांनीं पिछाडीकडून हल्ले आरंभिल्यामुळें जर्मन पायदळाशीं टक्कर देऊन विजय मिळविण्याच्या सुखस्वप्नांत दंग असलेल्या बेल्जममधील अँग्लोफ्रेंच सैन्याला धुंकेर्कच्या बंदरांतून शस्त्रें टाकून पलायन करावें लागलें.

१८ मेनंतर फ्रेंच सेनापतींची सत्ता आपल्या सेनेवर चालेनाशी झाली. वरिष्ठ सेनापतींचें कनिष्ठ अधिकाऱ्यांशी दळणवळण राहिलें नव्हतें. प्रसंगविशेषीं खालच्या अधिकाऱ्यांना वरिष्ठांकडून आज्ञा मिळाल्याच तर त्या पुष्कळदां परस्परविरोधी असत. कनिष्ठ अधिकाऱ्यांचाहि सैन्यावरील अधिकार संपुष्टांत येऊं लागला. सैन्याला विमानें, रणगाडे, तोफा, दारुगोळा आघाडीवर पोंचण्याला पराकाष्ठेचा उशीर होऊं लागला. पुष्कळदां अर्थातच ही सारीच सामुग्री वाहतुकीच्या साधनांच्या अभावीं पिछाडीला अचल होऊन राही. येऊन पोंचलेले तोफांचे गोळे त्या तुकडींतील तोफांमधून उडविण्याजोगे नसत.

## जनतेंतील विपरीत प्रचार

आघाडीवर हा अनवस्थाप्रसंग ओढवला असतांनासुद्धां देशावर ओढवलेल्या संकटासंबंधीं जनतेच्या चुकीच्या समजुती करून दिल्या जात होत्या. युद्धतज्ज्ञ म्हणविणाऱ्यांनीं प्रथम असा प्रचार आरंभिला कीं जर्मन रणगाडे आपोआपच मोडून पडतील किंवा तेलाच्या अभावीं बंद पडतील. पण त्या रणगाड्यांनीं इंग्लिशखाडी गांठल्यावर तज्ज्ञ सांगूं लागले कीं जर्मन सैन्यानें आम्हांला वेढलेलें नसून आमच्या उत्तरेच्या आणि दक्षिणेच्या सैन्याच्या मध्यें जर्मनांनीं स्वतःलाच अडकवून घेतलें आहे. जर्मन रणगाडे फ्रेंच रणगाड्यांशीं टक्कर देण्याला भितात, अँग्लोफ्रेंचांचीं विमानें संख्येनें कमी असलीं तरी योग्यतेनें जर्मनांपेक्षां श्रेष्ठच आहेत, आमच्या पाठलाग करणाऱ्या विमानांनीं जर्मनीच्या बॉंबफेक्या विमानांचा कांटा काढला आहे, आमच्या सैन्यांचा आघाडीवर कोठेंच पराजय झालेला नाहीं, केवळ पिछाडीवर थोडाबहुत

घोंटाळा झाला आहे, इत्यादि ! लोकसत्ताक देशांतील राजकारणांत नित्य जो असत्य प्रचार चालू असतो, तो यावेळीं फ्रान्समध्यें युद्धकारणांत चालला होता इतकें म्हटलें म्हणजे पुरे. असल्या प्रचाराचें सर्वांत संस्मरणीय उदाहरण म्हणजे २१ मेला इंग्लंडचे प्रचारमंत्रि मि. डफ कूपर यांनीं नभोवाणीवरून केलेलें भाषण होय. आबेव्हिलच्या पाडावानंतर केलेल्या या भाषणांत ते म्हणतात, ' The armies of Britain and France are undefeated. In enormously superior numbers they occupy the battle-field, and the counter-attack when it comes should prove formidable. ' या विधानांपैकीं, रणक्षेत्रांत अँग्लो-फ्रेंचांचें सैन्य संख्येनें जर्मनांपेक्षां पुष्कळच वरिष्ठ होतें, एवढें एकच विधान खरें होतें. पण त्या सैन्याच्या अंगीं प्रतिहल्ला करण्याचें सामर्थ्य उरलें आहे, अशी जी मि. डफ कूपर यांची समजूत होती, ती सपशेल चुकीची होती.

## मानगुटीवरील म्हातारे !

या वेळीं प्रतिहल्ल्यांच्या कांहीं योजना अँग्लोफ्रेंच सेनापति करीत होते. अशा वेळीं त्यांच्या सरकारांना संयुक्त सैन्याचे वरिष्ठ सेनापति जनरल गामेलँ यांना पदच्युत करून त्यांचें पद जनरल वेगां यांना देण्याची बुद्धि झाली. ही खांदेबदल १९ मेला झाली. तत्पूर्वी जनरल वेगां हे सीरियांत असल्यामुळें त्यांना युरोपांतील रणक्षेत्रांची कांहींच माहिती नव्हती. अधिकाराचीं सूत्रें हातीं घेतल्यानंतर परि-स्थितीची माहिती करून घेण्यांत त्यांनीं चार दिवस घालविले. त्यानंतर तरी त्यांनीं अँग्लोफ्रेंचांच्या रणनीतीला वेगळें वळण लावलें, असा आरोप त्यांच्यावर त्यांच्या शत्रूंनीं किंवा मित्रांनींहि केला नाहीं. तिसऱ्या फ्रेंच लोकसत्ताक राज्याचें शव जें जनरल गामेलँ यांनीं स्मशानभूमीकडे चालविलें होतें, त्याला वाटेंत एक-वार जनरल वेगां यांच्या खांद्याचा आधार मिळाला इतकेंच. एका वृद्ध सेनाप-पतीच्या जागीं वृद्धतर सेनापति नेमून राज्याचें रक्षण करण्याची कल्पना मरणो-न्मुख राष्ट्रालाच सुचावयाची. ही फ्रेंच राष्ट्राची कुचेष्टा नसून केवळ वस्तुस्थिति मात्र होती, हें मो. रेनो यांनीं फ्रान्सचे वृद्धतम सेनापति मार्शल पेतँ यांना लौक-रच मंत्रिमंडळांत घेऊन सिद्ध केलें. या पाऊणशें आणि पंचाऐंशी वर्षांच्या सेनापतींविरुद्ध लढणारे जर्मन सेनापति मुख्यतः पन्नाशीच्या घरांतले होते, हें

लक्षांत घेतलें म्हणजे आपल्या मानगुटीवर वेगांपेतँसारख्या अतिवृद्धांना बसवून घेणाऱ्या देशाची कींव आल्यावांचून रहात नाहीं.

## आज्ञाभंगाचे सुपरिणाम

जनरल वेगां यांनी हातीं अधिकार घेतल्यानंतर २२ मेला त्यांनीं बेल्जम-मधील अँग्लोफ्रेंच सेनापतींची भेट घेतली आणि दक्षिण नि उत्तर या दोनहि दिशांनीं फ्रान्समध्यें मारलेल्या जर्मन पाचरीवर आघात करण्याचा संकल्प ठर-विला. या आघाताचा दिवस २६ मे हा ठरला होता. पण जनरल वेगांसारख्या वयोवृद्ध सेनापतींनीं संथपणें चार दिवसांनंतर हल्ला करण्याचा बेत ठरविला असतां उतावळया जर्मन सेनापतींनीं २५ मेला आपणच बेल्जममधील सैन्याच्या आघाडीवर चढाई करून त्यांचा डाव उधळून दिला. या ठिकाणीं जर्मनीच्या डावपेंचांचा थोडा उलगडा करणें आवश्यक आहे. १० मेला बेल्जियन सैन्याची फळी फोडण्यासाठीं जर्मनीनें जो आघाडीवरील भीषण हल्ला केला होता, तसले भयानक हल्ले त्यांनीं नंतरच्या पंधरा दिवसांत केले नव्हते. या सर्व अवधींत बेल्जममध्यें जर्मनीची झपाट्यानें प्रगति चालूंच होती. पण माजिनो फळीला पड-लेल्या भगदाडाचा स्वाभाविक परिणाम म्हणून ती प्रगति चालूं होती. तिच्या-साठीं बेल्जमच्या आघाडीवरील जर्मन सैन्याला विशेष कष्ट करावे लागत नव्हते. पण जर्मन रणगाडे इंग्लिशखाडीला पोंचल्यानंतर उत्तरेच्या सैन्याचा निःपात करण्याकरितां जर्मनांनीं बेल्जियन आघाडीवरहि निकराची लढाई आरंभिली. आघाडीवरील चढाईच्या प्रसंगींहि जर्मनीचा सर्वांत प्रचंड आघात सर्वांत दुर्बल सैन्यावरच होत असे. बेल्जममधील संयुक्त राष्ट्रांच्या सैन्यांत बेल्जमचें सैन्य सर्वांत दुर्बल होतें; आणि जर्मनीचा पहिलाच तडाखा त्याला बसल्यामुळें तें अधि-कच दुर्बल झालें होतें. त्यानंतरच्या पंधरा दिवसांच्या लढाईंतहि त्याच सैन्यावर जर्मनांचा विशेष कटाक्ष असल्यामुळें तें अगदीं हातटेकीला आलें होतें. आणखी एखादा आघात झाल्यास तें सैन्य सपशेल शरण येऊन युद्धांतून अंगच काढून घेईल, अशीं लक्षणें दिसूं लागलीं होतीं. या परिस्थितीचा लाभ घेण्याकरितां जर्मनांनीं २५ मेला आरंभिलेल्या चढाईंत मुख्यतः बेल्जियन सैन्यावर रोख धरला आणि त्याचा भीषण संहार आरंभिला. यापूर्वी जर्मन आणि बेल्जियन सैन्यांच्यामध्यें शेल्ट नदी होती. त्यामुळें बेल्जियन सैन्य जर्मनांपासून थोडें तरी

सुरक्षित होतें. पण २५ मेला जर्मनांनीं ती नदी ओलांडली आणि ब्रूजेस नगराच्या दिशेनें चढाई चालूं केली. या चढाईला तोंड देण्याइतकें त्राण बेल्जियन सैन्यांत उरलें नव्हतें. त्यांच्या राजांनीं तर ही चढाई चालूं होण्यापूर्वीच जर्मनांना शरण जाण्याचा निश्चय केला होता. हा निश्चय ब्रिटिश सेनेचे प्रमुख लॉर्ड गॉर्ट यांना माहीत नव्हता. तरीसुद्धां बेल्जियन सैन्याचे दिवस भरले आहेत, हें त्यांना स्पष्टच दिसत होतें. त्यामुळें जनरल वेगां यांच्या योजनेप्रमाणें २६ मेच्या संयुक्त चढाईसाठी त्यांनीं जें दोन डिव्हिजन ब्रिटिश सैन्य राखून ठेविलें होतें, तें सारें त्यांनीं आपल्या सरकाराच्या स्पष्ट आज्ञा न जुमानतां बेल्जियन सैन्याच्या साहाय्याला पाठविलें. या वेळीं लॉर्ड गॉर्ट यांना आपल्या सरकाराच्या आज्ञाविरुद्ध वर्तन करावें लागलें असलें तरी तत्कालीन परिस्थितींत त्यांनीं आपलें खरोखरीचें कर्तव्यच बजावलें होतें, ही गोष्ट पुढें ब्रिटिश सरकारानेंहि मान्य केली. यावेळीं लॉर्ड गॉर्ट यांनीं दोन डिव्हिजन सैन्य बेल्जमच्या साहाय्याला न धाडतां तें दक्षिणेकडे जर्मन पाचरीवर आघात करण्याकरितां पाठविलें असतें म्हणजे पुढें धुंकेर्कमधुन जें सव्वातीन लक्ष सैन्य निसटून गेलें, तेंहि निसटलें नसतें. आणि जर्मनीच्या ब्रिटनवरील स्वारीचा मार्ग जवळ जवळ निष्कंटक झाला असता.

## शरणागतीचें कर्तव्य

इंग्लिश सैन्य बेल्जियनांच्या साहाय्याला गेल्यामुळें त्या सैन्यानें आणखी दोन दिवस कसा तरी टिकाव धरला. पुढें त्या सैन्याचा प्राण अगदीं कंठाशीं आल्यानें २७ मेला लिओपोल्ड राजांनीं जर्मनीकडे शस्त्रसंधीची मागणी केली. पण जर्मनीनें ती नाकारल्यामुळें दुसऱ्या दिवशीं सपशेल शरणागति पतकरून त्यांनीं शस्त्रें खालीं ठेविलीं. लिओपोल्ड राजे जर्मनीला शरण गेल्यानंतर अँग्लो-फ्रेंचांनीं त्यांच्यावर जो शिव्यांचा भडिमार केला, तो या युद्धाच्या इतिहासांत अगदीं अद्वितीय होता, याविषयीं शंका नाहीं. पण हा सारा शिव्यांचा भडिमार सर्वस्वीं अन्यायाचा होता. लिओपोल्ड राजे शत्रूला शरण गेले, ते बेल्जियन सैन्याचे सेनापति या नात्यानें शरण गेले. अशा परिस्थितींत सेनापतीनें शरण जाऊन आपल्या सैन्याचा अकारण होत असलेला संहार थांबविणें हें त्याचें कर्तव्यच असतें. लिओपोल्ड राजांच्या पूर्वी हॉलंडच्या सेनापतींनींहि अशीच शरणागति पतकरून आपल्या सैनिकांची हत्या थांबविली होती. मग एकट्या

बेल्जमच्या राजांच्या शरणागतीला नांवें ठेवण्यांत काय अर्थ? येऊनजाऊन लिओपोल्ड राजांवर तेव्हां त्यांच्या मित्रराष्ट्रांनीं असा आरोप केला होता कीं आम्हांला आधीं न कळवितां ते जर्मनांना शरण गेले. पण हा आरोप सपशेल खोटा होता, असें आतां सारेच माहीतगार लोक सांगतात! ठेंगू आणि राक्षस या उभयतांनीं मिळून एखाद्या बलाढ्य शत्रूशीं लढाई केली तर पहिलेच आघात ठेंगूवर करून त्याला युद्धांत भाग घेणें अशक्य करण्याचा प्रयत्न शत्रु करणारच. म्हणून राक्षसानें ठेंगूच्या विश्वासघाताची निंदा आरंभिली तर ती हास्यास्पद होते, इतकेंहि भान पराजयाच्या भीतीनें गांगरलेल्या अँग्लो-फ्रेंचांना तेव्हां उरलें नाहीं.

## रणगाड्यांची धडक

बेल्जमच्या शरणागतीनंतर त्या देशाच्या साहाय्याला आलेल्या अँग्लोफ्रेंच सैन्यापैकीं किती सैनिक निसटून जाऊं शकतात, एवढाच प्रश्न उरला. या पलायनाची माहिती यापूर्वी इतरत्र आलीच आहे. इथें सांगण्याचा मुद्दा हा कीं अँग्लोफ्रेंच इतिहासकारांचीं आणि प्रचारकांचीं सारीं विधानें सत्य असतीं तर या सैन्याला समुद्रावरून पलायन करण्याचें कांहींच कारण नव्हतें. त्यांच्याच म्हणण्याप्रमाणें त्या सैन्याचा आघाडीवर कोठेंच पराजय झालेला नव्हता; केवळ बेल्जमच्या पूर्वसीमेपासून पश्चिमसीमेचें उल्लंघन होईपर्यंत त्याला पळावें लागलें होतें इतकेंच. अँग्लोफ्रेंचांच्या श्रेष्ठ विमानांचा त्या सैन्याला पूर्ण पाठिंबा होता. जर्मनीचे रणगाडे अँग्लोफ्रेंचांच्या रणगाड्यांशीं टक्कर घेण्याला भीत होते, हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. पुन्हा या रणक्षेत्रावर अँग्लोफ्रेंचांचें सैन्य शत्रूच्या सैन्यापेक्षां संख्येनें वरिष्ठ होतें, असें इंग्लंडच्या प्रचारमंत्र्यांनीं सांगून ठेवलेंच होतें. असें असूनहि डुंकेर्कहून पलायन करणेंच अँग्लोफ्रेंचांना श्रेयस्कर वाटण्याचें मुख्य कारण म्हणजे जर्मन रणगाड्यांच्या हल्ल्यांपुढें काले, बूलोन्यसारखे सिंधुदुर्ग टिकाव धरीनात, हेंच होय. जर्मन रणगाड्यांविरुद्ध कालेचा किल्ला चार सहस्र अँग्लोफ्रेंच सैनिकांनीं चार दिवस लढविला. बूलोन्यचा इतके दिवसहि निभाव लागला नाहीं. म्हणजे जे जर्मनीचे रणगाडे आपोआपच मोडून पडतील, अशी अँग्लोफ्रेंच युद्धतज्ज्ञांची अपेक्षा होती, त्यांच्या धडकीपुढें काले आणि बूलोन्य यांसारख्या सुप्रसिद्ध सिंधुदुर्गांचाहि निभाव लागला नाहीं आणि त्यामुळेंच

ग्युंकेर्कच्या भोंवतालीं सुमारें तीस डिव्हिजन अँग्लोफ्रेंच सैन्य असूनसुद्धां त्याला त्यांतील अर्धेसुद्धां सैनिक सोडवून नेतां आले नाहींत.

## ब्रिटिश रणगाड्यांचें वर्म

जर्मनीचे रणगाडे आपोआप मोडून पडतील, ही अँग्लोफ्रेंच सेनापतींची कल्पना अगदींच निराधार नव्हती. कारण त्यांचे स्वतःचे रणगाडे एकदोन दिवसांच्या नाचानाचीनंतर असेच निकामी होत असत. लॉर्ड गॉर्ट यांनीं ग्युंकेर्कहून पळून आल्यानंतर आपल्या सरकाराला जें प्रतिवृत्त सादर केलें, त्यांत अशा प्रसंगांचीं वर्णनें आलीं आहेत. उदाहरणार्थ, एकवार बेल्जममधून ब्रिटिश सैन्याची माघार चालू असतां त्यांचे रणगाडे आगगाडींतून नेण्याची सारी व्यवस्था झाली होती. पण तीं धुडें आपल्या वाहनांवर आरूढ होण्यापूर्वी जर्मन रणगाड्यांनीं माघार घेणाऱ्या ब्रिटिश सैन्यावर छापा आणला. त्याला तोंड देण्याकरितां ब्रिटिश रणगाडे पुढें वाढून गेले, तेव्हां जर्मनांनीं त्यांची थोडी नाचवानाचव करून माघार घेतली. पण त्याच अवधींत जर्मन वैमानिकांनीं आणि छत्रीधारी सैनिकांनीं तिथल्या आगगाडीची मोडतोड केली. त्यामुळें ब्रिटिश रणगाड्यांस रखडत माघार घेण्याव्यतिरिक्त गत्यंतर उरलें नाहीं. या रखडपट्टींत बहुतेक ब्रिटिश रणगाडे निकामी झाले आणि पुढें लढाईत ते भाग घेऊं शकले नाहींत. ब्रिटिश रणगाड्यांचें हें वर्म माहीत असल्यानें जर्मन रणगाडे त्यांच्याशी लढण्याचे व्यर्थ श्रम करीत नसत. त्यांना नाचवून निकामी करण्याचा साधा उपाय ते उपयोगांत आणीत. त्यामुळें तेव्हांच्या लढायांच्या वर्णनांत जर्मन रणगाड्यांनी अँग्लोफ्रेंच रणगाड्यांच्या पुढून माघार घेतल्यांचीं वर्णनें वारंवार आढळतात आणि अशी नेमानें माघार घेणाऱ्या रणगाड्यांनीं फ्रान्सची लढाई कशी जिंकली, असा प्रश्न मनांत उत्पन्न होतो.

## माघारीला नकार

ग्युंकेर्कच्या माघारींतून सरासरी एक लक्ष फ्रेंच सैनिक इंग्लंडला निसटून जाऊं शकले. हे सैनिक सुद्धां निसटण्याचा संभव नव्हता. कारण ब्रिटिश सैन्य माघार घेत असतांना जर्मनांना टक्कर देण्याचें काम मुख्यतः जनरल प्रिऊ यांचें फ्रेंच सैन्य करीत असे. या अविरत लढण्याच्या श्रमानें तें सैन्य इतकें

थकलें होतें कीं एका आणीबाणीच्या प्रसंगीं त्या सैन्यानें माघार घेण्याचेंच नाकारलें. तेव्हां लॉर्ड गॉर्ट यांनीं त्यांच्या वरिष्ठाकडून जनरल प्रिऊ यांना माघार घेण्याची आज्ञा देवविली आणि ती त्या सैन्यानें पाळल्यामुळें निदान एक लक्ष फ्रेंच सैन्य तरी निसटून जाऊं शकलें.

लॉर्ड गॉर्ट यांच्याच प्रतिवृत्तावरून असें समजतें कीं २० मेच्या सुमाराला त्यांच्या नऊ डिव्हिजन सैन्यांत अवघीं पन्नास लढाऊ विमानें होतीं. एवढ्या विमानांनीं काय कात व्हावयाचा होता हें कोणालाहि सहज समजण्याजोगें आहे. सेदां दुर्गासन्निध केलेल्या एका हल्ल्यांतच जर्मनांनीं ६५० सूर मारणारीं विमानें वापरलीं. इतक्या प्रचंड प्रमाणावर प्रतिपक्षी विमानांचा उपयोग करीत असतांना पन्नास विमानें त्याचा कितपत प्रतिकार करूं शकतील, हें उघडच आहे.

## सोम नदीची लढाई

असो. बेल्जम आणि उत्तर फ्रान्स यांमधील लढाईची चिकित्सा संपवून आतां आपण दक्षिणेकडील युद्धाकडे वळलें पाहिजे. उत्तरेकडील सैन्याचा जर्मनांकडून विध्वंस चालूं असतांना आपल्या सर्व सैन्यानिशीं शत्रूवर प्रहार करण्याऐवजीं जनरल वेगां हे दक्षिण फ्रान्सच्या बचावाची फळी निर्माण करण्यांत गुंतले होते. आपण होऊन प्रतिपक्षाला पहिली खेळी खेळण्याची संधि देणें हें बुद्धिबळांत पुष्कळदां लाभदायक होऊं शकतें; पण आजकालच्या युद्धांत इतकी भयानक चूक दुसरी कोणतीहि असूं शकत नाहीं. पण फ्रान्सचें सारेंच युद्धशास्त्र बचावाच्या लढाईवर आधारलेलें असल्यानें आणीबाणीच्या प्रसंगीसुद्धां जनरल वेगां यांना दुसरा उपाय सुचणें अशक्य होतें. बरें, अशी बचावाची फळी निर्माण करावयाचीच असल्यास ती जर्मन सैन्यापासून पुरेशा अंतरावर तरी निर्माण करावयाला हवी होती. म्हणजे आघाडीवरील अल्पसंख्य फ्रेंच सैन्याचा पाठलाग करीत आलेल्या जर्मन सैन्याच्या तुकड्या अकस्मात् फ्रान्सच्या संरक्षक सैन्याच्या तावडींत सांपडून त्यांचा विध्वंस झाला असता. अशी आघाडी कदाचित् दक्षिण फ्रान्समधील ल्वार नदीसन्निध निर्माण करतां आली असती. पण असें केल्यास माजिनो तटबंदीचा न जिंकलेला भाग आणि फ्रान्सची राजधानी पारीस न लढतांच जर्मनांना समर्पण करावी लागत होती. याकरितां जनरल वेगां यांनीं

एस्न, वाज, सोम इत्यादि नद्यांच्या तीरांवर आपल्या संरक्षक व्यूहाची रचना केली. या विस्तृत आघाडीच्या संरक्षणाला पुरेसें सैन्य फ्रान्सजवळ नव्हतें, हें सांगायला नकोच. फ्रेंच सरकारच्या माहितीप्रमाणें या आघाडीवर ४३ डिव्हिजन पायदळ, ३ डिव्हिजन घोडदळ आणि तितकेंच रणगाड्यांचें दळ, एवढेंच सैन्य या वेळीं जनरल वेगां यांच्या हातांत होतें. या व्यतिरिक्त १७ डिव्हिजन सैन्य माजिनो तटबंदीच्या रक्षणांत गुंतलें होतें. या सैन्यानें प्रत्यक्ष युद्धांत जवळजवळ भागच घेतला नाहीं. कारण फ्रान्सचा प्राण कंठाशीं आला तेव्हां तें सैन्य जागच्या जागीं वेढलें जाऊन शत्रूला शरण गेलें.

## रणगाड्यांचे सांपळे

या शेवटच्या लढाईत फ्रान्सच्या सैन्याला नुसता खंदकांचा सुद्धां आधार नव्हता. मग तटबंदीचा नव्हता, हें सांगायला नकोच. एखाददुसऱ्या आठवड्यांत इतक्या विस्तृत भागावर तटबंदी करणें शक्य नव्हतें आणि ती करण्याचें सामर्थ्यहि सार्वत्रिक पळापळीमुळें फ्रेंच राष्ट्राच्या अंगीं उरलें नव्हतें. अगदीं पश्चिमेला सोम नदीकांठच्या प्रदेशांत फ्रेंचांनीं कांहीं रणगाड्यांचे सापळे केले होते आणि त्यांच्या विध्वंसाकरितां भरपूर तोफखाना आणला होता. हा सारा तोफखाना लहानमोठ्या खेड्यांच्या आणि नगरांच्या आश्रयानें ठेवला होता. दुसऱ्या महायुद्धांत असें आढळून आलें आहे कीं रणगाड्यांना थोपविण्याच्या कामीं खेड्यांचा आणि नगरांचा जितका उपयोग होतो, तितका इतर कशाचाहि होत नाहीं. या कल्पनेचा पुरेसा उपयोग पुढें रशियानें करून घेतला. तिचा पहिला प्रयोग जनरल वेगां यांनीं फ्रान्सच्या निर्वाणीच्या लढाईत करून पाहिला. खेड्यांच्या आणि नगरांच्या आश्रयानें मारा करणारा तोफखाना रणगाड्यांना सहजासहजीं बंद पाडतां येत नाहीं आणि त्या तोफखान्याला मात्र भोंवतालच्या इतर खेड्यांतल्या तोफांच्या साहाय्यानें आपल्या प्रभावक्षेत्रांतील रणगाड्यांचा विध्वंस करतां येतो. अशा तोफांच्या माऱ्यांतून कांहीं रणगाडे निसटून जातातच. पण त्यांचा निकाल लावण्याचें काम शिलकी सैन्याचें असतें. हें शिलकी सैन्यच फ्रान्सजवळ नव्हतें आणि त्यामुळें वरील प्रयोग कितपत यशस्वी होतो, हें कळण्यापूर्वीच जर्मनांनीं फ्रान्सची लढाई संपवून टाकली.

## सांपळ्यांचा विध्वंस

जनरल वेगां यांच्या रणगाड्यांच्या सांपळयांची वार्ता अर्थात् जर्मनीच्या सेनापतींना लागली होती. त्यामुळें या लढाईंत त्यांनीं रणगाडे पुढें न घालतां पायदळ सैन्यच पुढें घातलें, हें या लढाईचें दुसरें वैशिष्ट्य होय. पांच जूनच्या पहांटे जर्मन तोफखान्यानें आणि सूर मारणाऱ्या विमानदलानें सोम नदीवरील फ्रान्सच्या संरक्षक ठाण्यांवर प्रचंड भडिमार करून या निर्वाणीच्या लढाईला प्रारंभ केला. या उभयतांच्या माऱ्यानें फ्रेंच ठाण्यांचा पुरेसा विध्वंस झाल्यानंतर जर्मनांनीं आपलें पायदळ पुढें पाठविलें. उध्वस्त ठाणीं पायदळानें हस्तगत केल्यानंतर मागाहून जर्मन रणगाडे आपल्या दिग्विजयाला बाहेर पडले. या रणगाड्यांवर प्रतिहल्ले करणें फ्रान्सला शिलकी सैन्याच्या अभावीं अशक्यच झालें. उलट जर्मन रणगाड्यांनीं फ्रेंच तोफखान्यानें आश्रय घेतलेल्या खेड्यांचा आणि नगरांचा दारूगोळा आणि इतर सामुग्री यांचा पुरवठा तोडला. यामुळें त्या साऱ्यांना लौकरच शरण यावें लागलें. पहिल्या दिवसाच्या लढाईंत फ्रान्सच्या सोम नदीवरील आघाडीचा सपशेल विध्वंस झाला असें म्हणतां येईल.

६ जूनच्या लढाईचा भर मुख्यतः एलेत कालवा आणि एस्न नदी यांच्याकडे होता. या लढाईचा प्रारंभहि तोफखान्याच्या आणि विमानांच्या माऱ्यापासूनच झाला. पण या भागांत रणगाड्यांचे सापळे नसल्यानें पायदळाच्या ऐवजीं सहस्रावधि रणगाड्यांनींच चढाई केली आणि दुसऱ्या फ्रेंच सैन्याला एस्न नदी-पलीकडे पिटून लावलें. या एकाच चढाईत जर्मनांनीं २००० रणगाडे वापरले असें सांगतात. उत्तरेची लढाई संपतांच इतकें मोठें रणगाड्यांचें दळ दक्षिणेला इतक्या लौकर आणणें हें अर्थात् अत्यंत श्रेष्ठ अशा संघटनाकौशल्याचें लक्षण आहे.

आघाडीवरील परिस्थिति इतकी अवघड असतांनाहि या दिवशीं फ्रान्सच्या मुख्य प्रधानांनीं नभोवाणीवरून भाषण करतांना आपल्या जनतेला सांगितलें कीं लढाईच्या आतांपर्यंतच्या प्रगतीनें जनरल वेगां यांना समाधान वाटत असून आपण या भयंकर दिव्यांतून पार पडूं असा त्यांना भरंवसा वाटतो.

## फ्रेंच सैन्य वितळलें

७ जूनला जर्मनीची अधिकाधिक सेना आघाडीवर येऊं लागली. ही चढाई

चालू झाली, त्या दिवशीं बचाव करणाऱ्या फ्रेंच सैन्यापेक्षा हल्ला करणारी जर्मन सेना दहा डिव्हिजन्सनीं कमी होती. तें पारडें या वेळेपासून उलटून लढाईत भाग घेण्यासाठीं ४० ते ५० डिव्हिजन नवीन सैन्य जर्मनीनें आघाडीवर आणलें. उलटपक्षीं फ्रान्सचें सैन्य जर्मनीच्या अग्निवर्षावामुळें वितळून जाऊं लागलें. या लढाईच्या प्रारंभीं जनरल वेगां यांच्या हातीं जें ४६ डिव्हिजन सैन्य होतें, तें वितळून जाऊन १२ जूनच्या सुमाराला अवघें २४ डिव्हिजन सैन्य शिल्लक राहिलें. ही जी फ्रेंच सैन्याची हानि झाली ती संहारानें झाली नसून त्या त्या सेनाविभागाची संघटना सपशेल मोडल्यामुळें झाली होती. १९४० च्या युद्धांत जर्मनी काय आणि फ्रान्स काय या उभयतांची मनुष्यहानि अतिशय अल्प-प्रमाणांत झाली. यासाठीं जर्मनीच्या अग्निवर्षावाच्या धगीनें फ्रेंच सैन्य वितळलें, असा शब्दप्रयोग वर हेतुपुरस्सर केला आहे. प्रत्यक्ष युद्धांत युद्धपात्रिका ज्या निघत होत्या, त्यांतून अर्थात् परस्परांच्या हानीचीं अवास्तव वर्णनें भरपूर असत. उदाहरणार्थ याच लढाईतील ९ जूनच्या फ्रेंच युद्धपात्रिकेंत अशी आशादायक वार्ता प्रसिद्ध झाली कीं गेल्या पांच दिवसांच्या लढाईत सुमारें चार लक्ष जर्मन सैनिक ठार किंवा घायाळ झाले आणि त्यांच्या १००० रणगाड्यांचा विध्वंस झाला. याच दिवशीं एस्न नदी ओलांडून जर्मन सैन्य पारीसपासून ३५ मैलांवर येऊन पोंचलें. त्याच्या दुसऱ्या दिवशींच फ्रान्सच्या राजधानीच्या उपनगरांत जर्मन रणगाड्यांचा प्रवेश झाला.

## द गोल यांची संभावना

१४ जूनला जर्मनीनें पारीस व्यापल्यानंतर फ्रान्सच्या युद्धांतील दोनच घटना विशेष महत्त्वाच्या आहेत. यांपैकीं पहिली घटना म्हणजे पराजित फ्रेंच सैन्याचा जर्मनीनें विद्युत्गतीनें केलेला पाठलाग होय. पुस्तकी पंडितांची सामान्य समजूत अशी असते कीं पराजित सैन्याचा पाठलाग ही युद्धशास्त्रांतली सर्वांत सोपी गोष्ट आहे. पण जगाच्या इतिहासांत यशस्वी पाठलागांचीं उदाहरणें थोडींच सांपडतात. १९४० मधील जर्मनीनें केलेल्या फ्रेंचांच्या पाठलागाला, येनाच्या लढाईत नेपोलियननें प्रशियाचा पराजय केल्यानंतर त्याच्या घोडदळानें केलेल्या प्रशियनांच्या पाठलागाचीच उपमा साजेल. नेपोलियनच्या घोडदळापेक्षां जर्मन रणगाड्यांची गति आणि विध्वंसक्षमता अनेकपटींनीं अधिक असल्यामुळें फ्रेंच

सैन्याला उसंत अशी कोठेंच मिळाली नाहीं. या निकराच्या पाठलागामुळेंच एकंदर १९ लक्ष फ्रेंच सैनिक पकडून जर्मनांना युद्धबंदी करतां आले. दुसरी घटना म्हणजे माजिनो तटबंदीचा भेद होय. सेदांसन्निध जर्मनांनीं फ्रेंच सैन्याची फळी फोडली, ती माजिनो तटबंदीच्या बाहेर फोडल्यानें त्या तटबंदीच्या अभेद्य-पणाविषयीं फ्रेंचांच्या मनांत कांहीं अवास्तव कल्पना राहून गेल्या होत्या. त्या नष्ट करून टाकण्याकरितां पारीसच्या पाडावानंतर जर्मनांनीं अनेक ठिकाणीं माजिनो तटबंदी फ्रेंच सैन्याच्या विरोधाला न जुमानतां अवघ्या दोन दिवसांत फोडली. एबेन एमाएलचा दुर्ग जिंकतांना जर्मनीनें तटबंदी फोडण्यासाठीं ज्या साधनांचा उपयोग केला होता, त्याच साधनांचा उपयोग इथेंहि केला असल्यानें त्यांचें वेगळें वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं. या तटबंदीच्या निरुपयोगीपणाची पूर्ण कल्पना जेनेराल द गोल यांना असल्यानें त्यांनीं प्रथमपासूनच जनरल वेगां यांना तेथील सैन्य हलवून त्याचा जर्मन पाचरीवर हल्ला करण्यासाठीं उपयोग करण्याचा आग्रह चालविला होता. पण अवघ्या पन्नास वर्षांच्या सेनापतीचा उपदेश ७३ वर्षांच्या वयोवृद्ध वेगांना रुचला नाहीं आणि त्यांनीं स्वतंत्र फ्रान्सच्या भावी नेत्यांची अक्षरशः ' चूप बैस पोरा ' ( gamin ) अशी संभावना करून त्यांना गप्प बसविलें. फ्रान्सजवळ एकंदर एक सहस्र रणगाडे होते. या रणगाड्यांचें एक स्वतंत्र दळ करावें आणि त्याचा तुकड्यातुकड्यांनीं उपयोग न करतां एकाच प्रचंड आघातासाठीं उपयोग करावा, अशीहि सूचना जेनेराल द गोल यांनीं वेगांना केली होती. ही सूचना त्यांनीं मान्यहि केली. पण तिच्याप्रमाणें कृति मात्र केली नाहीं.

# : १४ :

# इटालीचे राजे आणि त्यांचे मुख्य प्रधान

महत्त्वाच्या घडामोडींचीं कारणें वैयक्तिक महत्त्वाकांक्षेत, कलहांत आणि मत्सरांत शोधण्याची मला फारशी सवय नाहीं. तरीसुद्धां दुसऱ्या महायुद्धांत इटालीनें जो इतिहास घडविला तो समजण्यासाठीं त्या देशाचे राजे आणि त्यांचे मुख्य प्रधान यांच्या परस्परसंबंधांची माहिती करून घेणें आवश्यक आहे आणि त्याकरितांच इटालीनें युद्धांत गाजविलेल्या कर्तृत्वाचें वर्णन करण्यापूर्वी थोडा पूर्वेतिहास सांगावयाचें ठरविलें आहे.

## इटालींतील अंतःकलह

पहिल्या महायुद्धांत कापोरेत्तोच्या लढाईंत जर्मनीनें इटालीचा प्रचंड पराजय करून लक्षावधि इटालियन सैनिक पकडले आणि अडीच सहस्रांवर तोफा हस्तगत केल्या. या लढाईमुळें त्या देशाचें सामरिक दौर्बल्य अँग्लोफ्रेंच राष्ट्रांना पुरतेपणीं कळून आलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, पारीस येथील संधि-परिषदेंत इटालीच्या तोंडाला पानें पुसलीं गेलीं. या घटनांमुळें इटालियन तरुणांना आपल्या दौर्बल्याची अतिशय चीड आली आणि आपल्या देशांतील नासकी निवडणुकीची पद्धति आणि तिला उत्तेजन देणारें राजघराणें यांच्यामध्यें आमूल परिवर्तन घडवून आणल्यावांचून आपला उद्धार व्हावयाचा नाहीं, असा त्यांनीं त्यांच्यापासून बोध घेतला. या चिडीमुळें आणि या विचारसरणीमुळें इटालियन तरुणांत जो क्रांतिकारक राष्ट्रीयपक्ष निर्माण झाला, त्यालाच पुढें फॅसिस्ट पक्ष हें नांव मिळालें. या पक्षाचा जन्म जरी एका जगद्विख्यात कवीच्या मेंदूतून झाला होता, तरी त्याचें नेतृत्व लौकरच सिन्योर मुस्सोलिनी या संधिसाधु पुढाऱ्यांच्याकडे आलें. फॅसिस्टपक्षाचा मूळचा कार्यक्रम आपल्या मनगटाच्या जोरावर देशांतलि सर्व सत्ता हस्तगत करण्याचा होता. पण हा मार्ग कालावधीचा आणि रक्तपाताचा असल्यानें त्या पक्षाच्या नेत्यांनीं राजपक्षाशीं तडजोड करून सत्ता संपादन करण्याच्या सोप्या मार्गाचा अवलंब केला आणि

आपल्या पक्षाच्या मूळ उद्देशाला हरताळ फासला. 'येनकेन प्रकारेण' सत्ता हातीं आल्यानंतर तिचा उपयोग करून आपण तत्काळ क्रांति घडवून आणूं, अशी सिन्योर मुस्सोलिनींना आशा वाटत होती. पण ती त्यांची आशा लौकरच विफल झाली.

## मुस्सोलिनीविरुद्ध वादळ

सिन्योर मुस्सोलिनींनीं राजपक्षाशीं जेव्हां तडजोड केली, तव्हां देशांतील सैन्यावरचा सारा अधिकार राजांच्याच हातीं ठेवण्याला त्यांनीं संमति दिली होती. त्यामुळें फॅसिस्ट पक्षाचे स्वयंसेवक आणि देशांतील सैनिक यांच्यामध्यें परस्परांविषयीं द्वेषाची भावना उत्पन्न झाली. फॅसिस्ट पक्षाचे स्वयंसेवक हे स्वतःला देशांतील क्रांतीचे संरक्षक समजून क्रांतिविरोधी पक्षांचा द्वेष करीत असत. उलटपक्षीं पिढ्यानपिढ्या ज्यांनीं राजघराण्याची सेवा केली होती, अशा अधिकाऱ्यांच्या हाताखालचे सैनिक फॅसिस्ट स्वयंसेवकांना ठग आणि पेंढारी समजून त्यांचा तिरस्कार करीत असत. अशा प्रकारें उभयपक्षांचे परस्परांशीं संबंध असल्यानें यांपैकीं एका पक्षाचा निकाल लागल्यावांचून इटाली देश सामरिकदृष्ट्या समर्थ होणें अशक्यच होतें. पण या दोन पक्षांपैकीं एकाहि पक्षाला दुसऱ्याचा कांटा काढण्याचा धीर झाला नाहीं. १९२४ मध्यें फॅसिस्ट पक्षांतील ठगांनीं इटालियन पार्लमेंटाचे एक सभासद सिन्योर मात्तेओत्ती यांना पळवून नेऊन मारून टाकून दिलें. इटालियन जनतेनें फॅसिस्ट स्वयंसेवकांचे पुष्कळ अत्याचार निमूटपणें सोसले होते. पण सामान्य जनता कोणत्या निमित्तानें बिथरते, हें शाहण्या लोकांनासुद्धां आधीं ओळखतां येत नाहीं आणि ती बिथरल्यानंतर तिला शरण जाण्यावांचून दुसरा उपायच नसतो. असाच प्रकार या प्रसंगीं घडून आला. मात्तेओत्तींच्या हत्येची वार्ता इटालियन जनतेंत पसरतांच फॅसिस्टपक्षाच्या अत्याचारांविरुद्ध एक प्रचंड वावटळच उठली आणि या वावटळींत सि. मुस्सोलिनींचें प्रधानमंत्रिपदहि पाचोळ्याप्रमाणें उडून जातें कीं काय अशी सर्वांनाच शंका येऊं लागली. पण लोकक्षोभाचा वन्हि एकदां अनावर चेतला म्हणजे तक्षकाप्रमाणेंच तो इंद्राचाहि ग्रास करावयाला चुकावयाचा नाहीं, अशी इटालीच्या राजांना भीति वाटल्यामुळें त्यांनीं त्या प्रसंगीं सिन्योर मुस्सोलिनी यांना बळी न देतां राजपक्षाकडून त्यांना शक्य तितका पाठिंबाच देवविला. या राजपक्षाच्या

पार्ठिंब्यामुळेंच मुस्सोलिनींचे परममित्र जनरल दे बोनो यांची मात्तेओत्तींच्या हत्येला उत्तेजन देण्याच्या आरोपांतून सुटका झाली आणि मुस्सोलिनींचें त्या प्रकरणांत कांहीहि अंग नव्हतें, असें सिद्ध झालें.

## प्रधानांविरुद्ध बंडाची राजांची सिद्धता

यानंतर मुस्सोलिनींनीं सैन्यावरील सर्वाधिकार आपल्या हातीं घेऊन फॅसिस्ट पक्षाच्या कार्यक्रमाप्रमाणें त्याची पुनर्घटना करण्याचा संकल्प केला. त्यांनीं स्वतः-कडे सैन्य, नौदल आणि विमानदल या साऱ्या विभागाचें प्रधानपद घेतलें आणि या साऱ्या दलांतील वरिष्ठ अधिकारी काढून टाकून त्यांच्या जागीं आपल्या विश्वासांतील व्यक्तींना नेमण्याचा प्रयत्न केला. पण राजा आणि वरिष्ठ अधिकारी यांनीं एकमतानें तो प्रयत्न हाणून पाडला. इटालीच्या राज्यघटने-प्रमाणें सेनाधिकाऱ्यांच्या नेमणुकीचा अधिकार राजाकडेच होता. पण अशा नेमणुकी करतांना प्रधानांशीं विचारविनिमय करूं नये, असें कांहीं त्या घटनेनें सांगितलें नव्हतें. तरीसुध्दां मुस्सोलिनींच्या महत्त्वाकांक्षेला आळा घालण्याचें एकमेव साधन जें सैन्य, तें सर्वस्वीं आपल्याच हातीं राहिलें पाहिजे, या इच्छेनें इटालीच्या राजांनीं जनरल बादोग्लिओंच्या साहाय्यानें आपल्या प्रधानांना विरोध केला आणि या प्रसंगीं प्रधानजींनीं आपल्याला अटक करण्याचें धाडस केलेंच तर युवराजांना लगेच बंडाचा झेंडा उभारतां यावा या हेतूनें फ्रान्सच्या सीमे-वरील सैन्याचें आधिपत्य युवराज उंबेर्तो यांच्याकडे देऊन त्यांची उत्तरेला पाठवणीहि केली. रोममध्येंहि आत्मसंरक्षणाकरितां राजवाड्याभोंवतालींच सैन्य आणून ठेविलें. यादवीयुध्दाची ही सारी सिध्दता झालेली पाहिल्यानंतर सिन्योर मुस्सोलिनींनीं आपला आग्रह सोडला आणि त्यानंतर लौकरच ते स्वतः आजा-रीहि पडले.

## मुस्सोलिनींच्या हत्येचा प्रयत्न

फॅसिस्ट पक्षाचे नेते आजारी पडलेले पाहतांच त्या पक्षाचे कार्यवाह सिन्योर फारिनाच्ची यांनीं सर्व सत्ता आपल्या हातीं येण्यासाठीं कारस्थानें आरंभिलीं. हीं कारस्थानें इतक्या थराला जाऊन पोंचलीं की सिन्योर मुस्सोलिनी हे दुखण्यां-तून उठल्यानंतर त्यांना आपला अधिकार टिकविण्यासाठीं स्वतः राजांचेंच

साहाय्य घ्यावें लागलें. तेव्हां इटालीच्या राजांनीं आपल्या वजनाचा उपयोग करून फॅसिस्ट पक्षाच्या कार्यवाहपदावरून फारिनाच्चींचें उच्चाटन घडवून आणलें आणि त्यांची जागा आपल्या एका मित्राला मिळवून दिली. त्याचप्रमाणें प्रधानमंडळांतील गृहमंत्र्याच्या पदावर सिन्योर फेदेर्झोनी या आपल्या विश्वासांतील कुटिलनीतिप्रविणांची नेमणूक केली. १९४४ मधील मुस्सोलिनींच्या अटकेंत यांनींच प्रमुख भाग घेतला असल्यामुळें यांचें नांव लक्ष्यांत ठेवणें भाग आहे. असो. यांच्याकडे गृहमंत्रिपद आल्यानंतर वर्षाच्या आंतच ३१-१०-१९२६ या दिवशीं बोलोन्या नगरांत मुस्सोलिनींच्या हत्येचा प्रयत्न झाला. या प्रकरणीं झालेल्या चौकशींत असें उघडकीला आलें कीं लोकसत्ताक पक्षाचे एक पुढारी कर्नल मारिबाल्दी यांनीं फेदेर्झोनींच्या कांहीं हस्तकांच्या साहाय्यानें या कटाची आखणी केली. या कटांत फेदेर्झोनींचें प्रत्यक्ष अंग होतें, असें सिद्ध झालें नाहीं. तरीसुद्धां फॅसिस्ट पक्षाच्या प्रक्षोभामुळें त्यांना स्थानभ्रष्ट व्हावें लागलें.

## मुस्सोलिनीविरुद्ध बादोल्लिओ

त्यानंतर पुन्हां एकदां मुस्सोलिनींना सर्वाधिकार मिळवून देण्याकरितां फॅसिस्ट पक्षानें रोमवर मोर्चा नेण्याची सिद्धता चालविली. या स्वारीला तोंड देण्याकरितां जनरल बादोल्लिओंनीं अकस्मात् सैन्याच्या चार तुकड्या रोमला आणल्या आणि राजवाड्याकडे जाणारे सारे मार्ग तोफांनीं रोखून धरले. त्यामुळें फॅसिस्ट पक्षाची रोमवरील दुसरी स्वारी होऊं शकली नाहीं. यानंतर सैन्याच्या अनधिकृत हालचाली केल्याबद्दल जनरल बादोल्लिओंना शिक्षा करण्याची मागणी मुस्सोलिनींनीं केली; पण राजांनीं त्यांना वाटाण्याच्या अक्षता दिल्या. त्यानंतर भूमिदल, नौदल आणि विमानदल या सर्वांवर एक युद्धयोजनाप्रमुख नेमण्याची मागणी मुस्सोलिनींनीं केली आणि राजांनाहि ती मान्य झाली. मात्र त्या जागेवर त्यांनीं जनरल बादोल्लिओंचीच नेमणूक केली. अगदीं अलीकडे ॲबिसीनियाच्या लढाईतसुद्धा बादोल्लिओंना सेनापतित्व मिळेपर्यंत राजपक्षीय इटालियन सैन्यानें चुकारपणा चालविलाच होता आणि जनरल दे बोनो यांना अधिकारभ्रष्ट केल्याबरोबर मात्र सारें इटालियन सैन्य खडबडून जागें झाल्याप्रमाणें कर्तव्यतत्पर झालें, हें पुष्कळांना आठवत असेल.

## जर्मनीशीं संधि

ॲबिसीनियाच्या लढाईमुळें इटाली आणि इंग्लंड यांचें वांकडें आलेलें पाहून १९३६ मध्यें जर्मनीच्या नेत्यांनीं इटालीशीं कारस्थानें आरंभिलीं आणि तीं यशस्वी होऊन इटालियन फॅसिस्ट पक्षाच्या नेत्यांनीं जर्मन नाझी पक्षाच्या अनुरोधानें आपलें धोरण ठरवावयाचें मान्य केलें. उभयपक्षीं जेव्हां हा संकेत झाला तेव्हां इटालीचें सैन्य स्पॅनिश राज्यक्रांतीच्या युद्धांत जनरल फ्रांकोच्या पक्षाकडून लढत होतें. ही लढाई चालूं असेपर्यंत इटालीला जर्मनीच्या तंत्रानें वागणें भागच होतें. तरीसुद्धां १९३८ मध्यें स्वतः हेर हिटलेर यांनीं इटालीला भेट दिली असतांनाहि इटालीच्या नेत्यांनीं जर्मनीशीं परस्परसाहाय्याचा संधि करण्याला नकारच दिला होता. पुढें झेकोस्लोव्हाकिया देश जर्मनीनें आत्मसात् केल्यानंतर इटालीनें जर्मनीशीं समान शत्रुमित्रत्वाचा संधि केला; तरीसुद्धा इटालियन सैन्याची सिद्धता झाली नसल्यानें आपल्याला तीन वर्षें तरी युद्धांत भाग घेतां येणार नाहीं असें इटालीनें जर्मनीला आगाऊच बजावून ठेविलें होतें.

फॅसिस्ट पक्षाच्या प्रमुखांचीं जर्मनीशीं चाललेलीं कारस्थानें इटालीचे राजे आणि त्यांचे विश्वासू सेनापति बादोग्लिओ यांना मान्य नव्हतीं, हें सांगावयाला नकोच. पहिल्या महायुद्धांत इटालीनें जर्मनीच्या शत्रूंचा पक्ष घेतला होता आणि इटालीचा समुद्रकिनारा अतिशय विस्तृत असल्यानें ब्रिटिशांच्या नौदलाची त्या देशाच्या अधिपतींना फार भीति होती. त्याव्यतिरिक्त एकंदरीनेंच फॅसिस्ट पक्षाचा द्वेष करणाऱ्या राजांना समानशत्रुत्वामुळें इंग्लंडविषयीं आप्तपणा वाटत होता. ही सारी परिस्थिति लक्ष्यांत घेतली म्हणजे दुसऱ्या महायुद्धांत इटालीनें प्रथमपासून भाग न घेणें स्वाभाविकच होतें, हें कळून येतें. पण १९४० च्या मेमध्यें जर्मनीनें ॲंग्लोफ्रेंचांवर मिळविलेल्या विजयानें ही सारी परिस्थिति पालटली. इटालींत राजपक्षाच्या शब्दाला मान मिळेनासा झाला. आणि फॅसिस्ट पक्षाचा जोर वाढला. इंग्लंडची भीति कमी झाली आणि फ्रान्सकडून कॉर्सिका, सॅव्हॉय, नीस, टयूनिस इत्यादि प्रांत स्वस्तांत मिळविण्याची इटालीला आशा वाटूं लागली. या सर्व कारणांमुळें पारीसच्या पाडावापूर्वी चार दिवस अगोदर इटालीनें इंग्लंड आणि फ्रान्स यांच्याविरुद्ध युद्ध पुकारलें.

## सट्टा आंगलट आला

पण अति विचार करून केलेला सट्टा अगदीं पहिल्या दिवसापासून आंगलट यावा, अशी या बाबतींत इटालीची स्थिति झाली. युद्धारंभापासूनच्या पंधर-वड्यांत इटालियन सैन्यानें फ्रान्समध्यें म्हणण्याजोगी कांहींच प्रगति केली नाहीं. लौकरच झालेल्या शस्त्रसंधीनें इटालियन सैन्यानें व्यापलेला भागच तेवढा इटालीच्या ताब्यांत दिला. त्यामुळें नीस आणि सॅव्हॉय यांसारखे इटालियन वस्तीचे परगणेहि इटालीला परत मिळाले नाहींत. मग कॉर्सिका आणि ट्यूनिस हातीं येणें तर दूरच राहिलें. खरें म्हणजे आफ्रिकेंतील उपनिवेशांच्या सुरक्षित-तेच्या दृष्टीनें विचार केला असतां इटालीनें फ्रान्सविरुद्ध युद्ध पुकारतांच ट्यूनिस व्यापण्याचा प्रयत्न करावयाला पाहिजे होता. ही बुद्धि मुस्सोलिनींना सुचली असती तर आफ्रिकेंत सैन्य उतरविण्याचा सर्वांत जवळचा मार्ग इटालीच्या ताब्यांत आला असता आणि आफ्रिकेंतील युद्धाला अगदीं निराळें वळण लागलें असतें. पण फ्रान्सच्या पाडावानंतरहि इंग्लंडशीं वर्षानुवर्षें युद्ध करावें लागेल, अशी कल्पना असती तर इटालीनें युद्धप्रवेश केला असता कीं नाहीं याची शंकाच आहे.

## ट्यूनिस न घेण्याचीं कारणें

आफ्रिकेंत इटालीला इंग्लंडशीं यशस्वी रीतीनें टक्कर देणें अशक्य आहे, याची जर्मनीच्या युद्धतज्ज्ञांना चांगली जाणीव होती. १९३७ मध्येंच जर्मन तज्ज्ञांनीं लिहिलें होतें. 'Italian sea communications to Libya can be broken at any time from the Eastern Mediterranean. Maintenance of communications, with troops in East Africa is even harder' म्हणजे लिबियाशीं इटालीचें दणळवळण इंग्लंडला पूर्व भूमध्यसमुद्रांतुन कोणत्याहि क्षणीं तोडतां येण्याजोगें होतें. पूर्व आफ्रिकेशीं दळणवळण ठेवणें तर इटालीला अशक्यच होतें. अशा परिस्थितींत इटालीनें युद्ध पुकारतांच ट्यूनिस व्यापण्याची सूचना जर्म-नीनेंच सिन्योर मुस्सोलिनींना कां केली नाहीं, तें समजत नाहीं. स्वतः इटालीला ही कल्पना कां सुचली नाहीं, याचें कारण बहुधा युरोपांतच इटालियन साम्राज्य वाढविण्याच्या सिन्योर मुस्सोलिनींच्या योजना असाव्यात. अगदीं स्पष्ट शब्दांत

बोलावयाचें म्हणजे ग्रीस देश व्यापण्याची सिन्योर मुस्सोलिनींची दुर्दैवी योजना, हेंच आफ्रिकेंतील युद्धासाठीं इटालीचें सारें सामर्थ्य एकत्रित न करण्याचें प्रमुख कारण होय. इटालीचें प्रधानपद हातीं आल्यानंतर लौकरच सिन्योर मुस्सोलिनींनीं ग्रीसशीं भांडण करून कॉर्फ्यू बेटावर भडिमार केला होता, त्याचें इथें स्मरण होतें. ग्रीसवर आक्रमण करण्याची त्यांची योजना हेर हिटलेर यांच्या इच्छेविरुद्ध होती, ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. म्हणजे अंतर्गत राजकारणांत इटालीचे राजे आणि त्यांचे प्रधान यांचें जितपत सख्य होतें, तितपतच सख्य पर-राष्ट्रीय राजकारणांत हेर हिटलेर आणि सिन्योर मुस्सोलिनी यांच्यांत होतें, असें म्हणतां येईल. इटालीला ट्यूनिस व्यापण्याची सूचना जर्मनीनें न देण्याचें हें एक महत्त्वाचें कारण असूं शकेल. या दृष्टीनें विचार केला असतां असें वाटतें कीं पहिल्या महायुद्धांतल्याप्रमाणें इटालीनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारूं नये, एवढ्या-साठींच जर्मनीनें त्या राष्ट्राला आपल्या बाजूनें युद्धांत प्रवेश करूं दिला. पण परस्परांविषयीं उभयतांना पराकाष्ठेचा अविश्वास वाटत असल्यामुळें उभयतांचें व्हावें तसें सहकार्य होऊं शकलें नाहीं. यामुळेंच इंग्लंडशीं चालू असलेल्या युद्धा-कडे दुर्लक्ष्य करून इटालीनें ग्रीसवर स्वारी केली. उलटपक्षीं इटाली आणि ग्रीस यांचें युद्ध चालूं झाल्यानंतरहि जर्मनीनें ग्रीसशीं असलेला आपला सख्यसंबंध तोडला नाहीं.

या ठिकाणीं आणखी एक कल्पना अशी सुचते कीं फ्रान्सच्या पाठोपाठ प्रत्यक्ष इंग्लंडवरच स्वारी करण्याचा जर्मनीचा संकल्प असल्यानें आफ्रिकेंतील युद्धाकडे जर्मनीच्या तज्ज्ञांनीं या वेळीं साहजिकच दुर्लक्ष्य केलें असावें. १९४० मध्यें ट्यूनिसकडे जर्मनीचें दुर्लक्ष्य होण्याचें हेंच खरें कारण असावें. तेव्हां इटालीच्या युद्धप्रवेशाचा अध्याय इथेंच संपवून आतां ब्रिटनच्या लढाईकडे वळलें पाहिजे.

: १५ :

# ब्रिटनची लढाई ?

फ्रान्सच्या पाडावानंतर जर्मनीनें इंग्लंडचें अंतरिक्ष जिंकण्याचा जो प्रयत्न केला त्याला ब्रिटनची लढाई हें नांव मिळालें आहे. हें नांव असावें तितकें अन्वर्थक नाहीं. तरीसुद्धां परंपरागत नांव सपशेल टाकून देण्यापेक्षा त्याला प्रश्न-चिन्ह जोडून मी त्याचा अंगीकार केला आहे. कारण या प्रकरणांत ब्रिटनच्या लढाईचें वर्णन येणार नसून ती लढाई कां होऊं शकली नाहीं, याचीच चिकित्सा करावयाची आहे.

## ब्रिटनशीं सख्य करण्याचा प्रयत्न

याविषयीं पहिली कल्पना अशी सुचते कीं ब्रिटनच्या लढाईत जर्मनीच्या नेत्यांचें मन नव्हतें. हेर हिटलेर यांना इंग्लंडविषयीं आदर वाटत असे आणि जागतिक राजकारणाच्या दृष्टीनें जर्मनीनें इंग्लंडला जिंकण्यापेक्षा त्या राष्ट्राशीं सख्यसंबंध जोडणेंच अधिक लाभदायक आहे, अशी त्यांची भावना होती. जर्मन सैन्यानें फ्रान्सची फळी फोडल्याक्षणापासून स्टालिनच्या चित्तांत जी चल-बिचल झाली होती, ती हेर हिटलेर यांना पुरती माहीत होती. आज नाहीं उद्यां आपल्याला रशियाशीं लढावें लागणार आहे, हें त्यांना कळून चुकलें होतें. या युद्धांत इंग्लंडचें साहाय्य मिळालें तर तें त्यांना हवें होतें. १९४१ मध्यें रशिया-विरुद्ध युद्ध पुकारण्यापूर्वी हेर हेस यांना इंग्लंडला पाठवून त्या राष्ट्राशीं तडजोड करण्याचा निर्वाणीचा प्रयत्नहि त्यांनीं करून पाहिला. या सर्व घटनांवरून असें स्पष्ट दिसतें कीं इंग्लंडांत ज्या मानानें जर्मनीचा द्वेष फैलावला होता, त्या मानानें जर्मनींत इंग्लंडचा द्वेष फैलावला नव्हता आणि आपल्यावरून जगाची परीक्षा करण्याच्या सवयीमुळें जर्मनांना ब्रिटिशांच्या जर्मनद्वेषाच्या तीव्रतेची यथार्थ कल्पनाच झाली नव्हती. यामुळें जर्मनीनें इंग्लंडवर मुख्यतः दडपण आणण्याचा प्रयत्न केला, इंग्लंड जिंकण्याचा प्रयत्न मनापासून केलाच नाहीं, अशी निदान माझी तरी समजूत झाली आहे.

## पिछाडीवर रशियाचें भय

जर्मनीनें इंग्लंडांत सैन्य न उतरविण्याचें दुसरें कारण म्हणजे रशियाच्या अचानक हल्ल्याची भीति हेंहि असूं शकेल. रशिया आणि जर्मनी या उभयतांनीं पोलंड देश वांटून घेतल्यानंतर या दोन देशांच्या सीमा पुनश्च एकवार एकमेकांना भिडल्या आणि तेव्हांपासून परस्परांना परस्परांच्या आक्रमणाचें भय वाटूं लागलें. जर्मनीचें हें भय दूर करण्याकरितां फिन्लंडच्या युद्धांत रशियानें बुद्धिपुरस्सर प्रथम प्रथम फिनिश सैन्याकडून आपल्या सैन्याचे पराजय होऊं दिले. रशियन युद्धयंत्राच्या दौर्बल्याच्या या प्रकट प्रदर्शनानें धीर चेपल्यामुळेंच जर्मनीनें १९४० च्या पूर्वार्धांत फ्रान्सवर स्वारी करून तो देश पूर्णपणें जिंकून टाकला. पण फ्रान्सचा पाडाव जर्मनीनें अपेक्षेपेक्षा फारच लौकर केल्यानें रशियाला जर्मनीचें अधिकच भय वाटूं लागलें आणि जर्मनीनें आपल्या सर्व सामर्थ्यानिशीं इंग्लंडवर स्वारी केल्यास इंग्लंडचा नायनाट होईपर्यंत रशिया दम धरणार नाहीं, अशीं स्पष्ट लक्षणें दिसूं लागलीं. "फ्रान्सच्या पाडावानंतर इंग्लंड सर्वस्वीं असहाय आणि अगतिक झालें असतांनासुद्धां जर्मनीनें आमच्यावर स्वारी कां केली नाहीं, हें मला कळत नाहीं;' असे उद्गार मि. चर्चिल यांनीं पुढें एका प्रसंगीं प्रकटपणें काढले होते. हें न कळणारें कारण रशियाच्या अचानक आक्रमणाची भीति हेंच असण्याचा संभव बराच आहे.

## छत्रीधारी सैनिकांचा अभाव

फ्रेंचांच्या पराजयानंतर त्यांचें नौदल जर्मनांच्या हातीं लागलें असतें तर कदाचित् इंग्लंडांत सैन्य उतरविण्याचा प्रयत्नहि झाला असता. पण ती संधि जर्मनीला लाभलीच नाहीं. पण जलमार्गानें इंग्लडवर स्वारी करण्याच्या प्रश्नावरून एका जुन्या गोष्टीची आठवण मला झाली आहे. तिचा उल्लेख केल्यावांचून पुढें जातां येत नाहीं. एका जर्मन युद्धतज्ज्ञानें पूर्वी एकदां अशी सूचना केली होती कीं जर्मनीनें निःशंक मनानें जलमार्गानें इंग्लंडवर सैन्य धाडावें आणि त्या सैन्याची ब्रिटिश नौदलाशीं गांठ पडलीच तर त्यानें लगेच श्वेतध्वज उभारून शत्रूला शरण जावें. इंग्लंड हें सुधारलेलें राष्ट्र असल्यानें शरणागतीचा ध्वज दाखविल्यानंतर त्याला आक्रमण करून येणाऱ्या जर्मनांना बुडवून टाकतां येणार नाहीं आणि लाख, दोन लाख सैनिक शत्रूच्या अटकेंत पडल्यानें जर्मन सैन्याचें

सामर्थ्य कांहीं फारसें कमी होणार नाहीं. उलटपक्षीं इतके सैनिक इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरले आणि त्यांनीं तिथें पाय रोवला तर मागाहून कसेंहि करून त्यांना साहाय्य धाडतां येईल. या सूचनेचा दुसऱ्या महायुद्धांतील जर्मन युद्ध-श्रेष्ठींनीं विचार केला होता कीं नाहीं, तें कळत नाहीं. या सूचनेपेक्षां इंग्लंडांत आकाशांतून सैन्य कां उतरविलें नाहीं, हा प्रश्न अधिक महत्त्वाचा आहे. याचें एक उत्तर असें असूं शकेल कीं नॉर्वे, हॉलंड, बेल्जम आणि फ्रान्स हे सारे देश जिंकतांना छत्रीधारी सैन्याचा सढळ हातानें उपयोग केल्यामुळें त्या सैन्याची मोठ्या प्रमाणावर हानि झाली असावी आणि त्यामुळें फ्रान्सची लढाई संपतांच इंग्लंडांत उतरविण्याइतकें छत्रीधारी सैन्य उरलेंच नसावें. इतकेंच काय पण युद्धाच्या पहिल्या वर्षी या छत्रीधारी सैन्याची कल्पना प्रयोगावस्थेंतच असल्यानें जर्मनीनेंसुद्धां तें दल मोठ्या प्रमाणावर तेव्हां उभारलेंहि नसेल. इंग्लंडांत छत्रीधारी सैनिक उतरावेण्याचें ठरविल्यास ते मोठ्या प्रमाणावर उतरविले पाहि-जेत, ही गोष्ट उघड आहे. फ्रान्सच्या लढाईनंतर इंग्लंडजवळ तोफा आणि रणगाडे फारसे उरले नसले तरी सुमारें १५ लक्ष सैनिक तर होतेच आणि या सैनिकांनीं हातीं लागतील त्या क्षुद्र शस्त्रांनिशीं स्वदेश संभाळण्याची पराकाष्ठा केली असती याविषयीं संशय नाहीं. या सैनिकांपासून आपण उतरविलेल्या छत्रीधारी सैनिकांचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य जर्मन विमानदलाच्या अंगीं असतें तर जर्मनीनें क्रीटप्रमाणें इंग्लंडवरहि आकाशमार्गानें स्वारी करण्याचा प्रयोग करून पाहिला असता. पण १९४१ मध्यें क्रीटच्या अंतरिक्षावर जसें जर्मन विमानदलाला आपलें प्रभुत्व प्रस्थापित करतां आलें, तसें १९४० मध्यें इंग्लंडच्या अंतरिक्षावर करतां आलें नाहीं. यामुळें इंग्लंडवर आकाशमार्गानें स्वारी करतां आली नाहीं.

## परस्परांच्या हानीची तुलना

इंग्लंडच्या अंतरिक्षयुद्धांत जर्मनीचा पराभव झाला असला तरी जर्मनीची ती सारी चढाई सपशेल वायां गेली असें समजण्याचें कारण नाहीं. ८ ऑगस्टला जर्मनीच्या वैमानिक चढाईचा प्रारंभ झाला. तेव्हांपासून ऑक्टोबरच्या अंता-पर्यंत जर्मनीचीं एकंदर २३७५ विमानें आपण पाडलीं, असें ब्रिटिश वैमानिक-दलाचें म्हणणें आहे. या अवधींत एकंदर ब्रिटिश विमानें कितीं पडलीं, याचा

नक्की आंकडा मिळत नाहीं. ऑगस्ट आणि सप्टेंबर या दोन महिन्यांचे त्रुटित आंकडे एकत्रित केले तर त्या अवधींत निदान ६८२ ब्रिटिश विमानें पडलीं असें कळून येतें. या तीन महिन्यांच्या आकाशयुद्धांत ३७५ ब्रिटिश वैमानिक ठार आणि ३५८ घायाळ झाले असें सरकारीरीत्या प्रसिद्ध झालें आहे. यावरून या अवधींत ७३३ हून अधिक ब्रिटिश विमानें पडलीं असावींत असें अनुमान निघतें. कारण इंग्रजांच्या लढाऊ विमानांतून एकच वैमानिक असे. लढाईत विमान पडलें तरी छत्रीच्या साहाय्यानें पुष्कळदां वैमानिकांना आपले प्राण वाचवितां येतात. उदाहरणार्थ, अठरा ऑगस्टपर्यंतच्या दहा दिवसांत इंग्लंडचीं १५३ विमानें पडलीं. पण यांपैकीं सुमारें ७० वैमानिक सुरक्षित राहिले. एके दिवशीं तर इंग्लंडचीं ३७ विमानें पडलीं. पण त्यांतले अर्ध्याहून अधिक वैमानिक सुरक्षित होते. सप्टेंबरमध्यें इंग्लंडचीं ३२० विमानें पडलीं, पण त्यांपैकीं निदान एक तृतीयांश वैमानिक सुरक्षित राहिले. या आंकड्यांवरून विचार केला असतां जर्मनीच्या अर्ध्यानें तरी इंग्लंडची विमानहानि झाली असावी असें वाटतें. विमानयुद्धांत चढाई करणाऱ्या पक्षाची हानि शत्रूच्या दुप्पट होणें साहजिक आहे.

## जर्मन विमानदलाचा पराजय

जर्मनीची इंग्लंडवरील वैमानिक स्वारी चालूं होण्यापूर्वी ब्रिटिश विमानें नित्य नेमानें जर्मन नगरांवर हल्ले करून युद्धोपयोगी कारखान्यांची मोडतोड आणि नागरिकांची हत्या करीत असत. पण जर्मन स्वारीच्या प्रारंभापासून हा सारा उपद्रव थांबला आणि ब्रिटिश वैमानिकदलाला स्वदेशाचें संरक्षण करतां करतां पुरेवाट झाली. ब्रिटनवरील वैमानिक स्वारीमुळें जर्मनीवरील इंग्लंडचे हल्ले थांबले, हा लाभ कांहीं सामान्य नव्हता. पण अशा व्यवहारी दृष्टीनें त्या वेळीं या आकाशयुद्धाचा कोणींच विचार केला नाहीं. कारण जर्मन विमानदलाच्या हल्ल्यांपुढें ब्रिटनचा मुळींच निभाव लागणार नाहीं, अशी एका पक्षाला आशा आणि दुसऱ्या पक्षाला भीति वाटत होती. यामुळें ब्रिटिश विमानदलाला आपल्या देशाचें अंतरिक्ष संभाळतां आलें, हा जर्मनीचा मोठाच पराजय मानला गेला. कारण इंग्लंडवर विजय न मिळाल्यास जर्मनीचे तोंपर्यंतचे सारे विजय वाया जाण्याचा संभव होता. ही विचारसरणी बरोबर होती, याविषयीं शंका नाहीं.

इंग्लंडच्या या विजयाचें मुख्य श्रेय त्या वेळीं नवीनच शोधलेल्या 'रडार' या यंत्राला दिलें पाहिजे. या यंत्रानें जर्मन विमानें ब्रिटनच्या किनाऱ्याकडे येऊं लागतांच इंग्लंडच्या पाहरेकऱ्यांना त्यांच्या आगमनाची वार्ता मिळे. यामुळें आपल्या लक्ष्यांवर अचानक हल्ला करण्याची संधि जर्मन विमानदलाला केव्हांच मिळाली नाहीं. युरोपखंडांत जर्मनीच्या विमानदलाला जे जय मिळाले, ते मुख्यतः अचानक छापा घालण्यांत यश आल्यामुळेंच लाभले होते, हें लक्ष्यांत घेतलें म्हणजे या नव्या शोधानें जर्मनीची किती हानि झाली असेल, याची कल्पना येते.

## विमानहल्ल्यांतील परिवर्तनें

असो, जर्मनीनें इंग्लंडवर वैमानिक हल्ले आरंभिले, ते अगदीं समुद्रापासून आरंभिले. पहिल्या प्रथम त्यांनीं इंग्लिश खाडींतून टोळयाटोळयांनीं फिरणाऱ्या ब्रिटिशांच्या व्यापारी नौकांवर बाँबवृष्टि करून त्यांना उधळून देण्याचा प्रयत्न केला. या व्यापारी नौका कित्येकदां उधळून दिल्यानंतर जर्मनांनीं इंग्लंडच्या बंदरांवर, विशेषतः दक्षिणेकडील बंदरांवर बाँबवृष्टि आरंभिली. प्रथम त्यांनीं पोर्टलंड आणि वेमाउथ या बंदरांचा अंशतः विध्वंस केला. त्यानंतर त्यांची संक्रांत डोव्हर, पोर्ट्समाउथ आणि वाइटद्वीप यांच्याकडे वळली. पोर्ट्समाउथ-वर जर्मनांनीं १५ ऑगस्टपर्यंत दोनचार हल्ले केले. या हल्ल्यांत इंग्लंडच्या लढाऊ विमानांकडून आपल्या बाँबफेक्या विमानांना बराच उपद्रव होतो, असें पाहून त्यांनीं दक्षिण इंग्लंडांतील विमानतळांवर बाँबवृष्टि आरंभिली. या हल्ल्यांत डोव्हर, डील, हॉकिंग, मार्टेल्सहॅम, मिडल वॅलोप, केनले इत्यादि विमानतळांचा विध्वंस झाला. लंडनच्या विमानतळांवरहि या दिवसांत थोडी बाँबफेक झाली. यांच्या पाठोपाठ रोचेस्टर, मॅन्स्टन, गॉस्पोर्ट, क्रॉयडन, टँगमोर, नॉर्थहोल्ट या साऱ्या विमानतळांवर हल्ले झाले. हे सारे हल्ले दिवसाढवळ्या होत होते आणि त्यांत जर्मन विमानदलाची हानिहि फार होत होती. या स्वारीच्या प्रारंभापासून १८ ऑगस्टपर्यंत जर्मनीचीं सुमारें ७०० आणि इंग्लंडचीं १५० विमानें पडलीं.

बंदरें आणि किनाऱ्याजवळचे विमानतळ यांच्यावरील हल्ले दहा दिवसांनंतर जर्मनीनें थांबविले आणि पुढें पांच दिवस इंग्लंडच्या अंतर्भागांत टेहेळणी केली. त्यानंतर पुन्हा बंदरांवरील हल्ले चालूं झाले, पण त्याबरोबरच अंतर्भागांतील

विमानतळांवरहि बॉंबवृष्टि होऊं लागली. या वेळीं साउथँप्टन, फोकस्टोन, डोव्हर, थेम्सनदीचें मुख या समुद्रतीरावरील भागांत आणि एसेक्स, केंटप्रभृति परगण्यांत जर्मनांनीं बरीच हानि केली. या साऱ्या हल्ल्यांमुळें इंग्लंडच्या आघाडीच्या विमानदलाची कार्यक्षमता पुष्कळशी कमी झाली. पण लंडनच्या दक्षिणेचे विमानतळ पूर्णपणें निकामी करून टाकण्याचा जर्मनांचा हेतु साध्य झाला नाहीं. तरीसुद्धां ७ सप्टेंबरपासून जर्मनीनें विमानतळांचा पिच्छा पुरविण्याचें सोडून इतःपर औद्योगिक केंद्रांचा विध्वंस करण्याकडे लक्ष्य वळविलें.

## लंडनवरील आकाशयुद्ध

६ सप्टेंबरला जर्मनांनीं लंडनच्या दक्षिणेकडील विमानतलांवर अहोरात्र सतत बॉंबवर्षाव करून ७ सप्टेंबरला लंडनवर मोठ्या प्रमाणावरील पहिला हल्ला केला. लंडनवर येणाऱ्या जर्मन विमानांना ब्रिटिश लढाऊ विमानांनीं केंट परगण्यांतच अडविलें. पण त्यांची फळी फोडून शेंकडों जर्मन विमानें लंडनला पोंचलीं आणि त्यांनीं तेथील गोदीविभागावर आणि वुलविच येथील युद्धोपयोगी कारखान्यांवर बॉंबवृष्टि केली. याच दिवशीं लंडनच्या गॅस आणि वीज कारखान्यांची आणि आगगाड्यांचीहि मोठ्या प्रमाणावर मोडतोड झाली. या चढाईत जर्मनीचीं १०३ विमानें पडलीं. तरीहि जर्मनीचे हल्ले तसेच निकरानें चालू राहिले. १५ सप्टेंबरला तर ५०० जर्मन विमानें इंग्लंडवरील स्वारीसाठी पुढें सरसावलीं आणि त्यांपैकीं १८५ विमानें जर्मनीला परत पोंचूं शकलीं नाहींत. ६ सप्टेंबरपासून ५ ऑक्टोबरपर्यंतच्या एका महिन्यांत जर्मनीचीं एकंदर ८८३ विमानें निकामी झाली. या अवधींत जर्मनांनीं सुमारें ३५ मोठे हल्ले लंडनवर चढविले. या हल्ल्यांत प्रथम बॉंबफेकी विमानें आणि लढाऊ विमानें जवळ जवळ सारखींच असत. पण पुढें लढाऊ विमानांचें प्रमाण बॉंबफेक्यांच्या चौपट झालें तरीहि जर्मनीच्या विमानहानीचें प्रमाण पूर्ववतच राहिलें. पुष्कळदां ब्रिटिश लढाऊ विमानांची गांठ पडल्यावर जर्मनीचीं बॉंबफेकी विमानें आपले बॉंब वापरून टाकण्याची घाई करीत आणि त्यामुळें निवडलेल्या लक्ष्याऐवजीं भलत्याच स्थळांचा विध्वंस होई. पण जर्मनीचे हे सारे हल्ले दिवसाच होत असल्यानें शक्य तोंपर्यंत केवळ नागरिक वस्तीवर बॉंबवृष्टि न करण्याचा नियम पाळला जात असे. इंग्लंडच्या युद्धविभागानें प्रसिद्ध केलेल्या 'The battle of Britain' या

पत्रकाच्या आधारानेंच मी वरील विधान केलें आहे. सप्टेंबरमधील बॉंबवृष्टींत लंडन येथील भारतीय विद्यार्थिवसतिगृहावरहि एकदा बॉंब पडला होता आणि कांहीं विद्यार्थी दगावले होते. त्या वेळीं तिथें असलेले कराचीचे श्री. नव्हानी हे त्यानंतर मला भेटले होते आणि त्यांच्याकडून तेथील बॉंबहल्ल्यांची कहाणी मला ऐकायला मिळाली होती.

## वैमानिक युद्धाचें शेपूट

ऑक्टोबरच्या दुसऱ्या आठवड्यापासून मात्र दिवसाच्या हल्ल्यांतून होणारी विमानहानि असह्य होऊन जर्मनांनीं रात्रीच्या हल्ल्यांना प्रारंभ केला. या हल्ल्यांसाठीं केवळ लढाऊ विमानेंच पाठविलीं जात. त्यामुळें लंडनवर होणाऱ्या बॉंबवृष्टीचें प्रमाण अगदींच कमी झालें. या ठिकाणीं ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं जर्मनीचीं बॉंबफेकी विमानें हीं सामान्यतः लहान असत. ब्रिटिशांच्या लँकॅस्टर आणि हॅलिफाक्स यांच्या किंवा अमेरिकेच्या उडत्या किल्ल्यांच्या आणि सवाई उडत्या किल्ल्यांच्या मानानें त्यांना अगदीं थोड्या वजनाचे बॉंब वाहून नेतां येत असत आणि त्यामुळें त्यांच्या हल्ल्यानें होणारी हानि बेताचीच असे. तीं वापरण्याचें थांबविल्यानंतर नुसत्या लढाऊ विमानांच्या द्वारा इंग्लंडची विशेषशी हानि होण्याचें भय नव्हतेंच. त्यांचा उपयोग केवळ शत्रूला उपद्रव देण्यापुरताच मर्यादित होता. मात्र या रात्रीच्या बॉंबवृष्टीवर नैतिक दृष्ट्या टीका करण्याचें कांहींच कारण नाहीं. इंग्लंडच्या वैमानिक दलाचा सारा भर रात्रीच्या हल्ल्यांवरच होता. जर्मन विमानांनीं इंग्लंडवर पहिला अंधारांतील घाव घालण्यापूर्वी ब्रिटिश विमानांनीं जर्मनीवर निदान १००० रात्रीचे हल्ले केले होते. या साऱ्या हल्ल्यांनीं जर्मन बायकापोरें मरत नव्हतीं, असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. जर्मन विमानांच्या आक्रमणानें इंग्लंडांतील सरासरी १०००० लोक ठार आणि २०००० घायाळ झाले असावेत.

हे हल्ले थांबले त्यावेळेपर्यंत जर्मनांची विमानहानि फार मोठ्या प्रमाणावर झाली असावी, असा इंग्लिशांचा अंदाज आहे. त्यांच्या कल्पनेप्रमाणें युद्धाच्या पहिल्या वर्षांत जर्मनांची विमानहानि ६५०० वर झाली असावी. यांपैकीं ५५०० वर विमानें आपणच पाडलीं, असें ते म्हणतात. यांतलीं अर्धीं फ्रान्सच्या लढाईंत आणि उरलेलीं अर्धीं इंग्लंडच्या लढाईंत कामास आलीं; बाकीचीं फ्रेंच

डच, बेलिजयन, पोलिशप्रभृति वैमानिकांच्या वांट्याला आलीं असावींत, असा त्यांचा हिशोब आहे. या आंकड्यांच्या सत्यासत्यतेची चिकित्सा दुसऱ्या पक्षाच्या माहितीच्या अभावीं आज करणें अशक्य आहे. कारण जर्मनीनें इंग्लंडवरील विमानहल्ले जे थांबविले, ते विमानहानीला भिऊन थांबविले असण्यापेक्षां भावी रशियन युद्धाच्या सिद्धतेकरितां स्थगित केले असण्याचाहि संभव आहे.

## अमेरिकेचें अमूल्य साहाय्य

ब्रिटनच्या लढाईत इंग्लंडला अमेरिकेचें अमूल्य साहाय्य झालें असल्यानें युद्धारंभापासून प्रे. रूझव्हेल्ट यांच्या सरकारानें ब्रिटिश सरकारला कसकसें साहाय्य केलें याचा आढावा याच वेळीं घेणें सोयीचें होईल. पहिल्या महायुद्धानंतर पुनश्च युरोपांतील भानगडींत न पडण्याचा अमेरिकेचा अगदीं निश्चय झाला होता आणि या निश्चयापासून ढळण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून अमेरिकेच्या विधिमंडळांनीं लढणाऱ्या राष्ट्रांना युद्धसामुग्री न विकण्याचासुद्धां निर्बंध आपल्या सरकारावर आणि नागरिकांवर घातला होता. पण पहिल्या पत्नीच्या मृत्यूनंतर आलेलें स्मशानवैराग्य ज्याप्रमाणें मुली सांगून येऊं लागल्यावर लटपटावें, त्याप्रमाणें या निर्बंधाची अवस्था झाली. युध्दारंभाबरोबर युध्दसामुग्री न विकण्याचा निर्बंध लगेच व्यवहारांत आला. पण पुढें दोन महिन्यांतच तो शिथिल होऊन जीं सरकारें रोख मूल्य देऊन आणि स्वतःच्या नौकांतून अमेरिकेहून शस्त्रसामुग्री नेतील, त्यांना ती नेण्याची अनुज्ञा असावी, असें ठरविण्यांत आलें. या अनुज्ञेप्रमाणें एकट्या ब्रिटिश साम्राज्यानें महायुध्दाच्या पहिल्या सोळा महिन्यांत सरासरी ४५० कोटि डॉलर मूल्याची युद्धसामुग्री विकत घेतली. या युद्धसामुग्रींत विमानांचें प्रमाण पुष्कळच होतें, हें सांगायला नकोच. युध्दाच्या पहिल्या वर्षांत अमेरिकेनें इंग्लंड आणि फ्रान्स यांना मिळून सुमारें २४०० विमानें पुरविलीं. १९४० च्या सप्टेंबरमध्यें मात्र अमेरिकेला १३६ च विमानें इंग्लंडला पोंचवितां आलीं. त्याच्या पुढच्या तिमाहींत अमेरिकेकडून इंग्लंडला ९०० विमानें मिळालीं. यानंतर लौकरच प्रे. रूझव्हेल्ट यांनीं अधिक नेट लावल्यामुळें अमेरिकेकडून ब्रिटिश साम्राज्याला प्रत्येक महिन्याला ६०० विमानें मिळूं लागलीं. विमानांच्या प्रमाणेंच इतर युध्दसामुग्रीचाहि धबधबा अमेरिकेहून इंग्लंडकडे

चालला होता. उदाहरणार्थ, १९४० च्या ऑगस्ट महिन्यांतच अमेरिकेनें इंग्लंडला ८९५ तोफा, ८॥ लक्ष बंदुका आणि ११०००० यांत्रिक तोफा पुरविल्या. याव्यतिरिक्त अमेरिकन सरकारनें इंग्लंडला ४९ व्यापारी नौका विकल्या आणि तेथील व्यापाऱ्यांनींहि १४६ नौकांची विक्री केली. इंग्लंडला नौका पाठविण्याचा दुसरा एक उपाय तेव्हां योजण्यांत येत असे. तो म्हणजे अमेरिकेच्या नौका पनामाच्या सरकाराला भाड्यानें देणें आणि त्या सरकाराकडून त्या इंग्लंडला पोंचत्या करणें, हा होय. या साऱ्या मार्गांनी अमेरिकेकडून इंग्लंडला सहा लक्षांहून अधिक टनांच्या व्यापारी नौका मिळाल्या. अमेरिकेकडून इंग्लंडला एवढ्या अफाट प्रमाणावर साहाय्य झालें नसतें तर १९४० मध्यें इंग्लंडचा निभाव लागला नसता, हें निश्चित आहे.

असो, आकाशयुद्धाच्या बरोबरच जर्मनीनें इंग्लंडच्या जलमार्गावरहि चढाई आरंभिली होती. युद्धारंभापासूनच जर्मन पाणबुड्यांनीं ब्रिटिशांच्या समुद्रावरील वाहतुकीचे मार्ग रोखून महासागरांतील मत्स्यराजांना ब्रिटिश व्यापारी नौकांच्या लोहाचें खाद्य पुरविण्याचा नवीन उद्योग आरंभिला होता. या पाणबुड्यांना लौकरच लोहचुंबकाच्या गुणधर्मांच्या पाणसुरुंगांची जोड मिळाली. तरीसुद्धां पहिल्या महायुद्धांतील अनुभवानें शहाणपणा शिकलेल्या इंग्लंडची म्हणण्यासारखी हानि होईना आणि या अल्पस्वल्प हानीकरितां जर्मन पाणबुड्यांचे आणि विशेषतः त्यांवरील तज्ज्ञ नाविकांचे बळीहि मोठ्या प्रमाणावर द्यावे लागत. युद्धारंभापासूनच्या पहिल्या नऊ महिन्यांत इंग्लंडच्या सुमारें सात लक्ष टनांच्या नौका बुडाल्या असाव्यात. पण फ्रान्सच्या पाडावानंतर एका जून महिन्यांतच चार लक्ष टनांच्या नौका रसातळाला गेल्या. फ्रान्स जर्मनीला शरण गेल्यानंतर नौकानयनाच्या बाबतींत इंग्लंडची फारच दैना झाली. पहिल्या महायुद्धांत इटाली, फ्रान्स, अमेरिका इत्यादि राष्ट्रांच्या व्यापारी नौकांचा इंग्लंडला उपयोग होत होता. पण दुसऱ्या महायुद्धांत इटाली शत्रुपक्षाला मिळाला आणि फ्रान्स शत्रूला शरण गेला. इकडे अमेरिकेनें लढणाऱ्या राष्ट्रांकडे आपल्या व्यापारी नौका न धाडण्याचा निर्बंध स्वतःवर घालून घेतला होता. त्यामुळें इंग्लंडला स्वतःच्या दीड कोटि आणि नॉर्वेहॉलंड यांच्या अर्धाकोटि टनांच्या नौकांवरच निर्वाह करण्याची पाळी आली होती. पुन्हा पहिल्या महायुद्धांत जर्मन पाणबुड्यांना अटलांटिक महासागरांत प्रवेश मिळावावयाचा असल्यास स्कॉटलंडच्या उत्तरेकडून अटलांटिक

महासागराकडे जावें लागे. तीहि अडचण दुसऱ्या महायुद्धांत दूर झाली होती. कारण पिरिनीज पर्वतापर्यंतचा अटलांटिक महासागराचा किनारा जर्मनांच्या हातीं आल्यानें त्यांना त्या किनाऱ्यावरच आपल्या पाणबुड्यांचे तळ प्रस्थापित करतां आले. बरें, फ्रान्सच्या पाडावाच्या पूर्वी फ्रेंच नौदल सागरावर पहारा करून जर्मन पाणबुड्या बुडविण्याचें कार्य करीत असे. पण फ्रान्सच्या शरणागतीनंतर तें नौदलहि घरीं बसलें. इंग्लिश खाडीचा किनारा जर्मनांच्या हातीं आल्यापासून खाडींतील वाहतुकीवर जर्मन विमानांचे हल्ले होऊं लागले. या साऱ्या अडचणींमुळें ब्रिटानियासारख्या सागरस्वामिनीला आपलें मरणहि पाण्यांतच आहे कीं काय, अशी चिंता उत्पन्न झाली. पण या साऱ्या संकटांना मि. चर्चिल यांच्या नेतृत्वाखाली इंग्लंडनें मोठ्या धीरानें तोंड दिलें.

## सम्नर वेलिसचा अभिप्राय

यावेळीं इंग्लंडवर केवढें भीषण संकट ओढवलें होतें, याची यथार्थ कल्पना प्रे. रूझव्हेल्ट यांचे वैयक्तिक प्रतिनिधि मि. सम्नर वेलिस यांच्या The time for decision या नामांकित ग्रंथांतील पुढील उताऱ्यावरून येते. ते म्हणतात, 'By midsummer of 1940 the German submarine menace in the north Atlantic had reached a desperately dangerous point. The inroads made on British convoys were disastrous and it was far from certain that the British Government could mantain even the food stocks needed for civilian and military consumption at the minimum basis required for security. British armaments were almost at zero level. British destroyers which were the key to the convoy problem, were being sunk at an alarming rate. The prospects during July for a German victory appeared to be almost conclusive.' या उताऱ्यावरून इंग्लंड तेव्हां किती मरणासन्न झालें होतें, हें जसें ठसठशीतपणें व्यक्त होतें, तसें मराठींतील विवेचनानें व्हावयाचें नाहीं. यासाठीं या उताऱ्याचें भाषांतर

करण्याच्या भानगडींत मी पडत नाहीं. या पाणबुड्यांच्या संकटाला तोंड देण्याकरितां इंग्लंडनें अमेरिकेकडे विनाशिकांची मागणी केली. तटस्थतेच्या निर्बंधांमुळे खरें म्हणजे अमेरिकेला या विनाशिका देतां येत नव्हत्या. तरीसुद्धां त्यांतून पळवाटा शोधून प्रे. रूझव्हेल्ट यांनीं इंग्लंडला त्या विनाशिका दिल्या आणि त्यांच्या विनिमयांत अमेरिका खंडांतील ब्रिटनच्या नाविक आणि वैमानिक तळांचा उपयोग करण्याची, किंबहुना त्या भागांत नवे तळ बांधण्याचीसुध्दां अनुज्ञा मिळविली. ' Half a continent bartered away for fifty old scrap destroyers, ' हें जर्मन नभोवाणीवरचें तेव्हांचें ध्रुपद अजूनहि अनेकांच्या कानांत घुमत असेल.

## व्यापारी नौकांवर तिहेरी हल्ला

पहिल्या महायुद्धांत जर्मन पाणबुड्यांना विमानांच्या टेहेळणीचा लाभ मिळत नसे. तो दुसऱ्या महायुद्धांत मिळूं लागला. जर्मनीचीं सागरगामी विमानें दूरवर टेहेळणी करून आपल्या पाणबुड्यांना नभोवाणीमधून संदेश पाठवीत आणि त्या संदेशांतील माहितीचा सदुपयोग करून जर्मन पाणबुड्या इंग्लंडच्या व्यापारी नौकांना रसातळाला पोंचवीत. शक्य झाल्यास ही टेहळणीचीं विमानेंहि नौकांवर हल्ले करीत. याव्यतिरिक्त जर्मनीच्या शार्नहॉर्स्ट आणि ग्नाइस्सेनाउ यांसारख्या युद्धनौकाहि मधून मधून अटलांटिकच्या प्रवासाला बाहेर पडून इंग्लंडच्या व्यापारी नौकांचा समाचार घेत. केव्हां केव्हां समुद्रसपाटीवरून हल्ला करणाऱ्या युद्धनौका, पाण्याच्या आंतून पाणतीर मारणाऱ्या पाणबुड्या आणि विमानें या तीनहि साधनांनीं बुडविलेल्या ब्रिटिश युद्धनौकांची संख्या सारखीच भरे उदाहरणार्थ, १९४१ मध्यें फेब्रुवारींतील एका आठवड्यांत पाणबुड्यांकडून ३५०००, युध्दनौकांकडून ४०००० आणि विमानांकडून ४४००० टनांच्या ब्रिटिश व्यापारी नौका बुडविल्या गेल्या. पण सामान्यतः पाणबुड्यांकडूनच इंग्लंडच्या व्यापारी नौकांना विशेष भय असे. या पाणबुड्यांच्या युध्दाविषयीं अधिक माहिती पुढें लिहावी लागेल.

## नौदलांमधील युद्ध

आतांपर्यंत इंग्लंड आणि जर्मनी यांच्या नौदलांमधील युद्धाची माहिती

देण्याला सवडच झाली नाहीं. ती माहिती इथेंच लिहिणें सोयीचें होईल. दुसऱ्या महायुद्धाची सिद्धता करतांना जर्मनीनें शत्रूंच्या व्यापारी नौका बुडविण्यासाठीं मोठ्या युध्दनौकांची एक छोटी आवृत्ति काढली होती. या छोट्या युध्दनौकांचा वेग अँग्लो-फ्रेंचांच्या युध्दनौकांहून अधिक होता आणि त्यांच्यावरील तोफा प्रहरी नौकांवरील तोफांपेक्षां मोठ्या होत्या. यामुळें शत्रूच्या नौदलाचें भय न बाळगतां त्यांना व्यापारी नौका बुडविण्याचें कार्य करतां येईल अशी सर्वांची समजूत होती. पण या छोट्या युध्दनौका अवघ्या १०००० टनांच्या असल्यानें त्यांचें चिलखत अगदीं लहान म्हणजे सहा इंची तोफांच्या माऱ्यालासुध्दां टिकण्याजोगें नव्हतें; त्यामुळें या छोट्या युध्दनौकांकडून नांव घेण्याजोगी कांहींच कामगिरी झाली नाहीं. यांच्यापैकीं डायशलांड या युध्दनौकेनें ब्रिटिशांनीं उतारूंच्या नौकेची युध्दनोका बनविलेली रावळपिंडी २३-११-१९३९ या दिवशीं बुडविली. या व्यतिरिक्त कोणताहि महत्त्वाचा पराक्रम तिच्याकडून झाला नाहीं. तिच्याच जातीची दुसरी युद्धनौका ॲडामिरल ग्राफ स्पे ही दक्षिण अमेरिकेंत ब्रिटिशांच्या अगदीं लहान प्रहरी नौकांनीं निकामी करून टाकली तेव्हां तिच्या नायकानें आपल्या हातानेंच तिला जलसमाधि दिली आणि पाठोपाठ आपणहि आत्महत्या केली. १९३९ च्या डिसेंबरमध्यें एका ब्रिटिश पाणबुडीनें जर्मनीची सहा सहस्र टनांची एक लढाऊ नौका बुडविली. त्यानंतर आणखी तीन ब्रिटिश पाणबुड्यांनीं तसलेच प्रयत्न केले. पण ते अयशस्वी होऊन त्या साऱ्याच समुद्राच्या तळाशीं गेल्या. यानंतर जर्मनीनें लोहचुंबकाच्या तत्वावर केलेले पाणसुरुंग पेरले. या पाणसुरुंगांनीं कांहीं व्यापारी नौकांच्या बरोबरच दोन ब्रिटिश विनाशिकांनाहि जलसमाधि दिली. ब्रिटिशांच्या नाविक तळांत प्रवेश करून जर्मन पाणबुड्यांनीं रॉयल ओक ही युद्धनौका युद्धारंभींच बुडविल्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. युद्धारंभापासूनच्या पहिल्या पांच महिन्यांत जर्मनांना अँग्लोफ्रेंचांच्या नौदलापैकीं अवघ्या ८८००० टनांच्या युद्धनौका बुडवितां आल्या. शत्रूंच्या युद्धनौका बुडविण्याच्या बाबतींत जर्मन विमानदलाला एकंदरीनें अपयशच आलें. नाहीं म्हणायला इंग्लंडची एक विमानवाहक नौका आर्क रॉयल ही वैमानिक हल्लयामुळें एकदां कलल्यानें ती त्या वेळीं बुडाल्याचा जर्मनीला भास झाला. त्यामुळें आर्क रॉयल बुडाल्याचा प्रचार जर्मन नभोवाणीनें हट्टानें चालविला होता. पण आपली माहिती चूक असल्याचें पुढें त्यांच्या प्रत्ययास आलें. एकंदरीनें

पाहतां इंग्लंड आणि जर्मनी यांच्या नौदलांत झालेल्या चकमकींची माहिती मनोरंजक असली तरी युद्धाच्या इतिहासांत तिला फारसें महत्त्व नाहीं. जर्मनीच्या पाणबुड्या आणि अँग्लोअमेरिकनांचें नौदल यांच्यामधील निर्वाणीच्या लढाईलाच तेवढें या महायुद्धाच्या इतिहासांत महत्त्वाचें स्थान आहे. या दृष्टीनें विचार केला असतां असें दिसतें कीं अमेरिकेनें इंग्लंडला ५० विनाशिका पुरविल्या; तेव्हांपासूनच प्रे. रूझव्हेल्ट यांनीं जर्मनीविरुद्ध युद्धांत प्रवेश केला असें म्हणतां येईल. १९४१ च्या मार्चमध्यें इंग्लंडला उधार आणि उसनवार युद्धसामुग्री पुरविण्याची प्रे. रूझव्हेल्टना त्यांच्या विधिमंडळाकडून अनुज्ञा मिळाली. पुढें तर त्यांनीं तटस्थतेचा आडपडदाहि टाकून देऊन आपल्या नौदलाला जर्मनीच्या पाणबुड्या दिसतील तेथें बुडविण्याची आज्ञा दिली. या आज्ञेचा अर्थहि अतिशय व्यापक करून अमेरिकन नौदलानें आपण होऊन जर्मन पाणबुड्या शोधून बुडविण्याचा उपक्रम आरंभिला. तरीसुद्धां १९४१ च्या अंतापर्यंत अमेरिकन सरकार म्हणे तटस्थ होतें. या तटस्थ अमेरिकनांनीं १९४१ मध्यें डेन्मार्कच्या राज्यांत समाविष्ट असलेलें आइसलँड द्वीप व्यापलें; तें अजूनहि अमेरिकेच्या हातांतच आहे. याच दिवसांत आयर्लंडचा अल्स्टर प्रांतहि अमेरिकेनें व्यापला. असो, ही सारी बलिष्ठांची तटस्थता आहे.

## : १६ :

# बाल्कन प्रदेशांतील राजकारण

जर्मनीनें फ्रान्सवरील चढाईचा प्रारंभ केल्यापासून बाल्कन प्रदेशांत झालेल्या घडामोडींकडे आतां थोडें लक्ष्य दिलें पाहिजे. कारण तेथील घडामोडींचा परिचय करून घेतल्यावांचून जर्मन विमानदलानें ब्रिटनवरील चढाई कां थांबविली आणि त्यानंतर जर्मनीनें आपली दृष्टि पूर्वेकडे कां वळविली, या कोडयांचा कांहींच उलगडा होणार नाहीं.

### रशियाचें जर्मनीविरोधी धोरण

जर्मन सेना फ्रान्सकडे वळतांच रशियानें बाल्कन प्रदेशांतील जर्मनीच्या वर्चस्वाला सुरुंग लावण्याला प्रारंभ केला. बाल्कन प्रदेशांपैकीं युगोस्लाव्हियाचें सरकार कट्टें राजसत्तावादी आणि त्यामुळें बोल्शेव्हिकांचें द्वेष्टें असल्यानें त्या देशानें बोल्शेव्हिकांच्या राज्यक्रांतीपासूनच रशियाचा संबंध तोडला होता. त्याचप्रमाणें रशियानें १८७८ च्या रूसोतुर्क युद्धानंतर गिळलेला बेसारेबिया प्रांत रुमानियानें बोल्शेव्हिक क्रांतीनंतर परत हस्तगत केला असल्यामुळें त्या देशाचाहि १९४० पर्यंत रशियाशीं सख्यसंबंध नव्हता. पण १९४० च्या एप्रिलमध्यें जर्मनीनें डेन्मार्क आणि नॉर्वे हे देश अकस्मात् आपल्या सत्तेखालीं आणलेले पाहून युगोस्लाव्हिया आणि रुमानिया या उभयतांनाहि जर्मनीची भीति वाटूं लागली. या नव्या संकटाला तोंड देण्याकरितां मॉस्कोच्या बोल्शेव्हिक बागुलबोवाशींसुद्धां सख्य करण्याला ते सिद्ध झाले. १९४० च्या मे महिन्यांतच रशिया आणि युगोस्लाव्हिया या उभयतांचा व्यापारी संधि झाला. त्याचप्रमाणें त्या दोनहि राष्ट्रांनीं परस्परांच्या देशांत राष्ट्रदूत पाठवून राजनैतिक बाबतींतहि सहकार्य करण्याला प्रारंभ केला. युगोस्लाव्हियाच्या पाठोपाठ रशियानें रुमानियांतहि आपला राष्ट्रदूत धाडला आणि त्याचें रुमानियन सरकारानें मनःपूर्वक स्वागत केलें. यानंतर लौकरच फ्रान्समधील युद्धाकरितां स्लोव्हाकियांतील जर्मन सैन्य पश्चिमेला जाईल आणि तेथील जर्मन सैन्याची जागा हंगेरियन सेनेकडून भरून काढली

जाईल, अशी रशियाला शंका आली. तेव्हां रशियानें हंगारीचे राष्ट्रपाल ॲड-मिरल हॉर्थी यांना स्लोव्हाकियांत पाऊल टाकल्यास रशियाशीं युद्धाचा प्रसंग येईल, अशी स्पष्ट शब्दांत धमकी दिली. युगोस्लाव्हियांत पाऊल न टाकण्याची सूचनाहि याच वेळीं रशियानें इटालीला दिली होती.

## रुमानियावर रशियाचें आक्रमण

अशा प्रकारें बाल्कन प्रदेशांतील हालचालींना जरी रशियानें प्रारंभ केला तरी चाळीस दिवसांत फ्रान्सची लढाई संपूनहि जाईल, अशी त्याची कल्पना नसल्यानें फ्रान्सच्या शरणागतीपर्यंत रशियाच्या हातून प्रत्यक्ष कृति कोणतीच झाली नव्हती. पण फ्रान्सच्या पाडावानंतर रशियाच्या नेत्यांना आपल्या राष्ट्रा-वरील भावी संकटांचीं दुःस्वप्नें पडूं लागलीं आणि रशियावरील भावी आक्र-मणाला तोंड देण्याची त्यांनीं सिद्धता आरंभिली. जर्मनीचा फ्रान्सशीं शस्त्रसंधि झाल्यानंतर दोनचार दिवसांतच रशियानें रुमानियाला अंतिम संदेश पाठवून त्याच्याकडे बेसारेबिया आणि उत्तर ब्युकोव्हिना या प्रांतांची मागणी करून लगेच एका दिवसांत उत्तर मागितलें. नवीनच आलेल्या रशियन राष्ट्रदूतानें हा संदेश आणलेला पाहिल्यानंतर त्याचें स्वागत करणाऱ्या कारोल राजांचे डोळे उघडले आणि त्यांनीं इटालीजर्मनीच्याकडून साहाय्य मिळविण्याचा प्रयत्न केला. पण वेळेच्या अभावीं तो विफल झाला. तेव्हां दिलेला अवधि पूर्ण होण्या-पूर्वी रुमानियानें निमूटपणें मागितलेले प्रांत रशियाच्या स्वाधीन केले. युद्धारंभा-पूर्वी रुमानियाच्या सीमांचें संरक्षण करण्याची हमी इंग्लंडनें कारोल राजांना दिली होती, हें वाचकांना आठवत असेलच. रशियानें रुमानियाकडून लुबाड-लेल्या प्रांतांपैकीं बेसारेबिया एके काळीं रशियाच्या सत्तेखालीं होता आणि त्या प्रांताच्या स्वामित्वासंबंधींचीं त्या उभयतांचीं भांडणें जुनींच होतीं. पण ब्युको-व्हिनावर रशियाची सत्ता कधींच नव्हती. तो प्रांत प्रथमपासून ऑस्ट्रियाच्या सत्तेखालीं होता आणि पहिल्या महायुद्धानंतर तो रुमानियाला मिळाला होता. हा प्रांत व्यापण्याचें निमित्त रशियानें असें सांगितलें होतें कीं इतके दिवस बेसा-रेबिया प्रांत रुमानियानें स्वतःच्या सत्तेखालीं ठेवल्यामुळें रशियाची जी भयानक हानि झाली, तिच्या भरपाईकरितां रुमानियानें हा प्रांत ओकला पाहिजे. या वेळीं जर्मनीनें फ्रान्सची लढाई नुकतीच संपविली असली तरी लगेच रशियाशीं

युद्ध करणें तेव्हां जर्मनीला अशक्य असल्यानें तो प्रांत रशियाच्या घशात गेलेला हेर हिटलेर यांना निमूटपणें पहावा लागला. या घटनेमुळें त्यांना आलेला संताप रशियाविरुद्ध युद्ध पुकारल्यानंतरच्या भाषणांत त्यांनीं व्यक्त करून दाखविला.

## रुमानियाचें नष्टचर्य

याप्रमाणें रशियाच्या दरोडेखोरीचा आणि इंग्लंडनें दिलेल्या हमीच्या निरुप-योगीपणाचा पुरता अनुभव आल्यानंतर कारोल राजांनीं जर्मनीकडे संरक्षण मागितलें आणि जर्मनीनेहि तें त्यांना दिलें. पण एवढ्यानें त्यांचें नष्टचर्य थोडेंच संपणार होतें? रशियानें रुमानियाचा एक लचका तोडलेला पाहतांच हंगारी आणि बल्गारिया या रुमानियाच्या शेजाऱ्यांनीं, त्या देशानें अनुक्रमें पहिल्या महायुद्धानंतर आणि बाल्कन युद्धानंतर त्यांचे जे प्रांत खाल्ले होते, ते परत मागितले. यांपैकीं बल्गारियाच्या बाबतींत रुमानियानें इतका धडधडीत अन्याय केला होता कीं त्यानें त्याचे प्रांत परत करण्यासंबंधीं रुमानियाव्यतिरिक्त इतर सर्वच राष्ट्रांचें एकमत होतें. हंगारीकडून घेतलेल्या ट्रान्सिल्व्हानिया प्रांतांत मात्र रुमानियन लोकांची बरीच मोठी वसाति असल्यानें त्या प्रांताचा प्रश्न अधिक अवघड होता. पुन्हा रुमानिया आणि हंगारी या दोघांपैकीं एकालाहि दुखविण्याची जर्मनीला इच्छा नव्हती. कारण एकीकडे रुमानियांतील खनिज तेलाची जर्मनीला आवश्यकता होती, तर दुसरीकडे हंगारीसारख्या विश्वसनीय मित्रराष्ट्राच्या न्याय्य आकांक्षा पूर्ण करून त्याचा आणि आपला ऋणानुबंध दृढतर करणें जर्मनीच्या हितावें होतें. यामुळें १० जुलैला हंगारीच्या प्रतिनिधींना जेव्हां म्यूनिच येथें हेर फोन रिब्बेनट्रॉप आणि काउंट चियानो यांची भेट घेतली, तेव्हां जर्मनीच्या परराष्ट्रमंत्र्यांनीं त्यांना रुमा-नियाशीं स्वतःच वाटाघाटी करून आपला कलह संपविण्याचा उपदेश केला. पण ही गोष्ट घडणें अशक्यच असल्यानें हंगारीच्या सरकारानें प्रसंगच आल्यास रुमानियाशीं लढून ट्रान्सिल्व्हानिया प्रांत हस्तगत करण्याची सिध्दता केली. पण रुमानियानें इंग्लंडची हमी झिडकारून जर्मनीकडे संरक्षण मागितलें होतें, इतकेंच नव्हे तर ब्रिटिश भांडवलवाल्यांच्या हातीं असलेल्या खनिज तेलाच्या खाणींवर रुमानियन जनतेची सत्ता प्रस्थापित केली होती. ब्रिटिश भांडवल-वाल्यांच्या तेलवाहू नौका आणि मोटारीहि रुमानियानें सरकारजमा केल्या होत्या.

उलटपक्षीं इंग्लंडनेंहि रुमानियन जनतेच्या नौका जप्त करून वरील अन्यायांचें उट्टें काढलें होतें. तेव्हां इंग्लंडशीं भांडण करणाऱ्या या नव्या मित्राचें संरक्षण करणें जर्मनीला भागच होतें. २२ ऑगस्टला रुमानियाशीं चाललेली बोलणीं हंगारीनें तोडून टाकलीं. तेव्हां जर्मनी आणि इटाली यांनीं हंगारी आणि रुमानिया यांना व्हिएन्नाला बोलावून आपला निर्णय त्यांना कळविला. या निर्णयाप्रमाणें अर्धा ट्रान्सिल्व्हानिया प्रांत रुमानियानें हंगारीला द्यावा, असें हेर फोन रिब्बेनट्रोप आणि काउंट चियानो यांनीं रुमानियाच्या प्रतिनिधींना बजावून सांगितलें. रुमानियाच्या उरलेल्या प्रदेशाचें संरक्षण करण्याचें आश्वासनहि या कोयनेलच्या गोळी-बरोबर जर्मनीनें दिलें होतें. तरीसुध्दां कारोल राजांनीं हा निर्णय मान्य करतांच रुमानियांत जवळ जवळ बंडाळीच उपस्थित झाली आणि तिला तोंड देणें अशक्य होऊन कारोल राजांनीं पुनश्च एकवार राज्यत्याग केला. त्यांच्या राज्यत्यागा-नंतर तेथील कट्टया राष्ट्रीय पक्षाच्या हातीं सर्व सत्ता आली. या पक्षाला जर्मनीचा निर्णय मान्य नसला तरी इतर सर्व बाबतींत त्याची विचारसरणी जर्मनीच्या विचारसरणीशीं जुळणारीच असल्यानें त्यानें जर्मनीशीं सहकार्य करावयाचें ठरविलें. या पक्षाचे प्रमुख मो. आंतोनेस्कू यांनीं सर्व सत्ता आपल्या हातीं घेऊन कारोल राजांचे अल्पवयी चिरंजीव मायकेल राजे यांच्या नांवानें राज्यशकट हांकण्याला प्रारंभ केला. ही घटना ६ सप्टेंबरला घडून आली या घटनेमुळें एकीकडे ब्रिट-नची लढाई चालू असतांनाच जर्मनीला आपल्या वर्चस्वाचें क्षेत्र काळया समु-द्राला नेऊन भिडवावें लागलें.

## रुमानियांत जर्मन सेनेचा प्रवेश

मो. आंतोनेस्कूंच्या हातीं सत्ता आल्यापासून एका महिन्यांत त्यांनीं रुमा-नियन सैन्याची पुनर्घटना करण्याकरितां जर्मन सैन्याचें साहाय्य मागितलें आणि अर्थात् जर्मनीनें तें दिलें. प्रथम केवळ ३००० जर्मन सैनिक रुमानियांत येणार असल्याची वार्ता प्रसिद्ध झाली होती. पण लौकरच त्या संख्येच्या अनेकपट जर्मन सैन्य रुमानियांत शिरलें आणि त्यानें तेथील सारीं महत्त्वाचीं केंद्रें आपल्या ताब्यांत घेतलीं. रुमानियांत जर्मन सैन्य शिरलेलें पाहून बुखारेस्ट येथील इंग्लं-डच्या राजदूतानें मो. आंतोनेस्कू यांच्याकडे निषेधाचे संदेश धाडले. पण त्यांचा कांहींच उपयोग झाला नाहीं. रुमानियाच्या संरक्षणाची सर्व सिद्धता जर्मनीनें

करण्यापूर्वी इंग्लंडनें तेथील खनिज तेलाच्या खाणांवर बॉंबवृष्टि करावी असें अनेक ब्रिटिश युद्धतज्ज्ञांचें म्हणणें होतें. पण तें साहस इंग्लंडकडून होऊं शकलें नाहीं.

## बल्गारियांतील जर्मन प्रवासी (?)

रुमानियांतील या साऱ्या घटनांमुळें रशियाच्या तळपायाची आग मस्तकाला भिडली. पण आपण होऊन जर्मनीची कुरापत काढण्याचें साहस त्यालाहि झालें नाहीं. रुमानियांत सैन्य पाठविण्यापूर्वी जर्मनीनें रशियाची संमति घेतली नव्हती, असें एका जर्मनव्याप्त देशांतील वर्तमानपत्रानें प्रसिद्ध केलें, तेव्हां रशियन वृत्तसंस्थेनें वस्तुस्थिति तशी नसल्याची घोषणा केली. अधिकृत वृत्तसंस्थांना अशी सत्याची हत्या नेहमीच करावी लागते. असो, रुमानियाच्या पाठोपाठ बल्गारियांतहि जर्मन सेनेनें प्रवेश केला. १७ ऑक्टोबरला बल्गारियाच्या सरकारानें एक पत्रक प्रसिद्ध करून आपल्या देशांत जर्मन सैनिक नसल्याचें घोषित केलें. जनतेच्या डोळ्यांनाच विकार झाल्यामुळें त्यांना सर्वत्र जर्मन सैनिक दिसत होते, ही दुर्दैवाची गोष्ट होती. निदान सरकारी रीत्या त्यांना सैनिक न म्हणतां प्रवासी म्हणत, हें काय थोडें होतें ?

## त्रिराष्ट्रांचा संधि

असो, बाल्कन प्रदेशांतील यापुढच्या राजकीय घटना सांगण्यापूर्वी जर्मनी, जपान आणि इटाली यांच्यामध्यें याच दिवसांत झालेल्या त्रिराष्ट्रसंधीची थोडी माहिती सांगितली पाहिजे. कारण या संधीचा पुढील घटनांशीं निकटचा संबंध आहे. २७ सप्टेंबरला बेर्लिन येथें जपान, जर्मनी आणि इटाली या राष्ट्रांचे प्रतिनिधि एकत्रित झाले आणि थोड्याशा वाटाघाटीनंतर त्यांनीं आपला त्रिराष्ट्रसंघ स्थापण्याचा संकल्प केला. या संधीप्रमाणें जपाननें जर्मनी आणि इटाली यांच्या युरोपांतील वर्चस्वाला मान्यता द्यावी; उलटपक्षीं या युरोपीय राष्ट्रांनीं जपानच्या पूर्व आशियांतील वर्चस्वाला मान्यता द्यावी, असें ठरलें. हा संधि करणाऱ्या त्रिराष्ट्रांपैकीं एखाद्या राष्ट्राचें आज युद्धांत भाग न घेणाऱ्या एखाद्या बलाढ्य राष्ट्राशीं युद्ध जुंपलें तर संधि करणाऱ्या तीनहि राष्ट्रांनीं त्याच्या विरुद्ध युद्ध पुकारलें पाहिजे. मात्र वरील अटीप्रमाणें रशियाचें त्रिराष्ट्रांपैकीं

एखाद्याशीं युद्ध जुंपल्यास त्याच्याविरुद्ध इतरांनीं युद्ध पुकारणें त्यांच्यावर बंधनकारक नाहीं. हा त्रिराष्ट्रसंधि मुख्यतः अमेरिकेनें इंग्लंडच्या वतीनें युद्धांत भाग घेऊं नये या उद्देशानें केला होता, हें उघड आहे. तरीसुद्धा या संधीवर बाल्कन राष्ट्रांपैकीं अनेकांनीं स्वाक्षरी केल्यामुळें त्याला युरोपापुरतें तरी रशियाविरोधी संघाचें स्वरूप प्राप्त झालें, याविषयीं शंका नाहीं.

## मोलोटोफहिटलेर संवाद

वरील संघांत समाविष्ट होण्याची इच्छा हंगारीनें इतरांच्या आधीं व्यक्त केली आणि त्याप्रमाणे २० नोव्हेंबरला वरील त्रिराष्ट्रांनीं हंगारीला आपल्या संघांत घेतलें. पुढें तीन दिवसांनीं रुमानियानें त्याच संधीवर स्वाक्षरी केली. त्याच्या पाठोपाठ स्लोव्हाकियाच्या सरकारानेंहि त्यांचाच मार्ग अनुसरला. हा रशियाविरोधी संघ संघटित होण्याचीं लक्षणें दिसूं लागतांच मो. मोलोटोफ यांनीं १२ नोव्हेंबरला बेर्लिनला भेट दिली. या भेटीच्या प्रसंगीं हेर हिटलेर, मार्शल गोएरिंग, हेर फोन रिब्बेनट्रोपप्रभृति साऱ्या प्रमुख जर्मन नेत्यांशीं त्यांचीं बोलणीं झालीं. या प्रसंगीं कोणत्या प्रश्नांची चर्चा झाली, हें रशियाशीं युद्ध जुंपल्यानंतरच्या भाषणांत हेर हिटलेर यांनीं प्रकट केलें. त्या भाषणांवरून अनेक महत्त्वाच्या गोष्टी उघडकीस आल्या आहेत. मो. मोलोटोफ यांनीं या भेटींत उपस्थित केलेला पहिला महत्त्वाचा प्रश्न हा होता कीं जर्मनीनें रुमानियाच्या संरक्षणाची जी हमी दिली आहे ती इंग्लंडच्या हमीप्रमाणें रशियाविरुद्ध उपयोगी न पडणारी हमी आहे कां खरोखरीची हमी आहे? अर्थात् रुमानियाचा आणखी कांहीं प्रदेश रशियाला खावासा वाटल्यास जर्मनी रशियाला विरोध करील काय? या प्रश्नाला हेर हिटलेर यांनीं कोणतें उत्तर दिलें, हें सांगायला नकोच. रुमानियाच्या बाबतींत जर्मनीच्या नेत्यांनीं रशियालाच उलट प्रश्न विचारला कीं रुमानियाकडून आम्हांला बेसारेबिया प्रांत तेवढा पाहिजे आहे, बाकी आमचें त्या देशाशीं कांहींहि भांडण नाहीं, अशा रशियानें वारंवार घोषणा केल्या असूनसुद्धा रशियाच्या निर्वाणीच्या संदेशांत उत्तर ब्युकोव्हिना प्रांताचा समावेश कां केला, याचीं कारणें आपण सांगूं शकाल काय? अर्थात् या प्रश्नाला उत्तर देण्याकरितां मो. मोलोटोफ बेर्लिनला आले नव्हते.

जर्मनीशीं न लढतां आणखी कोणते प्रांत आपल्याला गिळंकृत करतां येतील, याचा शोध घेण्याकरितांच ते रशियाबाहेर पडले होते.

## फिन्लंडभक्षणाला जर्मनीचा विरोध

मो. मोलोटोफ यांनीं उपस्थित केलेला दुसरा प्रश्न असा होता कीं रशियाला फिन्लंडपासून आपल्याला धोका आहे, असें वाटतें आणि इतःपर हा धोका राहूं द्यावयाचा नाहीं, असा आमचा निश्चय झाला आहे, तर अशा प्रसंगीं जर्मनी फिन्लंडला साहाय्य करील काय ? या प्रश्नाला हेर हिटलेर यांनीं उत्तर दिलें कीं राजकीय दृष्ट्या जर्मनीचे फिन्लंडमध्यें कोणतेहि हितसंबंध नाहींत, पण फिन्लंडविरुद्ध रशियानें पुनश्च युद्ध पुकारलें तर तें जर्मन जनतेला असह्य होईल, विशेषतः फिन्लंडकडून रशियाला धोका असल्याचें निमित्त कोणाहि जर्मनाला खरें वाटणार नाहीं आणि याकरितां कांहींहि झालें तरी बाल्टिकच्या तीरावर नवें युद्ध उपस्थित होऊं द्यावयाचें नाहीं, असा आमचा निश्चय आहे.

## बास्फोरसमध्यें सत्तादानाला नकार

मो. मोलोटोफ यांचा तिसरा प्रश्न असा होता की जर्मनीनें जशी रुमानियाला हमी दिली आहे, तशीच हमी रशियानें बल्गारियाला दिली आणि त्या हमीच्या पूर्ततेकरितां त्या देशांत रशियन सैन्य धाडलें तर जर्मनीचें धोरण काय राहील ? याला हेर हिटलेर यांनीं उत्तर दिलें कीं बल्गारियाला एखाद्या देशापासून धोका असल्याची किंवा त्या राष्ट्रानें दुसऱ्या एखाद्या राष्ट्राकडे आपल्या संरक्षणाची हमी घेण्याची विनंति केल्याची वार्ता कधीं आमच्या कानांवर आली नाहीं, तरीसुद्धा या प्रश्नाला आमचें उत्तर हवेंच असल्यास आम्हांला आमच्या मित्रराष्ट्रांशीं विचारविनिमय करावा लागेल. सरतेशेवटीं मो. मोलोटोफ यांनीं सांगितलें कीं रशियाला भूमध्य समुद्राचा मार्ग मोकळा पाहिजे आहे आणि याकरितां दार्दानेलिस किंवा बास्फोरस या सामुद्रधुन्यांवरील एखाददुसरा तळहि हवा आहे, तर या बाबतींत जर्मनीचें म्हणणें काय आहे ? या प्रश्नाला हेर हिटलेर यांनीं उत्तर दिलें कीं रशियाला भूमध्य समुद्रांत वाट मिळाली पाहिजे, हें आम्हांलाहि मान्य आहे, पण त्याकरितां बॉस्फोरस किंवा दार्दानेलिस येथील तळ रशियानें व्यापलेच पाहिजेत असें जर्मनीला वाटत नाहीं. या साऱ्या

संभाषणाचा इत्यर्थ हाच होता कीं जर्मनी पश्चिमेकडे गुंतला असल्याची संधि साधून रशियानें जे प्रांत बळकावले आहेत, त्यांत नवीन प्रांतांची भर टाकण्याला जर्मनीची संमति मिळणार नाहीं, इतकेंच नाहीं तर रशियानें तसा प्रयत्न केल्यास रशियाविरुद्ध युद्ध पुकारण्याचीसुद्धां जर्मनीची सिद्धता आहे. १९४० च्या नोव्हेंबर महिन्यांत रशिया आणि जर्मनी यांच्या भूमिका इतक्या स्पष्ट झाल्या-नंतर १९४१ मध्यें युद्धाला नवें कोणतें वळण लागणार हें उभयतांनाहि कळून चुकलें होतें, याविषयीं शंका नाहीं. हें नवें वळण लागण्यापूर्वी इटालीची ग्रीसवर आणि जर्मनीची युगोस्लाव्हियावर अशा दोन स्वाऱ्या झाल्या. त्या स्वाऱ्यांच्या इतिहासाकडे आतां आपल्याला वळलें पाहिजे. पण तत्पूर्वी इटालीच्या आफ्रि-केंतील युद्धाची माहिती सांगणें आवश्यक आहे.

: १७ :

# नीलनदीची लढाई

इजिप्तच्या संरक्षणाकरितां एकत्रित केलेल्या विभिन्न देशांच्या सैन्याला मि. चार्चिल यांनीं ' नील नदीचें सैन्य ' हें नांव दिलें होतें. तेव्हां त्यांच्याच अनुकरणानें उत्तर आफ्रिकेंतील युद्धाला मी नील नदीची लढाई हें नांव दिलें आहे. उत्तर आफ्रिकेमधील इटालोजर्मन चढाईचें उद्दिष्ट नीलनदीचें मुख आणि सुएझचा कालवा हें होतें. हें उद्दिष्ट साध्य झालें असतें तर भूमध्य समुद्राचें एक दार इंग्रजांना बंद झालें असतें. जर्मनांनीं सुएझ जिंकल्यास आपण जिब्राल्टरवर हल्ला करूं, असें आश्वासन जनरल फ्रांको यांनीं दिलें असल्यानें नील नदीच्या लढाईंत जय मिळविण्याची जर्मनीला अत्यंत आवश्यकता होती. असें असून-सुध्दा नील नदीच्या युध्दांत जर्मनीनें हार खाल्ली आणि तिचेंच पर्यवसान जर्मनीच्या अंतिम पराजयांत झालें. यावरून सम्राट् नेपोलियनच्या एका सुप्रसिद्ध सूक्तीचें स्मरण होतें. ' In order to destroy the power of Britain it is necessary to capture Egypt. ' या वचनाप्रमाणें वर्तन करून त्या थोर सम्राटानें इजिप्त देश जिंकलाहि होता. पण तो त्याला आपल्या हातीं राखतां आला नाहीं आणि त्यामुळें त्याचा इंग्रजांकडून पराजय झाला. मग ज्यांना तो देश नुसता जिंकतांहि आला नाहीं त्यांचा पराजय नेपोलियनपेक्षाहि लौकर झाल्यास त्यांत नवल काय ?

## धरणांवरील हल्ल्यांचा प्रश्न

दुसऱ्या महायुद्धापूर्वी ' इजिप्तच्या संरक्षणाचा प्रश्न ' या विषयावर ११–७–३९ च्या 'केसरी'त मी एक लेख लिहिला होता. त्या लेखांत मी असें गृहीत धरलें होतें कीं इजिप्तचें सारें जीवन अस्वानजवळ नीलनदीला घातलेल्या प्रचंड बंधाऱ्यावर अवलंबून असल्यामुळें युद्ध जुंपतांच जर्मन आणि इटालियन वैमानिक तो बंधारा अथवा तें धरण फोडून टाकण्यासाठीं आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा करतील. त्याच लेखांत मी पुढें लिहिलें होतें. ' ब्रिटिश युद्धतज्ज्ञ लिहितात कीं अस्वान

येथील धरणावर बॉंब पडूं नयेत यासाठीं आम्ही शक्य तितकी सावधगिरी घेत आहोंत. हा सावधपणा स्तुत्य आहे. पण तेवढ्यानें इजिप्तच्या जनतेवरील संकट टळत नाहीं. स्वतःच्या जीवनावर उदार झाल्यास वैमानिकांना कोणत्याहि स्थिर लक्ष्यावर बॉंबचा वर्षाव करतां येतों आणि अस्वानचें धरण फोडल्यानें मिसर-मधील कच्च्या मालाचीं कोठारें, दळणवळणाचीं साधनें आणि कोट्यावधि लोकांचीं निवासस्थानें यांचा निश्चितपणें विध्वंस होण्याचा संभव असल्यानें हा हेतु साध्य करण्याकरितां जर्मन आणि इटालियन वैमानिक आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केल्यावांचून राहणार नाहींत. प्रचलित चिनी-जपानी युद्धांत होहांगहो नदीचे बंधारे फोडून मार्शल चियांगकैशेकच्या जर्मन सेनापतींनीं जपानच्या सत्तेखालील प्रदेशांत कसा अनर्थ घडवून आणला होता, हें सर्वांना माहीत आहेच. तेव्हां याच यशस्वी प्रयोगाची पुनरावृत्ति करण्याला इटाली-जर्मनीचे सेनापति चुकणार नाहींत, ही गोष्ट निश्चित समजावी.' या उताऱ्यांतील सारें विवेचन तर्कशुद्ध असूनहि ही घटना कां घडून आली नाहीं, हें समजत नाहीं. जर्मनींतील धरणां-वर बॉंबहल्ले करून त्या देशांत ब्रिटिश वैमानिकांनीं केवढा अनर्थ घडवून आणला, हें कित्येक वाचकांच्या स्मरणांत असेल. तेव्हां धरणावर बॉंबहल्ले करण्याचा रणनीतींत समावेश होतो, हें उघड आहे. त्यामुळें हें रहस्य अधिकच दुर्ज्ञेय होऊन बसतें.

## इटालीची आफ्रिकेंतील सिद्धता

लिबियाच्या संरक्षणासाठीं आणि इजिप्तवरील चढाईसाठीं सिन्योर मुस्सोलि-नींनीं आपल्याकडून अगदीं परिपूर्ण सिद्धता केली होती. २३-२-१९४१ च्या भाषणांत त्यांनीं सांगितलें आहे कीं १९३७ ऑक्टोबरपासून १९४१ च्या फेब्रु-वारीपर्यंत लिबियाला त्यांनीं १४००० अधिकारी, ३५६००० सैनिक, १९०० तोफा, १५३०० यांत्रिक तोफा, ११० लक्ष तोफांचे गोळे, एक अब्ज बंदुकींच्या गोळ्या, ७५९ रणगाडे, या व्यतिरिक्त इतर सर्व सामुग्री पाठविली होती. तेव्हां इटालीच्या नेत्यांनीं सैन्य आणि युद्धसामुग्री यांच्या दृष्टीनें अगदीं कडेकोट सिद्धता केली होती, याविषयीं शंका नाहीं. असें असूनसुद्धां सरसकट इटालियनांच्या जर्मनद्वेषामुळें आणि इटालीच्या राजांच्या मनांतील प्रधानद्वेषामुळें त्यांची सारी सिद्धता व्यर्थ गेली आणि सिन्योर मुस्सोलिनींच्या चरित्राला अपयशाचा कलंक लागला.




बाल्कन राष्ट्रें (पृ. १८५)




आफ्रिकेंतील लढा (पृ. १९३)

## इजिप्तवरील चढाईचा मार्ग

लिबियांतून मिसर देशावर हल्ला करावयाचा झाल्यास तो अलेक्झांड्रिया किंवा कैरो यांच्या रोखानें करणेंच लाभदायक आहे. हा मार्ग मोटारींच्या वाहतुकीला विशेष अनुकूल आहे. या बाजूनें हल्ला येऊं नये याकरितां सागरतीरावरील सोल्लुम बंदरापासून दक्षिणेला सिवा या मरुशाद्वलापर्यंतच्या २०० मैलांच्या सीमेवर ब्रिटिशांनीं तटबंदी करून ठेवली आहे. सिवाच्या दक्षिणेकडील भागांत वाळूचीं प्रचंड वादळें होत असल्यानें तो भाग सैन्याच्या हालचालींना निरुपयोगी आहे.

सिवाच्या पश्चिमेकडील जघबूबपासून खालीं कुफ्रा या मरुशाद्वलापर्यंतचा भाग अति भयंकर वाळवंटानें व्यापला आहे. असें सांगतात कीं आतांपर्यंत एकाहि मोटारीनें हें अति भयंकर वाळवंट ओलांडलेलें नाहीं. स्वतः कुफ्रा येथें इटालियन सरकारानें सैन्य आणि युद्धसामुग्री यांची मोठ्या प्रमाणावर जमवा-जमव करून ठेवली होती. या बाजूनें अस्वानवर स्थलमार्गानेंहि धाड घालतां येण्याजोगी होती. इकडून चढाई करण्याचें इटालियन लोकांनीं मनांत आणलें असतें तर सूडान प्रांत तुडवून त्यांना ॲबिसीनियांतील इटालियन सेनेशीं हात-मिळवणी करतां आली असती आणि मग आफ्रिकेंतील साऱ्या इटालियन सेना एकसमयावच्छेदेंकरून इजिप्तवर तुटून पडूं शकल्या असत्या.

## इटालीला इंग्रजांकडून मार

इतर राष्ट्रांच्या मागून नऊ महिन्यांनीं युद्धांत प्रवेश केल्यामुळें कीं काय कोण जाणें इटालियन सैन्य हें युद्धशास्त्रांतील केवळ बालक ठरलें, असें म्हणावयास प्रत्यवाय दिसत नाहीं. १० जूनला इटालीनें युद्धांत प्रवेश केल्यानंतरसुद्धां या युद्धां-तील पहिली खेळी त्या देशाच्या वांट्याला न येतां ती इंग्रजांच्याच वांट्याला आली. ११ जूनलाच आफ्रिकेंतील ब्रिटिश विमानदलानें इटालीचे विमानतळ, बॉंबगोळ्यांचे आणि खनिज तेलांचे साठे, बंदरें प्रभृति लक्ष्यांवर विमानहल्ले केले. या अनपेक्षित बॉंबहल्ल्यांमुळें इटालियनांची बरीच हानि झाली. याच वेळीं ब्रिटिश नौदलानें टोब्रुकवर तोफा डागून तेथील इटालियन नौदलाची मोठी हानि केली. उलट-पक्षीं इटालियन विमानदलानें सोल्लुम, मर्सा मत्रूह, सीदी बराणी इत्यादि दुर्गां-वर बॉंबवर्षाव केला. युद्धारंभापासूनच्या २० दिवसांत इटालीच्या १४ पाणबुड्या रसातळाला गेल्या. उलटपक्षीं शत्रूची एक प्रहरी युद्धनौका बुडविल्याचें श्रेय

इटालियन पाणबुड्यांना मिळालें. जुलै महिन्यांत अँग्लो-इटालियन नौदलांच्या परस्परांशीं दोन चकमकी झाल्या. या दोनहि चकमकींत इटालीच्या नौदलाला बराच मार बसला आणि तेव्हांपासून तें नौदल आपल्या तळांतून बाहेर पडण्याचें टाळूं लागलें.

## भूमियुद्धांत इंग्लंडची माघार

आफ्रिकेंतील भूमियुद्धाची परिस्थिति मात्र जलयुद्धाच्या आणि आकाशयुद्धाच्या मानानें थोडी भिन्न होती. भूमियुद्धांत उत्तर आफ्रिकेंतील उत्कृष्ट फ्रेंच सैन्याचा पाठिंबा आपल्याला आहे, अशा समजुतीनें ब्रिटिशांनीं इजिप्तमध्यें फारसें सैन्य ठेवलें नव्हतें. त्यामुळें फ्रेंच सैन्य एकाएकीं युद्धनिवृत्त झाल्यानें उत्तर आफ्रिकेंतील ब्रिटिश सैन्याची तारांबळ झाली. इजिप्त आणि सूडान या दोनहि प्रांतांतील ब्रिटिश सैन्य युद्धारंभाबरोबर चढाईसाठीं शत्रूच्या युद्धक्षेत्रांत शिरलें होतें, तें जुलैमध्यें मागें घ्यावें लागलें. ऑगस्टमध्यें इटालियन सैन्य ब्रिटिश सोमालीलँड या प्रांतांत शिरलें. या प्रांतांतील लहानशा ब्रिटिश सेनेशी इटालियनांची सुमारें तीन आठवडे लढाई होऊन इंग्लिशांना तो प्रांत सोडावा लागला. जुलैच्या प्रारंभीं इटालियन पूर्व-आफ्रिकेंतून सूडान प्रांतावरहि इटालीची चढाई चालूं झाली होती. या चढाईमुळें सूडानच्या पूर्वसीमेवरील कस्साला आणि गलबत हीं ठाणीं ब्रिटिशांना सोडावीं लागलीं.

## ग्राझियानींच्या अपयशाचें दायित्व

सप्टेंबरमध्यें मार्शल ग्राझियानी यांनीं लिबियांतून आपल्या इजिप्तवरील चढाईचा प्रारंभ केला. ११ सप्टेंबरला इटालीच्या विमानदलानें सोल्लुम, सीदी बराणी आणि मर्सा मत्रुह या ठाण्यांवर पुनःपुनः बाँबवृष्टि केली. यानंतरच्या आठवड्यांत सोल्लूमचें ठाणें जिंकून सीदी बराणीजवळ इटालियन सैनिकांनीं ब्रिटिशांचा पराजय केला आणि तेंहि ठाणें हस्तगत केलें. या लढाईनंतर अनपेक्षित रीत्या मार्शल ग्राझियानींची चढाई थांबली आणि पुढें डिसेंबरमध्यें सर आर्चिबाल्ड वॅव्हेल यांनीं इटालियनांविरुद्ध प्रतिचढाई करीपर्यंत तेथें एकंदरीनें समसूमच होती. या घटनेसंबंधीं मी अनेक कंड्या ऐकल्या आहेत. पण इतिहासांत आधार दाखविल्यावांचून कंड्यांचा उल्लेख करतां येत नाहीं. निदान एक

गोष्ट या ठिकाणीं सांगतां येते. ती ही कीं युद्धाच्या उत्तरार्धांत इटालीचे राजे आणि मार्शल बादोल्लियो यांनीं सिन्योर मुस्सोलिनींना अटक केल्यानंतरसुद्धा मार्शल ग्राझियानी हे इटालीच्या नेत्यांच्या पक्षालाच चिकटून राहिले आणि इटालीच्या राजांना रोममधून हुसकून लावण्यांत त्यांनींच पुढाकार घेतला, तेव्हां सीदी बराणीच्या लढाईनंतर त्यांनीं आपण होऊन आपल्या युद्धयंत्राला खीळ घातली असेल ही गोष्ट संभवत नाहीं. मग युद्धविभागांतील त्यांचे वरिष्ठ म्हणजे बादोल्लियो आणि इटालीचे राजे यांनींच इटालियन सैन्याची गति खुंटविण्यांत पुढाकार घेतला असला पाहिजे, हें उघड आहे. या स्वारींत मार्शल ग्राझियानींचा सपशेल पराजय झाल्यानंतर त्यांनीं इटालियन सैन्यांतील आपल्या सार्‍या अधिकारपदांचें त्यागपत्र १९४१ च्या मार्चमध्यें दिलें आणि त्यानंतर त्यांनीं आपल्या राजांविरुद्ध शस्त्र उचलीपर्यंत राजकारणांत कोणताहि भाग घेतला नाहीं, ही गोष्ट लक्ष्यांत घेतली म्हणजे मार्शल ग्राझियानींच्या पराजयांत त्यांच्या स्वराष्ट्रद्रोही छत्रपतींचें अंग असावें असें वाटूं लागतें. कदाचित् प्रस्तुत ग्रंथाचा दुसरा खंड लिहिण्यापूर्वी इटालींतील त्या स्वराष्ट्रद्रोही छत्रपतींच्या कारस्थानाविषयीं अधिक माहिती उपलब्ध होईल.

## वॅव्हेल यांची चढाई

मार्शल ग्राझियानींच्या विरुद्ध सर आर्चिबाल्ड वॅव्हेल यांनीं केलेल्या चढाईची बरीच सविस्तर माहिती हिंदुस्थान सरकारनें प्रसिद्ध केली आहे. कारण य चढाईंत भारतीय सैन्यानें प्रामुख्यानें भाग घेतला होता. ही सारी माहिती वाचली म्हणजे एखाद्या मोगल बादशहाच्या सैन्यावरच इंग्रजांनीं हा छापा घातला होता कीं काय असें वाटतें. या चढाईंतील हालचालींना ८ डिसेंबरच्या सुमाराला प्रारंभ झाला, तेव्हां त्या रणक्षेत्रांत ‘ आंधी ’ म्हणजे धुळीचें वादळ चालूं होतें. या आंधीचा लाभ घेऊन इंग्रज सेनापतींनीं इटालियन सैन्याच्या विस्तृत छावणीवरच छापा घातला. या वेळीं भारतीय सैन्यानें इटालियनांच्या छावणींत शिरून गोळीबार करीपर्यंत त्यांना शत्रूंच्या आगमनाचा वाससुद्धा आला नव्हता. या छाप्यांत ब्रिटिशांनीं अत्यंत मोठे रणगाडे उपयोगांत आणले होते. या रणगाड्यांचें चिलखत इतकें जाड होतें कीं सामान्य तोफांच्या माऱ्याचा त्यांच्यावर कांहींच परिणाम होत नसे. त्यांतच इटालियनांचे सारे रणगाडे

पहिल्या छाप्यांतच निकामी करण्याची संधि इंग्रजांना मिळाली. इटालियन रणगाडे आपल्या छावणीच्या बाहेर स्वतःचाच एक कोट करून विश्रांति घेत असत. त्या रणगाड्यांच्या सैनिकांनीं तरी इतर सैन्यापेक्षा अधिक सावध रहावें, अशी इटालियन सेनापतींची अपेक्षा असेल. पण ती अपेक्षाहि चुकीची ठरली. हे सारे रणगाडे ब्रिटिशांनीं जागच्या जागींच पेटवून दिले. एकाहि रणगाड्यांतील रथी आणि सारथी आपल्या रथांत बसून युध्दाला बाहेर पडूं शकले नाहींत. इतका आकस्मिक छापा येऊं दिल्यानंतर इटालियन सैन्याला सपशेल शरण जाण्यावांचून अन्य मार्गच नव्हता. त्यांतून त्या वाळवंटांत केवळ ठराविक ठिकाणींच पाणी मिळूं शकतें. त्यामुळें ते पाणवठे शत्रूच्या हातीं गेले कीं विरुध्द पक्षाच्या सैनिकांना तहानेनें व्याकुळ होऊन शत्रूच्या स्वाधीन व्हावें लागतें. कारण त्या वाळवंटांत पायदळ सैनिकाला जिवंत निसटून जाणें शक्यच नसतें. निसटून जाण्याची आशा ज्यांच्या ताब्यांत मोटार असेल त्यांना. त्या मोटारी शत्रूच्या हातीं गेल्या म्हणजे त्यांच्यांतच बसून, पण शत्रूचे सैनिक नेतील त्या दिशेला जावें लागतें. यामुळें प्रत्यक्ष हातघाईच्या लढाईंत इटालियन सैनिक शूराप्रमाणें लढले, तरी वरिष्ठांच्या चुकांमुळें लढाई हरल्यानंतर त्यांना शरण जाण्यावांचून उपायच नसे. ही परिस्थिति पार्लमेंटच्या सभासदांना कळूं न देतां मि. चर्चिल यांनीं आपल्या भाषणांतून इटालियनांची शरण जाण्याच्या तत्परतेबद्दल यथेच्छ टवाळी केली आहे. पण कोणताहि युद्धतज्ज्ञ त्या दुर्दैवी सैनिकांच्याविषयीं तसले दुरुद्गार काढीत नाहीं.

## विश्वासघाताचा वाटा

इटालीच्या या पराजयांत विश्वासघाताचा वांटाहि बराच होता. सीदी बराणीच्या लढाईला तोंड लागल्यानंतर १६ डिसेंबरला बुकबुक येथील एक इटालियन डिव्हिजन जवळ जवळ न लढतांच शत्रूला शरण गेली. या शरणागतीच्या मुळाशीं विश्वासघाताचीं कारस्थानेंच असावींत असा संशय येतो. आफ्रिकेंतील लढायांत इटालियन सैनिक मनापासून लढत नसल्यामुळें आम्हांला सुलभतेनें विजय मिळत आहेत, असें स्वतः मि. चर्चिल यांनींच बोलून दाखविलें होतें. बुकबुक येथें शरण जाणारी इटालियन डिव्हिजन ही इटालीच्या नेहमींच्या खड्या सैन्यापैकीं होती. या शरणागतीच्या पूर्वीच ११ डिसेंबरला प्रत्यक्ष सीदी-

बराणीच्या छावणीचें संरक्षण करणाऱ्या इटालियन सैनिकांना शरण जावें लागलें. पण या छावणींतील सारे सैनिक फॅसिस्ट पक्षाचे स्वयंसेवक असल्यानें ते निकराच्या लढाईनंतर केवळ निरुपाय झाल्यावरच शरण गेले. ब्रिटिशांच्या हातीं सांपडल्यानंतर या डिव्हिजनचे प्रमुख जनरल गाल्लिना यांनीं फॅसिस्ट पक्षाच्या कीर्तींत भर टाकल्याबद्दल आपल्या सैनिकांचे आभारहि मानले. या आभारप्रदर्शनावरूनहि इटालीचें खडें सैन्य आणि फॅसिस्ट पक्षाचे स्वयंसेवक यांच्यामधील चुरशीची आणि वैमनस्याची थोडी कल्पना येते. बुकबुक येथील शरण जाणाऱ्या इटालियनांना पकडणारे ब्रिटिश सैनिक इतके थोडे होते कीं एकेका ब्रिटिश सैनिकाच्या ताब्यांत २०० ते ३०० इटालियन युद्धबंदी द्यावे लागले.

बुकबुकच्या शरणागतीनंतर इजिप्तमधील सोल्लूम हें शेवटचें ठाणेंहि ब्रिटिशांनीं जिंकून घेतलें. यानंतर प्रत्यक्ष इटालीच्या सत्तेखालील प्रांतांतून इटालियन सैन्याचा पाठलाग चालू झाला. आपल्या सीमेपासून अवघ्या १२ मैलांवर असलेल्या बार्दिया या दुर्गाचा इजिप्तमधून माघार घेणाऱ्या इटालियनांनीं आश्रय घेतला आणि ब्रिटिशांनीं त्याला पक्का वेढा घातला. हा वेढा उठविण्याचा मार्शल ग्राझियानींनीं प्रयत्नहि केला नाहीं. पण तें ठाणेंच अतिशय बळकट असल्यानें ब्रिटिशांना तें जानेवारीच्या पहिल्या आठवड्याच्या आधीं जिंकतां आलें नाहीं. या ठाण्यांत ब्रिटिशांना ४०००० युद्धबंदी आणि भरपूर युद्धसामुग्री यांचा लाभ झाला.

बार्दियाच्या पाडावानंतर ब्रिटिशांनीं अधिकच उत्साहानें माघार घेणाऱ्या इटालियनांचा पाठलाग आरंभिला. वाटेंत तोब्रूक बंदराच्या तटबंदीनें त्यांना सुमारें १५ दिवस थोपवून धरलें. पण २२ जानेवारीला तेथील सैन्यहि शरण आलें. त्यानंतर ३० जानेवारीला देर्ना बंदर ब्रिटिशांनीं जिंकलें. त्याच्या पुढच्या आठवड्यांत बेंगाझीचें बंदर आणि विमानतळ ब्रिटिशांच्या ताब्यांत आले. या दोन महिन्याच्या लढाईंत इटालीच्या सुमारें २॥ लक्ष सैन्याचा विध्वंस झाला आणि त्यापैकीं निदान १५०००० सैनिक शत्रूच्या अटकेंत पडले होते.

## कुचकामी नेतृत्व

मार्शल ग्राझियानींच्या या प्रचंड पराभवाचें एक कारण म्हणजे राजपक्षीयांचा विश्वासघात हें वर आलेंच आहे. पण त्यांतच स्वतः ग्राझियानींचे कुचकामी नेतृत्व

हेंहि एक पराजयाचें प्रमुख कारण होतें, याविषयीं शंका नाहीं. या अपयशाचीं कारणें सिन्योर मुस्सोलिनींना कळवितांना मार्शल ग्राझियानींनीं म्हटलें आहे कीं ब्रिटिशांची चढाई चालूं झाली तेव्हां इटालियन सेनाहि स्वतःच हल्ला चढविण्याच्या विचारांत असल्यामुळें बचावाला अनुकूल अशी व्यूहरचना तिनें केलेली नव्हती, म्हणून ती असुरक्षित स्थितींत ब्रिटिशांच्या आक्रमणाला बळी पडली. हें निमित्त युद्धतज्ज्ञांना कितपत पटतें, हें मला माहीत नाहीं. पण माझ्यासारख्या असामरिक इतिहासलेखकाला तरी त्यांत फारसा राम दिसत नाहीं. कारण शत्रूनें चढाईचें धोरण स्वीकारलें तरी मार्शल ग्राझियानींना प्रतिचढाई करण्याला त्यानें प्रतिबंध केलेला नव्हता आणि ते जर सर्वस्वीं असाबध नसते तर त्यांना लगेच प्रतिचढाई करतां आली असती. पण मला अशी शंका येते कीं त्यांच्या चढाईच्या योजना सिद्धच झाल्या नसाव्यात. आपल्या आक्रमक योजना परिपक्व होण्याच्या पूर्वी अर्वाचीन युद्धांत आपलें सैन्य संरक्षक व्यूहाच्या बाहेर काढावयाचें नसतें. युद्धाची उत्क्रांति होतां होतां आतां चढाई करणाऱ्या पक्षाला सर्व गोष्टी अनुकूल आणि बचाव करणाऱ्या पक्षाला साऱ्याच प्रतिकूल असण्याचें युग आलें आहे. यामुळें ज्याला शत्रूंवर तत्काळ हल्ला करावयाचा नसेल त्याला स्वतःच्या आणि प्रतिपक्षाच्या सैन्यांत अधिकांत अधिक अंतर ठेवावें लागतें. हा धडा फ्रान्सच्या लढाईनें जर मार्शल ग्राझियानींना शिकविला नसला तर मारखाऊ फ्रेंच सेनापतींच्यापेक्षा त्यांची योग्यता अधिक नव्हती असें म्हणावें लागतें. याच्या उलट फ्रान्सच्या लढाईचे धडे ब्रिटिश सेनापति फारच लौकर शिकले असें म्हटलें पाहिजे. सर आर्चिबाल्ड वॅव्हेल हे इंग्लंडच्या वरिष्ठ सेनापतींपैकीं एक होते. असल्या वरिष्ठांची सामान्य प्रवृत्ति अनुभवानें शहाणपण न शिकण्याचीच असते. त्यांतून इंग्लंड हें राष्ट्र अतिशय पुराणप्रिय म्हणून प्रसिद्ध आहे पण वस्तुस्थितीचें व्यवस्थितपणें आकलन करून आलेल्या प्रसंगांतून मार्ग काढण्याला ब्रिटिशांचा धिम्मेपणाच त्यांना उपयोगीं पडतो, असें म्हणावें लागतें.

## ब्रिटिशांची प्रयोगशाळा

लिबियाचें रणक्षेत्र म्हणजे ब्रिटिश सैन्याला अर्वाचीन युद्धाचें शिक्षण देण्याची प्रयोगशाळाच आहे, अशा भावनेनें सर आर्चिबाल्ड वॅव्हेल आणि त्यांचे इतर

सहकारी सेनापति वागत होते. फ्रान्सच्या लढाईंत जर्मनांनें त्यांना दाखविलेले मोर डावपेंच ते लिबियांत इटालियनांच्या विरुद्ध उपयोगांत आणून अनुभव घेत होते. अवजड रणगाड्यांचा उपयोग, पायदळ सैन्याला प्रत्यक्ष युद्धांत विमान-दळानें पाठिंबा देण्याची पद्धति, शत्रूला उसंत घेऊं न देतां पाठलाग करण्याचें शास्त्र, जर्मनांच्या हातीं नसलेल्या नौदलासारख्या शस्त्राचा भूमियुद्धांत उपयोग करण्याची रीत या सर्वांचे प्रयोग ब्रिटिशांनीं प्रथम मार्शल ग्राझियानींच्या सैन्यावरच करून पाहिले. या साऱ्या प्रयोगांत नवशिकेपणामुळें तेव्हां अनेक दोष राहून गेले होते, जर्मनांचे सारेच डावपेंच त्यांना अजून उमगले नव्हते, हें खरें आहे. ही वस्तुस्थिति मार्शल ग्राझियानींनीं आपल्या अपेशी नेतृत्वाचा त्याग केल्यानंतर सर आर्चिबाल्ड वॅव्हेल यांना लौकरच कळून आली. पण आफ्रिकेच्या रणांगणावर जनरल रोम्मेल अवतीर्ण झाल्यानंतरचा रोमहर्षण इतिहास याच्या पुढच्या खंडांतच सांगणें सोयीचें होईल. आफ्रिकेंतील इटालियन सैन्याचें नेतृत्व मार्शल ग्राझियानींनीं १९४१ च्या मार्च महिन्यांत सोडलें आणि तेव्हांपासून त्या स्वारीचीं सारीं सूत्रें सिन्योर मुस्सोलिनींनीं जनरल रोम्मेल यांच्या हातीं समर्पण केलीं. ही घटना घडून येण्यापूर्वी १९४० च्या नोव्हेंबरमध्यें इटालीनें युरोपांत ग्रीसवर हल्ला केला होता आणि तेथील अपेशी युद्धानें साऱ्याच इटा-लियन सेनापतींच्या तोंडाला काळोखी फासली होती. त्या इतिहासाकडे आतां आपल्याला वळलें पाहिजे.

तत्पूर्वी सर आर्चिबाल्ड वॅव्हेल यांच्या साहसी नेतृत्वाची थोडीशी कल्पना वाचकांना देणें आवश्यक आहे. त्यांनीं जेव्हां सीदीबराणीच्या आघाडीवर चढाई करण्याची हिंदी आणि ब्रिटिश सैन्याला आज्ञा दिली, तेव्हां त्या सैन्याच्या बरोबर अवघें पांच दिवस पुरेल इतकेंच पाणी होतें. मार्शल ग्राझियानींनीं थोडा अधिक सावधपणा बाळगला असता आणि साऱ्या इटालियन सैन्यानें अधिक निग्रहानें शत्रूंचा प्रतिकार केला असता तर या चढाईंत ब्रिटिशांना सपशेल माघार घ्यावी लागली असती. यासाठींच तर 'साहसे श्रीः प्रतिवसति' या वचनावर विश्वास ठेवावा लागतो.

: १८ :

# बाल्कन द्वीपकल्पांतील लढाई

इटालीची ग्रीसवरील स्वारी हें दुसऱ्या महायुध्दांतलें एक न उलगडलेलें कोडेंच आहे. जर्मनीच्या इच्छेविरुध्द मुस्सोलिनींनीं ही स्वारी केली होती, असें स्वतः हेर हिटलेर यांनींच एका भाषणांत सांगितलें होतें. ही गोष्ट लक्ष्यांत घेतली म्हणजे जर्मनीच्या युध्दयोजनांच्या दृष्टीनें या स्वारीची चिकित्सा करतां येत नाहीं. मुस्सोलिनींच्या हातीं इटालीचा राज्यकारभार आल्यानंतर लौकरच ग्रीसशीं भांडण उकरून काढून त्यांनीं कोर्फ्यू बेटावर तोफा डागल्या होत्या. या घटने-वरून ग्रीसचा कांटा काढण्याचा त्यांचा संकल्प जुनाच असावा, असें वाटतें. तरीसुद्धां इंग्रजांशीं आफ्रिकेंत युद्ध चालूं असतांना ग्रीसकडे सैन्य आणि युद्ध-सामुग्री वळविण्याचें प्रयोजन कळत नाहीं. कदाचित् १९३९ च्या एप्रिलमध्यें अल्बानियाचा प्रदेश जसा अचानक छापा घालून इटालीनें हस्तगत केला, तसाच ग्रीस देशहि युद्धावांचून हस्तगत करतां येईल, अशी मुस्सोलिनींची कल्पना असावी. तसें असल्यास अल्बानियाच्या स्वारीच्या पापाचें प्रायश्चित्त ग्रीसच्या स्वारींत त्यांना चांगलेंच मिळालें, असें म्हणावें लागेल.

## ग्रीसचे 'छोटे मोल्टके'

इतर सर्व बाल्कन राष्ट्रांप्रमाणेंच ग्रीस देशहि या वेळीं एका सर्वाधिकाऱ्यांच्या हातीं होता. ग्रीसमध्यें राजसत्तावादी आणि लोकसत्तावादी या पक्षांचीं भांडणें नेहमीं निकरानें चालूं असतात. यामुळें तेथें कधीं कधीं एखादा राजा राज्य करीत असला तरी त्याचा स्थानिक राजकारणावर फारसा प्रभाव पडत नाहीं. दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभीं ग्रीसचे सर्वाधिकारी जनरल मेटाक्सस हे होते. या सेनापतींचें सामरिक शिक्षण जर्मनींत झालें असून तिथें त्यांना 'छोटे मोल्टके' हें नामाभिधान मिळालें होतें. युरोपांतील युद्धतज्ज्ञांमध्यें कुशल सेनापति म्हणून त्यांनी प्रसिद्धि झाली होती. त्यांच्या हातीं सत्ता आल्यापासून त्यांनीं ग्रीसच्या सैन्यांत पुष्कळच सुधारणा घडवून आणल्या होत्या. अशा जागरूक सेनापतींच्या

देशावर अचानक छापा घालून तो हस्तगत करण्याचीं स्वप्नें मुस्सोलिनींना कशीं पडलीं, तें कळत नाहीं. पण तीं स्वप्नें सत्यसृष्टींत उतरविण्याची खटपट त्यांच्या कशी अंगलट आली, याचा आतां आपल्याला परिचय करून घ्यावयाचा आहे.

## इटालीचें सामरिक दौर्बल्य

ग्रीसवरील स्वारीसाठीं इटालीनें अल्बानियांत सरासरी १२ सेनाविभाग एकत्रित केले होते. स्वतः ग्रीसचें एकंदर सैन्य यापेक्षां थोडेंसेंच अधिक होतें. आणि तें सारेंच इटालीच्या विरुद्ध वापरणें अशक्य होतें. ऑक्टोबर २८ या दिवशीं पहाटें ग्रीसला अंतिम पत्र पाठवून इटालीनें लागलीच युद्धाला आरंभ केला. अल्बानियांत इटालीचा प्रवेश झाल्यापासून जनरल मेटाक्सस यांनी ग्रीसच्या संरक्षणाची सिद्धता आरंभिली होती. तिचा या अनपेक्षित स्वारीच्या प्रसंगीं त्यांना फार उपयोग झाला. नोव्हेंबरच्या दुसऱ्या आठवड्यांतच ग्रीक सैन्यानें इटालियन सैन्याची गति कुंठित केली आणि त्यानंतर लौकरच स्वारी करणाऱ्यांवरच बाजू उलटवून ग्रीसनें इटालीला मागें रेटण्याला प्रारंभ केला. वास्तविक पाहतां अल्बानिया आणि ग्रीस यांच्यामधील डोंगराळ प्रदेशांतून त्वरेनें प्रगति करण्याकरितां इटालीनें आपल्या वैमानिक दलाचा आणि नौदला-चाहि उपयोग करावयाला हवा होता. पण या दोनहि दलांवर मुस्सोलिनींनी पाण्यासारखा पैसा ओतला असूनसुद्धा त्यांचा इटालीला युद्धांत फारच थोडा उपयोग झाला. इटालीचा द्वेष ग्रीकांच्या मनांत पुरता बाणला असून स्वदेश-संरक्षणासंबंधीं त्या देशांत दुमत नव्हतें. यामुळें सारें ग्रीक सैन्य इटालीच्या विरुद्ध आपली पराकाष्ठा करीत होतें. उलटपक्षीं इटालींतील युद्धविभागाच्या वरिष्ठांना सूक्ष्मासूक्ष्म उपायांनीं मुस्सोलिनींचें उच्चाटन घडवून आणावयाचें असल्यानें लोकांमध्यें बोभाटा होऊं न देतां ते स्वतःच्या सैनिकांचा विश्वासघात करीत होते. अशा अनुकूल परिस्थितींतच ग्रीकांना इंग्रजांच्या कडून आधुनिक शस्त्रास्त्रेंहि मिळूं लागलीं. तेव्हां त्यांचा सदुपयोग करून ग्रीकांनीं इटालियनांना आपल्या सीमेंतून घालवून देऊन उलट त्यांचाच अल्बानियांत जोरांत पाठलाग आरंभिला.

## स्वारीचा अशुभ मुहूर्त

ग्रीसवरील स्वारीला इटालीच्या नेत्यांनीं निवडलेला दिवस हा त्यांच्या रोम-वरील चढाईचाच दिवस होता. हा दिवस ज्या प्रतिपक्षाशीं आपला गुप्त रीतीनें समेट झाला आहे, अशावर चालून जाण्याला जितका शुभ होता, तितकाच तो खरोखरीच्या शत्रूवर चालून जाण्याला अशुभ ठरला. पहिल्या महायुद्धांतील इटालीचा कापोरेत्तो येथें झालेला प्रचंड पराभवहि ऑक्टोबरच्या शेवटच्या आणि नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यांतच झाला होता. इटालियन चढाईच्या प्रारंभापासून रणक्षेत्रावरील डोंगराळ प्रदेशांत बर्फाच्या वादळांनीं धुमाकूळ मांडला. त्यामुळें इटालियन सैन्याला वाटणारा अल्पस्वल्प उत्साहहि गारठून गेला. या युद्धांत ग्रीसच्या 'छोट्या मोल्टकें'नींहि आपलें युध्दकौशल्य पूर्णपणें प्रकट केलें. अल्बानियांतून ग्रीसवर चढाई करण्याच्या घाईंत इटालियन सेनापतींनीं आग्नेयीकडे चढाई चालविली होती. या चढाईच्या पिछाडीवर उत्तरेकडून हल्ला करून स्वारीसैन्याला पेंचांत पकडणें ग्रीसला शक्य होतें; ही गोष्ट कदाचित् इटालियन सेनापतींच्या लक्ष्यांत आलीहि असेल. पण ग्रीसच्या क्षुद्र सैन्याकडून आपलें काय वाकडें होणार, या घमेंडींत त्यांनीं तिकडे दुर्लक्ष्य केलें असेल. इटालीची चढाई चालूं झाल्यानंतर लौकरच चढाई करणाऱ्या सैन्याचा मुख्य तळ जो कोरिट्झा, त्यावर ग्रीकांनीं उत्तरेकडून स्वारी केली. या दिशेच्या संरक्षणाकडे इटालियन सेनापतींनीं फारसें लक्ष्य दिलें नसल्यानें ग्रीकांची प्रतिचढाई मात्र यशस्वी झाली; आणि डिसेंबर महिन्यांत या भागांत इटालीची सतत आणि सार्वत्रिक पिछेहाट चालूं झाली. सरासरी सत्तर सहस्र इटालियन सैनिकांनीं कोरिट्झाच्या तळाचा बचाव करण्याचा प्रयत्न केला. पण 'छोट्या मोल्टकें'च्या सैन्यापुढें त्यांचा निभाव लागला नाहीं. या लढाईंत इटालियन सैन्याला आपली सारी साधनसामुग्री टाकून पळून जावें लागल्यामुळें ग्रीसला साध्या तोफा, विमानविनाशक तोफा, यांत्रिक तोफा, रणगाडे, मोटारी, दारूगोळा, गहूं आणि वस्त्रप्रावरणें यांची मोठीच लूट मिळाली. ग्रीकांना हा विजय मिळतांच अल्बानियांतील मुसलमान नागरिकांनीं इटालीविरुद्ध बंड केलें आणि वाहतुकींत अडथळे आणणें, पूल उडविणें, इटालियन सैनिकांवर छापे घालणें, घाटांतील कडे कोसळायला लावून त्याखालीं इटालियन सैन्याच्या तुकड्या चिरडून टाकणें इत्यादि

उद्योग त्यांनी आरंभिले. ग्रीकांना हा विजय मिळालेला पाहून इंग्रजांनीं त्यांना अडीच कोटि पौंडांचें कर्ज दिलें आणि ग्रीसच्या साहाय्याला पॅलेस्टाईनमधील वैमानिकदल धाडलें. या दलानें कोर्फ्यू बेटांत आणि अन्यत्र आपले तळ स्थापून इटालीच्या नगरांवर बॉंबवृष्टि आरंभिली. याच वेळीं ब्रिटिश नौदलाच्या विमानांनीं तारांतो येथील नाविक तळावर दडी देऊन बसलेल्या इटालीच्या युद्धनौकांवर टॉर्पेडोंचा मारा करून त्यांची मोठ्या प्रमाणावर नासधूस केली. ब्रिटिश विमानदलाच्या आगमनानें आणि इटालियन नौदलावर झालेल्या आघातामुळें अल्बानियांतील पराजित सैन्याला साहाय्य पाठविणें अधिकाधिक अवघड होऊं लागलें. ग्रीक सैनिक तर आपल्या राष्ट्रावर चढाई करून आलेल्या सैन्याला आड्रियाटिक समुद्रांत बुडविण्याच्या गोष्टी बोलूं लागले.

## ग्रीसला शस्त्रास्त्रांचा तुटवडा

कोरिट्झाच्या विजयानंतर १९४१ च्या जानेवारीपर्यंत ग्रीकांनी इटालियनांपासून प्रेम्राडेट्झ, आर्गुरोकास्ट्रोन, पोर्टो एड्डा, खिमारा, क्लिसुरा इत्यादि ठाणीं जिंकून घेतलीं. पुढें जानेवारीच्या मध्याला मारखाऊ इटालियन सैन्याला मोठ्या प्रमाणावर नव्या सैन्यांचें साहाय्य मिळालें आणि उलटपक्षीं ग्रीक सैन्याला चढाईच्या शस्त्रास्त्रांची उणीव जाणवूं लागली. या दोन कारणांमुळें ग्रीक सैन्याची प्रगति कुंठित झाली. तरीसुद्धां इटालीच्या सैन्याला फिरून कांहीं चढाईचें धोरण स्वीकारतां आलें नाहीं.

येथपर्यंत ग्रीक सैन्याला सर्वत्र विजयच मिळाल्यानें ग्रीक जनता हर्षभरित झाली होती. पण ग्रीसच्या राज्यकर्त्यांना आपली खरी परिस्थिति चांगली माहीत होती. इटालियनांचा पराजय करण्याकरितां त्यांनीं जर्मनीच्या डोळ्यावर येणार नाहीं, अशा प्रमाणांत ब्रिटिशांचें साहाय्य घेतलें होतें, वैमानिक आणि इतर तज्ज्ञ मिळून या वेळेपर्यंत सरासरी ५००० ब्रिटिश ग्रीसच्या साहाय्याला आले होते. आफ्रिकेंत माघार घेणाऱ्या इटालियनांनीं टाकून दिलेली युद्धसामुग्रीहि ब्रिटिशांनीं ग्रीसला पुरविली होती. जानेवारीच्या प्रारंभीं ब्रिटिश नौकांचा एक तांडाच ग्रीसच्या बंदरांत सुरक्षित पोंचला आणि त्यांनीं रणगाडे, ब्रेनबंदुका आणि इतर सर्व प्रकारची युद्धसामुग्री ग्रीसला पुरविली. या नौका पांतेल्लारिया बेटाजवळून येत असतांना जर्मन आणि इटालियन विमानदलांनीं त्याच्यावर

निकराचा हल्ला केला होता. या हल्लयांत त्या तांड्यांचें संरक्षण करणारी विमान-वाहक नौका इलस्ट्रियस आणि प्रहरी युद्धनौका साउथँप्टन यांची अतिशय मोड-तोड झाली. साउथँप्टनला तर ब्रिटिशांनीं स्वतःच जलसमाधि दिली.

## डॉक्टरांनीं गळा कापला

ग्रीसनें ब्रिटिशांकडून ही सारी युद्धसामुग्री पतकरली तरी ब्रिटिश सैन्याचें प्रत्यक्ष साहाय्य घेतलें नव्हतें; त्यामुळें अथेन्समधील जर्मन राजदूताचें वास्तव्यहि हललें नव्हतें. ही परिस्थिति फार दिवस टिकणार नाहीं, हें ग्रीक सरकारला कळत होतें. पण ग्रीस आणि जर्मनी यांच्यामधील देश व्यापण्याच्या पूर्वी छोट्या मोल्टकेविरुद्ध जर्मनीला युद्ध पुकारावयाचें नव्हतें. मग राजदूत नांवानें जो आपला एक उघड हेर अथेन्समध्यें ठेवतां येतो, तो इतक्यांत काढून घेण्याचें कारण नाहीं, असें जर्मनीनें ठरविलें होतें. यामुळें मि. अँथनी ईडन किंवा सर आर्चिबाल्ड वॅव्हेल यांसारखे इंग्रज नेते अथेन्सला येऊन कोणतीं कारस्थानें करीत आहेत याचा शोध जर्मनांना घेतां येत होता. यांपैकीं सर आर्चिबाल्ड यांची दुसरी भेट ग्रीसला अत्यंत अशुभसूचक ठरली. कारण या भेटीनंतर एकदोन दिवसांतच २९ जानेवारीला जनरल मेटाक्सस यांचें देहावसान झालें. ग्रीसच्या या सर्वाधिकाऱ्यांना स्वर्गलोकीं पाठविण्याचें श्रेय ग्रीक डॉक्टरांनींच मिळविलें. घशावर एक किरकोळ शस्त्रक्रिया करण्याच्या प्रसंगीं त्यांनीं आपल्या नेताजींचा सपशेल गळा कापला आणि जर्मनीला ग्रीसविरुद्ध युद्ध पुकारण्याचा मार्ग मोकळा करून दिला.

## परक्या सैन्याचें विष

तत्पूर्वी जर्मनीनें रुमानिया, बल्गारियाप्रभृति देश आपल्या सैनिकांकडून व्यापण्याचा उपक्रम आरंभिला होता. एखाद्या परक्या देशाला आपल्या सैनिकांचें स्वागत करायला शिकविण्याचें काम नेहमींच अवघड असतें. व्यक्तीला ज्याप्रमाणें एखाद्या रोगाचें प्रतिबंधक विष टोचावयाचें असल्यास प्रथम अल्प प्रमाणांत तें विष टोचून तिच्या शरिराला त्या विषाची सवय करावी लागते; त्याप्रमाणेंच परक्या राष्ट्रांत प्रथम तज्ज्ञ म्हणून थोडे अधिकारी पाठवावे लागतात. ते खपत नाहींसे झाल्यावर आणखी कांहीं तज्ज्ञ आणि त्यांच्याच

बरोबर कांही सृष्टिसौंदर्याचे भोक्ते प्रवासी धाडावे लागतात. त्यानंतर त्या पर-राष्ट्रांतील विमानतळ आपल्या वैमानिकांनीं व्यापून सरतेशेवटीं मोठ्या प्रमाणावर सैनिक भरावयाचे असतात. ही सारी प्रक्रिया जर्मनीनें प्रथम रुमानियांत आणि नंतर बल्गारियांत करून दाखविली.

## बल्गारियावर रशियाचा डोळा

या दोन बाल्कन राष्ट्रांपैकीं रुमानियाचा कांहीं प्रदेश रशियानें नुकताच लुबाडला होता, त्यामुळें त्या देशातलें जर्मन सैनिकांचें आगमन स्थानिक लोकांना अप्रिय नव्हतें. पण बल्गारियांत प्रथमपासून रशियाविषयीं आपलेपणाची भावना असल्यानें तेथील लोक जर्मनांना स्वतःच्या घरांत घेण्याला सिद्ध नव्हते. पण जर्मनीला तर बल्गारिया व्यापण्यावांचून गत्यंतरच नव्हतें. कारण बल्गारिया व्यापण्याचा रशियाचा निश्चय मो. मोलोटोफ यांनीं थोड्याच दिवसांपूर्वी हेर हिटलेर यांच्याशीं बोलतांना व्यक्त केला होता. त्यामुळें रशियन सैन्य बल्गारियांत शिरण्यापूर्वीच जर्मन सैन्यानें तो देश व्यापणें आवश्यक होतें. रशियाच्या आगमनाबरोबर बल्गारियांतील राजघराण्याचें आणि तेथील राज्यकर्त्या वर्गाचें निर्दलन होणार हें निश्चित असल्यानें त्यांनाहि जर्मन सैन्याचें आगमन इष्टच होतें. डिसेंबर महिन्यांत रशियानें बोरिस राजांशीं परस्पर-साहाय्याचा संधि करण्याची सिद्धता व्यक्त केली होती आणि रशियाच्या हस्तकांनीं बोरिस राजांची या संधीला मान्यता मिळण्याकरितां आंदोलन आरंभिलें होतें. हें आंदोलन चालूं झाल्यावर बल्गेरियन सरकारानें कम्युनिस्टांना अटक केली आणि जर्मनीशीं बोलणीं आरंभिलीं. १ जानेवारीला बल्गारियाचे मुख्य प्रधान मो. फिलोफ हे व्हिएन्नाला गेले आणि तेथें रशियाच्या आक्रमणापासून जर्मनीनें बल्गारियाचा बचाव करण्यासंबंधीं वाटाघाटी झाल्या. पुढें ४ फेब्रुवारीला बल्गेरियन सरकारानें जर्मनीला मिळण्याचें निश्चित केलें असल्याची वार्ता आली; त्याबरोबर रशिया, इंग्लंड, तुर्कस्थान इत्यादि देशांतून अस्वस्थता उत्पन्न झाली; पण बोरिस राजांविरुद्ध सैन्य पाठविण्याचा रशियाला धीर झाला नाहीं. त्यामुळें त्या सर्व राष्ट्रांच्या विरोधाला न जुमानतां बल्गेरियन सरकारानें क्रमाक्रमानें जर्मन सैन्य आपल्या घरांत घेतलें. यासाठीं मार्चच्या आरंभीं इंग्लंडनें बल्गारियांतून आपला राजदूत काढून घेतला.

## युगोस्लाव्हियाशीं समेटाचा प्रयत्न

रुमानिया आणि बल्गारिया यांच्यानंतर युगोस्लाव्हियाचा प्रश्न सोडविणें जर्मनीला भाग होतें. या देशांतील जनतेंत जर्मनांचा द्वेष पूर्वीपासून दृढमूल झाला होता. त्यामुळें जर्मनीशीं कोणत्याहि प्रकारचें सहकार्य करण्याला त्यांचा विरोध होता. जर्मनीनें जेव्हां युगोस्लाव्हियाच्या सरकाराला रशियाविरोधी संघांत समाविष्ट होण्याची सूचना केली, तेव्हां या संघाला विरोध करण्याकरितां तेथील सरकारानें दहा लक्ष सैन्याची जमवाजमव केली. उलटपक्षीं जर्मनीला, ग्रीसनें केलेल्या इटालीच्या पराभवामुळें त्या देशाविरुद्ध युद्ध पुकारणें अपरिहार्य झालें होतें आणि त्या देशांत जर्मन सैन्य पाठविण्यापूर्वी ग्रीसच्या वाटेवरील दहा लक्ष युगोस्लाव्ह सैन्याचें भय दूर करणें आवश्यक होतें. युगोस्लाव्हियाशीं युद्ध जुंपल्यास त्या युद्धांत हंगारीचें आपल्याला साहाय्य मिळण्याची जर्मनीनें तेथील सरकाराशीं बोलणीं करून निश्चिति करून घेतली आणि मग युगोस्लाव्हियाच्या सरकारावर दडपण आणण्याला प्रारंभ केला. युगोस्लाव्ह जनता कट्टी जर्मनद्वेष्टी असली तरी तेथिल सरकाराला इतपत जाणीव होती कीं जर्मनीच्या युद्धयंत्राविरुद्ध आपल्या दहा लक्ष सैनिकांच्या बाहुबलाचा कांहींहि उपयोग होणार नाहीं. यामुळें युगोस्लाव्हियाचे राजपालक प्रिन्स पॉल यांनीं जर्मनीला शरण जाण्याचें निश्चित केलें. या निश्चयाप्रमाणें २३ मार्चला युगोस्लाव्हिया आणि जर्मनी यांच्यामधील संधीवर उभयपक्षांची स्वाक्षरी झाली.

## जर्मनीविरुद्ध उठावणी

पण जर्मनीशीं मैत्री करण्याची कल्पना युगोस्लाव्ह जनतेंत अत्यंत अप्रिय असल्यामुळें या संधीच्या पाठोपाठच तेथील सेनाधिकाऱ्यांनीं राजपालकांविरुद्ध बंड करून सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली आणि आपले अल्पवयी राजे पीटर हे वयांत येण्यापूर्वीच राज्याचीं सूत्रें त्यांच्या हातीं दिलीं. या उठावणींत युगोस्लाव्हियांतील रशियाचे पक्षपाती, इंग्लंडचे पक्षपाती आणि स्वतः युगोस्लाव्ह राष्ट्राचे पक्षपाती या सर्वांचें संगनमत झालें होतें. यांपैकीं रशियाच्या पक्षपात्यांनीं युद्धसमाप्तीपूर्वीच इतर दोन पक्षांचा पुरता कांटा काढला. वास्तविक पाहतां राष्ट्रवादी आणि समाजसत्तावादी हे परस्परांचे कट्टे शत्रु, पण युगोस्लाव्हियांतील राष्ट्रवाद्यांना तव्हां ही कल्पना आली नाहीं कीं जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारून आपण

सत्ताभ्रष्ट झालों कीं समाजसत्तावादी आपला सहज संहार करूं शकतील, इतकेंच नव्हे तर त्यांच्या तत्वज्ञानाला अनुसरून ते आपला संहार करतीलच. असो. तो सारा इतिहास पुढें यावयाचाच आहे. युगोस्लाव्हियांतील राष्ट्रवाद्यांनीं आपल्याशीं सहकार्य करावें, यासाठीं रशियानें त्यांना सालोनिकाच्या बंदरांतून शस्त्रास्त्रें आणि विमानें पुरविण्याचें अभिवचन दिलें होतें. प्रिन्स पॉलविरुद्ध बंड करून अस्तित्वांत आलेल्या सरकाराशीं रशियानें ५ एप्रिलला मोठ्या तातडीनें अनाक्रमणाचा संधि केला आणि त्या सरकारला आपला नैतिक पाठिंबा दिला. रशियापेक्षांहि ब्रिटनच्या साहाय्यावर या वेळीं युगोस्लाव्हियांतील राष्ट्रवाद्यांचा अधिक भरंवसा होता. एप्रिलच्या पहिल्या आठवड्यांत जर्मनीशीं वैर उत्पन्न होण्याचा धोका पत्करून ग्रीसनें ६०००० ब्रिटिश सैन्य आपल्या घरांत घेतलें होतें. ग्रीसमधील ब्रिटिश विमानदलाचीहि अशीच मोठ्या प्रमाणावर वाढ झाली होती. या घटनांची अर्थात् युगोस्लाव्हियाच्या नव्या सरकाराला जाणीव होती आणि ग्रीसमधील ब्रिटिश सैन्य लौकरच आपल्या साहाय्याला येईल, अशी त्या सरकारची अपेक्षा होती.

## ईडनचीं कारस्थानें

जर्मनीची युगोस्लाव्हियावर स्वारी होण्यापूर्वीच्या ब्रिटिशांच्या कारस्थानांची थोडी अधिक माहिती ९ एप्रिलच्या मि. चर्चिल यांच्या भाषणावरून मिळते. १९४१ च्या फेब्रुवारींत मि. ॲंथनी ईडन आणि सर जॉन डिल्ह हे उभयतां अथेन्सला गेले असतां जर्मनीच्या विरुद्ध तुर्कस्थान, ग्रीस आणि युगोस्लाव्हिया या तीन देशांना उठाविण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. जर्मनीची वसंत ऋतूंतील स्वारीची सिद्धता होण्यापूर्वी युगोस्लाव्हियानें इटालीविरुद्ध शस्त्र उचलून ग्रीसच्या साहाय्यानें प्रथमपासूनच लढाईंत मन नसलेल्या इटालियन सैन्याचा निःपात करावा आणि मग तुर्कस्थान, ग्रीस, युगोस्लाव्हिया आणि इंग्लंड यांच्या संयुक्त सैन्यांनिशीं जर्मनीला तोंड द्यावें असा मि. ईडन यांचा युगोस्लाव्हियाच्या राजपालकांना आग्रह चालला होता. याच कामाकरितां अंकारा येथें जाऊन तुर्कस्थानच्या नेत्यांचीहि त्यांनीं आपल्या योजनेला संमति मिळविली होती. प्रिन्स पॉल हे इंग्लंडचे महाभक्त असले तरी इंग्लंडच्या वतीनें युद्धांत पडण्याचे परिणाम काय होतील, याची त्यांना अतिशय चांगली कल्पना होती. यामुळें मि. ईडन

यांना त्यांनीं बेलग्राडला येऊं देण्याचेंच नाकारलें. तरीसुद्धां बाल्कन प्रदेशांतच लढाई जुंपल्यास आज नाहीं उद्यां रशिया आपल्या बाजूनें युद्धांत पडेल, अशी आशा वाटत असल्यानें ग्रीसमध्यें ब्रिटिश सैन्य उतरविण्याचें मि. ईडन यांनीं निश्चित केलें आणि या निश्चयाप्रमाणें मार्च महिन्यांतच ब्रिटिश सैन्य त्या देशांत उतरूं लागलें. या ब्रिटिश सैन्याच्या आगमनानेंहि युगोस्लाव्हियाच्या सेनापतींना आपल्या राजपालकांविरुद्ध बंडाळी करण्याचा धीर झाला असेल.

## अविस्मरणीय प्रात्यक्षिक

ही सारी सिद्धता चालली असल्याची वार्ता जर्मनीला अविदित नसल्यामुळें ६ एप्रिलला जर्मनीनें युगोस्लाव्हियावर अकस्मात् स्वारी केली. स्वारीच्या प्रारंभींच जर्मन विमानांनीं बेलग्राड आणि इतर प्रमुख नगरांवर बाँबगोळ्यांचा वर्षाव करून त्यांचा विध्वंस केला. विमानांच्या पाठोपाठच जर्मन सैन्यानेंहि चढाई आरंभिली. या चढाईसाठीं जर्मनीनें पायदळाचे २० सेनाविभाग, यंत्रचालित सैन्याचे चार सेनाविभाग आणि रणगाड्यांचे सहा सेनाविभाग इतकें सैन्य वापरलें. उलटपक्षीं एकट्या युगोस्लाव्हियानेंच या वेळीं दहा लक्ष सैनिक एकत्रित केले होते. त्याव्यतिरिक्त ग्रीस आणि इंग्लंड यांचीं सैन्येंहि प्रस्तुत लढाईंत समाविष्ट झालीं तीं वेगळींच. युगोस्लाव्हियाकडे विमानें अगदीं थोडीं होतीं आणि रणगाडे मुळींच नव्हते म्हटलें तरी चालेल. पण बाल्कन द्वीपकल्पांतील डोंगराळ प्रदेशांत रणगाड्यांचा उपयोग होऊं शकेल, असा तेव्हां कुणालाच भरंवसा नव्हता आणि रणगाड्यांच्या जोरावर जर्मनीला आपल्यावर मात करतां येणार नाहीं, अशा समजुतीमुळें तर युगोस्लाव्हियाच्या जनतेला जर्मनीविरुद्ध शस्त्र उचलण्याचा धीर झाला होता. वास्तविक पाहतां पोलंडच्या लढाईंतहि दुर्गम घाटांतून रणगाड्यांच्या तुकड्या नेऊनच जर्मनीनें त्या देशाच्या आघाडीवरील सैन्यांच्या पिछाडीवर हल्ला करून त्याचा चक्काचूर केला होता. पण फ्रान्सच्या लढाईनंतर पोलंडमधील वरील अनुभव सामान्य सेनापति विसरून गेले होते. यामुळें युगोस्लाव्हियाच्या लढाईंत फील्ड मार्शल लिस्ट यांनीं तीच क्लृप्ति दुसऱ्यांदा वापरून दुर्गम प्रदेशांतहि रणगाड्यांच्या जोरावर लढाई कशी जिंकतां येते याचें अविस्मरणीय प्रात्यक्षिक संयुक्त राष्ट्रांच्या सेनापतींना दाखविलें.

## युगोस्लाव्हियाचा विध्वंस

जर्मनीचा आपल्यावर लौकरच हल्ला होणार, याची युगोस्लाव्हियाच्या सेनापतींना जाणीव होती. पण तो उत्तरेकडून ऑस्ट्रियाहंगारींतून येईल, अशी त्यांची अपेक्षा होती. यासाठीं त्यांनीं आपलें मुख्य सैन्य उत्तरेला ठेविलें होतें आणि उत्तरसीमेवर सर्वत्र रणगाड्यांच्यासाठीं सापळे सिध्द करून ते शत्रूच्या आक्रमणाची प्रतीक्षा करीत होते. पण फील्डमार्शल लिस्ट यांनीं आयत्या वेळीं अगदींच अनपेक्षित दिशेनें आपल्या स्वारीचा प्रारंभ केला. वर सांगितलेंच आहे कीं रशियानें युगोस्लाव्हियाला सालोनिका बंदराच्या मार्गानें विमानें, शस्त्रास्त्रें आणि इतर साहाय्य देण्याचें अभिवचन दिलें होतें. सालोनिका बंदरापासून युगोस्लाव्हियाच्या उस्कुब आणि निश या प्रमुख नगरांकडे लोहमार्ग जात होता. यासाठीं युगोस्लाव्हियाचा बाहेरील जगाशीं असलेला संबंध तोडण्याकरितां जर्मन रणगाड्यांनीं उस्कुब, निश आणि सालोनिका यांच्याच रोखानें आपली चढाई आरंभिली. हा सारा प्रदेश इतका डोंगराळ आहे कीं उस्कुब किंवा निश यांच्यावर चाल करून जाणें पायदळालासुद्धां जवळ जवळ अशक्यच मानलें जातें. त्यामुळें रणगाड्यांची स्वारी या भागांत होण्याची युगोस्लाव्हियाच्या सेनापतींना मुळींसुद्धा धास्ती वाटत नव्हती. अशा अवघड प्रदेशांतूनच जर्मनांनीं चार वेगवेगळया वाटांनीं एकाच वेळीं चढाई आरंभिली. बल्गारियाची राजधानी सोफिया, हिच्या पश्चिमेकडून निश नगरीकडे एका सैन्यानें चढाई करून खालीं उस्कुब आणि सालोनिका यांच्याकडे जाणारा लोहमार्ग तोडून टाकला. प्रत्यक्ष बल्गारियांतून उस्कुब नगरीकडे दोन भिन्न भिन्न मार्गांनीं सैन्यें चालून गेलीं. पण याव्यतिरिक्त आणखी एका सैन्याला स्ट्रुमिट्झा खोऱ्यांतून दक्षिणेकडे खालीं जाऊन सालोनिका बंदर जिंकणें आणि त्याच सैन्याच्या दुसऱ्या दोन तुकड्यांना उस्कुब आणि अल्बानिया यांच्यावर चालून जाणें हीं कामें सांगितलीं होतीं. जर्मन रणगाड्यांची चढाई चालूं होतांच युगोस्लाव्हियाचे नेते इतके भयचकित होऊन गेले कीं दोन दिवस युद्धपत्रिका प्रसिद्ध करण्याचासुद्धा त्यांना धीर झाला नाहीं. शेवटीं आठ एप्रिलला युगोस्लाव्ह सैन्यानें शत्रूंचे सर्व हल्ले परतविले असल्याची त्यांनीं घोषणा केली. पण त्यांच्या दुर्दैवानें त्याच दिवशीं ग्रीक युद्धपत्रिकेनें युगोस्लाव्हियाचा सपशेल पराजय होऊन ग्रीसची बगल उघडी पडली अस-

ल्याचें प्रसिद्ध केलें. दुसऱ्याच दिवशीं जर्मन सैन्यानें सालोनिका बंदर जिंकलें. या दिवशीं युगोस्लाव्हियानें आपला पराजय होऊन उस्कुब नगर शत्रूच्या हातीं पडलें असल्याचें मान्य केलें. या भागांत जर्मनांनीं २०००० सैनिक आणि सहा सेनापति पकडले. त्याच दिवशीं फोन क्लाइस्ट यांच्या रणगाडादलानें निश नगर जिंकलें. १० एप्रिलला युगोस्लाव्ह सैनिकांची सर्वत्र ससेहोलपट चालू झाली. जनरल फोन वाइक्स यांच्या सैन्यानें क्रोट वस्तीचा सारा प्रांत जिंकून तेथें स्वतंत्र क्रोट सरकाराची स्थापना केली. त्याव्यतिरिक्त युगोस्लाव्हियाचा उत्तर भागहि जर्मनांनीं जिंकला.' दक्षिण भागांतील उरल्यासुरल्या युगोस्लाव्ह सैन्याचा क्रिव्होलाक येथें पराजय झाला. ग्रीसच्या सीमेजवळचें मोनॅस्टिर नगरहि जर्मनांच्या हातीं पडलें आणि त्या खोऱ्यांतून प्रगति करून त्यांनीं ब्रिटिश सैन्याविरुद्ध चढाई आरंभिली. निश, उस्कुब आणि मोनॅस्टिर हीं सर्व केंद्रें हातीं आल्यानें दक्षिण युगोस्लाव्हियांतील सर्व लोहपथ जर्मनांच्या ताब्यांत आला आणि शत्रूच्या तीन सैन्यांचा संपूर्ण विध्वंस झाला. उत्तरेला बेलग्राडचें संरक्षण करणाऱ्या युगोस्लाव्ह सैन्याच्या पिछाडीवर जर्मनांनीं हल्ला आरंभिला होता. याच वेळीं, क्रोट लोकांचें स्वतंत्र राज्य प्रस्थापित झाल्यामुळें युगोस्लाव्हियाचें अस्तित्व उरलें नसल्याचें निमित्त सांगून हंगारीचे राष्ट्रपाल ॲडमिरल हॉर्थी यांनीं त्या देशांतील हंगेरियन जनतेचें संरक्षण करण्याकरितां युगोस्लाव्हियावर स्वारी केली. हें नवें तंत्र पोलंडच्या वांटणींत भाग घेण्याच्या प्रसंगीं रशियानें प्रथम वापरलें होतें, हें वाचकांच्या लक्ष्यांत असेलच. या नव्या स्वारीला युगोस्लाव्हियाकडून इतका अल्प अडथळा झाला कीं अशा परिस्थितींत पूर्वी गमावलेले प्रांत परत मिळविण्याचा मोह न आवरल्याबद्दल हंगारीला कोणीच दोष देणार नाहीं. १२-१३ एप्रिल या दोन दिवशीं युगोस्लाव्ह सैनिकांनीं आपली राजधानी बेलग्राड शत्रूच्या हातीं पडूं न देण्यासाठीं आपली पराकाष्ठा केली. पण क्लाइस्टच्या सैन्यापुढें त्यांचा निभाव न लागून १३ एप्रिल या जालियनवाला बागेंतील संहाराच्या अशुभ दिवशींच बेलग्राड नगरीचें स्मशाननगरींत रूपांतर झालें. बेलग्राडनंतर युगोस्लाव्ह सरकारानें पहिल्या महायुद्धाचें निमित्तकारण बनलेल्या सेराजेव्हो नगरीं आपली राजधानी नेली. पण १६ एप्रिलला जर्मनांनीं तेंहि नगर जिंकल्यामुळें तीन आठवड्यांपूर्वीच गादीवर आलेले पीटर राजे देशोधडीला लागले. १७ एप्रिलच्या मध्यरात्रीं उरलेसुरले युगोस्लाव्हियाचे

सैनिक जर्मनीला शरण आले आणि त्या देशांतील युद्ध थांबलें असल्याची घोषणा झाली.

## ब्रिटिश रणनीतीचें वैशिष्ट्य

युगोस्लाव्हियांतील युद्धसमाप्तीनंतर ग्रीसमध्यें उतरलेल्या ब्रिटिशांचा निःपात करण्याकडे जर्मनीनें लक्ष्य वळविलें. ग्रीसमधील युद्धाचीं सविस्तर वर्णनें इंग्रजांनीं लिहिलीं आहेत. पण तीं सारीं वाचल्यानंतरसुद्धा प्रस्तुत लेखकाला त्यांत वर्णन करण्याजोगें कांहीं आढळलें नाहीं. हा केवळ लेखकाचा दोष नसून एकंदर ब्रिटिश रणनीतीचाच दोष आहे. ब्रिटिश सैन्य जेव्हां युद्धाप्रीत्यर्थ परदेशीं जातें तेव्हांपासूनच तें आपल्या परत जाण्याच्या मार्गाच्या सुरक्षिततेची काळजी वहात असते. माघार हें आमच्या रणनीतीचें वैशिष्ट्य आहे, असें ब्रिटिश सेनापति स्वतःच सांगत असतात. असल्या वैशिष्ट्यपूर्ण पद्धतीचा जे सतत उपयोग करीत असतात, त्यांच्या लढायांतून इतर डावपेंचांना फारच थोडें स्थान मिळतें; त्यामुळें मोनॅस्टीरच्या आघाडीवरून थर्मापेलीच्या ऐतिहासिक आघाडीपर्यंत ब्रिटिशांनीं कशी माघार घेतली आणि तेथूनहि माघार घेऊन अथेन्स, कॉरिंथ-प्रभृति इतिहासप्रसिध्द नगरें जर्मनांना अर्पण करून ते क्रीटला कसे आले याचें सविस्तर वर्णन करण्याची आवश्यकता वाटत नाहीं. ग्रीसवर जर्मनांची स्वारी चालू होतांच ग्रीसचे मेटाक्ससनंतरचे प्रधान मो. कोरिझिस हे एकाएकीं मृत्यु पावले. त्यानंतर तीन दिवस प्रधानपदाचीं वस्त्रें पत्करण्याला कोणीच पुढारी सिध्द होईना. सरतेशेवटीं मो. त्सुदेरोस यांनीं ग्रीसचें प्रधानपद पतकरलें. सर्व महत्त्वाचीं नगरें जर्मनांनीं जिंकल्यानें ग्रीसचें मंत्रिमंडळ आणि राजे यांनीं क्रीटला प्रयाण केलें.

## जर्मनीच्या शौर्याची कसोटी

ग्रीसमधून बाहेर पडलेलें बहुतेक सारें ब्रिटिश सैन्य क्रीटमध्येंच जाऊन उतरलें असावें, अशी शंका येते. क्रीटवरील वादविवादांत त्या द्वीपावर ब्रिटिशांचें २५ ते ३० सहस्र सैन्य होतें असें मि. चार्चिल यांनीं बोलून दाखविलें होतें. पण तेव्हांच त्यांनीं असेंहि सांगितलें होतें कीं हा आंकडा थोडा खोटा आहे. यांत किती भर घालायची तें वाचकांनींच ठरवावें. या सैन्याला ग्रीक

सैनिकांचें साहाय्य झालें आणि पुढें जर्मनांचें त्या द्वीपावर आक्रमण चालू झाल्यानंतर क्रीटमधील बहुसंख्य जनतेनेंहि जर्मनांविरुध्द लढण्यांत भाग घेतला. या साऱ्या परिस्थितीची जर्मनांना फारच चांगली कल्पना असल्यानें त्यांनीं आपली संपूर्ण सिध्दता होण्यापूर्वी त्या द्वीपावर चढाई केलीच नाहीं. यामुळें बाल्कन द्वीपकल्पाची लढाई संपल्यानंतर तीन आठवड्यांनीं म्हणजे १९ मेला त्यांनीं क्रीटवरील वैमानिक आक्रमणाला आरंभ केला. जर्मनीच्या नॉर्वेवरील स्वारीपेक्षांहि क्रीटवरील स्वारी अधिक साहसाची होती. कारण नॉर्वेवरील आक्रमणांत जर्मनांना तेथील सरकाराच्या असावधपणाचा आणि क्विसलिंग-पक्षाच्या देशद्रोहाचाहि लाभ घेतां आला होता. क्रीटवरील स्वारी तेथील संरक्षकांना अनपेक्षित नव्हती आणि त्यांच्यांत एखादा विश्वासघातकी पक्षहि अस्तित्वांत नव्हता. पुन्हां या स्वारींत जर्मनांना त्यांच्या तोफखान्याचा आणि रणगाड्यांचाहि उपयोग होण्यासारखा नव्हता. या स्वारीपर्यंतचे त्यांचे सारे विजय मुख्यतः रणगाड्यांच्या प्रभावामुळें त्यांना मिळाले होते. त्यामुळें जिथें जर्मन रणगाड्यांचा समावेश होऊं शकत नाहीं, तिथल्या लढायांतून त्या देशाचा पराभव झालाच पाहिजे अशी पुष्कळांची समजूत झाली होती. पण ही समजूत क्रीटच्या घनघोर लढाईनें सपशेल खोटी ठरविली. या लढाईत जर्मनीच्या सैनिकांच्या वीरवृत्तीची खरी परीक्षा झाली असें म्हणतां येईल. छत्रीधारी सैनिकांनीं विमानांतून खालीं उडी घेतली कीं वाऱ्याबरोबर वहात असतांना त्यांना कोणीहि गोळ्या घालून ठार मारावें. भुईला पाय टेकल्यावरहि ज्यांनीं त्यांना आकाशांतून उतरतांना पाहिलें असेल, त्यांनीं त्यांची निःशंकपणें शिकार करावी. अशा वेळीं त्यांना आधार काय तो एकच असतो. तो म्हणजे स्वपक्षाच्या विमानांनीं परपक्षाच्या भूमिदलाची हालचाल बंद पाडणें हाच होय. पण विमानांच्या आक्रमणामुळें परपक्षाची हालचाल अल्पकाळपर्यंतच थांबू शकते. थोड्या वेळानंतर विमानांना परत आपल्या तळावर जावें लागतें आणि हे तळ जितके दूर असतील तितक्याच प्रमाणांत शत्रूची हालचाल बंद पाडण्याच्या कामांत त्यांना अपयश येतें. क्रीटवरील आक्रमणाच्या पहिल्या दिवशीं जर्मनांनीं २० मे च्या पहाटे दोन वाजल्यापासून संध्याकाळीं काळोख पडेपर्यंत सरासरी तीन सहस्रांवर छत्रीधारी सैनिक उतरविले, पण त्यांतले निदान १८०० सैनिक आणि अधिकारी त्याच दिवशीं शत्रूच्या तावडींत सांपडून ठार, घायाळ किंवा

युध्दबंदी झाले, असें ब्रिटिश सेनापति सांगतात. त्यावरून तेथील युध्दाच्या तीव्रतेची थोडीबहुत कल्पना येईल.

## क्रीटवरील भीषण युद्ध

पहिल्या दिवशीं जर्मनांनीं क्रीटची राजधानी कानी आणि पूर्वीची राजधानी कांडिया या नगरांवर आकाशांतून सैन्य उतरविलें. या दोनहि नगरांशेजारीं महत्त्वाचे विमानतळ होते. पैकीं दोन दिवसांच्या युद्धानंतर कानीशेजारचा तळ मालेमे हा जर्मनांच्या हातीं आला; पण क्रीटची राजधानी कांहीं त्यांच्या हातीं लागली नाहीं. उलटपक्षीं कांडिया नगरी जर्मनांना जिंकतां आली, पण तेथील सैनिकांनीं हेराक्लिओनचा विमानतळ आपल्या हातचा जाऊं दिला नाहीं. कांडिया नगरी समुद्रतीरावर असल्यानें ती हातीं येतांच जर्मनांनीं लहान लहान रबरी नौकांतून सैनिक भरून त्यांना कांडियाकडे धाडलें. पण ब्रिटिश युद्धनौकांनी यां-पैकीं बहुतेक नावा हेरून बुडवून टाकल्यामुळें सहस्रावधि जर्मन सैनिक पाताल-पुरींतील नागकन्यांच्या किंवा मत्स्यकन्यांच्या भेटीला गेले. या अनुभवानंतर जर्मनांनीं वरुणापेक्षां वायूवरच अधिक विश्वास ठेवून आकाशमार्गानेंच सैन्य उतर-विण्यावर सारा भर दिला. आकाशांतून छत्रीधारी सैनिक तर उतरतच होते. पण मालेमेचा विमानतळ हातीं आल्यामुळें सैन्यवाहक विमानें त्या तळांवर उतरूं लागलीं. एका सैनिकानें म्हटलें आहे कीं, प्रत्येक मिनिटाला नवें विमान येऊन उतरत होतें. ही अर्थात् अतिशयोक्ति होती. सैन्य वाहून नेण्याकरितां जर्मनांनीं एकच फेरी करण्याला योग्य अशीं लाकडीं विमानेंहि केलीं होतीं. असलीं विमानें तळ नसलेल्या स्थळीं आदळून सैनिक उतरविले जात होते. या-व्यतिरिक्त यंत्रहीन विमानांतूनहि ( ग्लायडर ) जर्मन सैन्य येत होतें. या विविध साधनांचा उपयोग करून जर्मनांनीं १२ दिवसांत सरासरी २५ ते ३० सहस्र सैन्य क्रीटमध्यें उतरविलें. हें सैन्य ब्रिटिश सेन्यापेक्षा कमी तर होतेंच; पुन्हां यांतील पुष्कळसे सैनिक उतरल्याबरोबर मारले जात असल्यानें बारा दिवसांच्या भगीरथ प्रयत्नानंतर सुद्धा बहुधा १५००० पेक्षा आधिक सैनिक जर्मन सेनाप-तींच्या हाताखालीं नसावेत. तेव्हां बारा दिवसांच्या लढाईंतील भीषण संहारा-नंतरसुद्धा ब्रिटिशांचे १७००० सैनिक जिवंत राहिले होते. कारण इतक्या सैनि-कांना सोडविल्याची वार्ता मि. चर्चिल यांनी पार्लमेंटांत सांगितली होती. ब्रिटिश

सैन्य संख्येनें वरिष्ठ असून त्याला तोफा आणि रणगाडे यांचेंहि साहाय्य होतें. उलटपक्षीं जर्मनांना सारीच अन्नसामुग्री आणि युद्धसामुग्री विमानांतून आणावी लागत असल्यानें त्यांच्याजवळ युध्दसाधनांचें वैपुल्य नव्हतें, हें सांगायलाच नको. नाहीं म्हणायला आकाशाचें प्रभुत्व तेवढें जर्मनांकडे होतें. पण भूमीवर लढणारीं सैन्यें एकमेकांत इतकीं मिसळलेलीं असत कीं लढाईंत दंग झालेल्या जर्मनांनाहि जवळ जवळ ब्रिटिशांइतकाच आपल्या विमानांपासून धोका होता. अशा परिस्थितींत जर्मनांना केवळ आपल्या युध्दकौशल्याच्या जोरावर क्रीट जिंकावें लागलें, याविषयीं संशय नाहीं.

## जॉर्ज राजांचें पलायन

वर उल्लेखिल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशींच्या लढाईंत मालेमेचा विमानतळ जर्मनांच्या हातीं पडला. तेव्हां तिसऱ्या दिवशीं ब्रिटिश सैन्यानें तो परत मिळविण्याकरितां अतिशय निकराचे हल्ले आरंभिले आणि त्या विमानतळावर तोफांचा भडिमार चालू केला. या तोफा जर्मनांच्या सूर मारणाऱ्या विमानांनीं लौकरच बंद पाडल्या, तेव्हां उभय पक्षांच्या सैनिकांना समान शस्त्रांनीं लढण्याची संधि सांपडली. साऱ्या दिवसभर ब्रिटिशांनीं मालेमेचा विमानतळ जिंकण्यासाठीं आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली. पण जर्मन सैनिकांनीं तो कांहीं आपल्या हातांतून जाऊं दिला नाहीं. या पराभवापासून इंग्रजांची विजयाची आशा नष्ट झाली. पुढें नऊ दिवस जरी त्यांनीं क्रीटची लढाई नेहमीच्या धीरानें चालविली तरी त्यांचें सारें लक्ष्य आपली सुटका करणाऱ्या नौका केव्हां येणार आहेत, इकडेच लागलें होतें.

पण इंग्लंडच्या प्रधानांना प्रथम आपल्या सैनिकांपेक्षा अधिक महत्त्वाच्या कांहीं व्यक्तींना वाचविणें भाग होतें. मालेमेला लागूनच कानी ही क्रीटची राजधानी होती आणि या राजधानींतच तेव्हां ग्रीसचे जॉर्ज राजे आपल्या प्रधानमंडळासह रहात होते. ते जर जर्मनांच्या हातीं पडले तर जर्मनीला युद्धकाळांत ग्रीस देश संभाळणें पुष्कळच सोपें जाणार होतें. याकरितां मालेमेचा विमानतळ जिंकल्यापासून जर्मनीच्या छत्रीधारी सैनिकांनीं जॉर्ज राजांच्या निवासस्थानावरच आकाशांतून उतरून त्यांना धरून नेण्याचे प्रयत्न चालविले होते. एकदां तर छापा घालणारे जर्मन सैनिक जॉर्ज राजांच्या घरांत शिरण्यापूर्वी नुकतेच ते

तेथून दुसरीकडे गेले होते. या अनुभवानंतर ब्रिटिश सेनापतींनीं त्यांना तत्काळ गुप्तपणें हलवून क्रीटच्या अंतर्भागांत नेलें आणि अगदीं गुप्त अशा बंदरांतून त्यांना नौकेवर चढवून इजिप्तला धाडून दिलें. जॉर्ज राजांची सुटका झाल्याची वार्ता २४ मे या दिवशीं प्रसिद्ध झाली. त्यानंतर क्रीटच्या लढाईंत ब्रिटिशांच्या दृष्टीनें कांहींच जीव उरला नव्हता. २६ मेच्या दिवशीं क्रीटमध्यें उतरलेल्या जर्मनांना पाहिल्या प्रथम सबंध रेजिमेंटचा व्यूह रचून शत्रूंवर आक्रमण करण्याची संधि मिळाली. यावरून यापूर्वीची लढाई किती संकुचित जागेंत चालली होती याची वाचकांना कल्पना येईल. इतकी सवड सांपडल्यावर जर्मन सेनापतींनीं कानीवर संघटित हल्ले करून तेथील ब्रिटिश सैन्याला पिटाळून लावलें. या पराभवानंतर लौकरच म्हणजे १ जूनला ब्रिटिश सैन्य क्रीट सोडून गेल्याचें पत्रक ब्रिटिश नौदलाच्या अधिपतींनीं प्रसिद्ध केलें.

## आकाशस्वारीचा धोका

क्रीटच्या युद्धांत ब्रिटिशांचे निदान १५००० सैनिक ठार, घायाळ किंवा युद्धबंदी झाल्याचें त्यांच्या युद्धविभागानें मान्य केलें. यांत पुन्हा त्यांच्याच पक्षाच्या ग्रीकांच्या हानीचीहि भर घातली पाहिजे. याव्यतिरिक्त क्रीटभोंवतालच्या समुद्रांत ब्रिटिशांच्या चार प्रहरी नौका आणि सहा विनाशिका जर्मन विमानांच्या आक्रमणाला बळी पडल्या. या अनुभवावरून जनरल फ्रांको यांनीं असा अभिप्राय व्यक्त केला, कीं इतःपर विमानदलापुढें नौदलाचा निभाव लागणार नाहीं. हा सिद्धांत खरा होता. मात्र यांत इतकीच भर टाकणें आवश्यक होतें कीं महासागरांत संचार करणाऱ्या नौदलाचा संहार विमानवाहक नौकांवरीलच विमानांकडून होऊं शकतो. आकास्मिक छाप्यांपासून विमानतळांचें संरक्षण करणें शक्य आहे कीं नाहीं, असाहि एक वाद या युद्धापासून उद्भवला. अर्थात् विमानतळासन्निध भरपूर सैन्य नसलें तर आकास्मिक आक्रमण करणाऱ्या छत्रीधारी सैनिकांपासून विमानतळांचें संरक्षण करणें अशक्य आहे, असेंच कोणाचेंहि मत होईल. मात्र इथें ही गोष्ट गृहीत धरली आहे कीं बचाव करणाऱ्या सैनिकांना स्वपक्षाच्या विमानदलाकडून थोड्या विलंबानें कां होईना पण संरक्षण मिळण्याचा संभव आहे. आकाशाचें आधिपत्य जर सर्वस्वीं शत्रूकडे

गेलें असलें तर त्याच्या आक्रमणापासून आत्मसंरक्षण करून घेण्याचे प्रयत्न आज नाहीं उद्यां वायां जावयाचेच.

## रशीदअलीशीं युद्ध

असो, याच वेळीं घडलेल्या दुसऱ्या कांहीं घटनांचाहि उल्लेख याच प्रकरणांत केला पाहिजे. कारण या घटनांसाठीं वेगळें प्रकरण करावें तर या संक्षिप्त इतिहासांत त्यांना प्रमाणाबाहेर महत्त्व दिल्यासारखें होईल. उलटपक्षीं मुळींच उल्लेख न करण्याइतक्या त्या क्षुद्राहि नाहींत. यांपैकीं पहिली घटना म्हणजे इराकमधील ब्रिटिशविरोधी पक्षाचें बंड होय. इराकला जरी इंग्रजांनीं नांवाचें स्वातंत्र्य दिलें असलें तरी तेथील मंत्रिमंडळानें आपल्या तंत्रानें वागावें, याकरितां ते हवे ते उपाय योजण्याला मागेंपुढें पहात नाहींत. यावेळीं इराकचे मुख्य प्रधान रशीद-अली हे ब्रिटिशांच्या तंत्रानें वागेनासे झाले म्हणून त्यांना अधिकारच्युत कर-ण्याची आज्ञा ब्रिटिशांनीं त्या नामधारी स्वतंत्र राष्ट्राला सोडली. या आज्ञेप्रमाणें रशीद अलींनीं प्रथम आपला अधिकार सोडला. पण पुढें कांहीं दिवसांनीं कट्टा ब्रिटिशविरोधी असा एक पक्ष संघटित करून त्यांनीं अचानक एके दिवशीं इंग्र-जांचा हस्तक बनलेल्या नव्या मुख्य प्रधानाला पदच्युत करून सर्व सत्ता परत आपल्या हातीं घेतली. तेव्हां ब्रिटिशांनीं बसऱ्याला सैन्य उतरवून तें बंदर ताब्यांत घेतलें. या आक्रमणाला उत्तर देण्याकरितां रशीदअलींच्या सैनिकांनीं बगदाद येथील ब्रिटिशांच्या ताब्यांत असलेल्या हब्बानियाच्या विमानतळाला वेढा घालून तेथील ब्रिटिश सैनिकांवर तोफा डागल्या. अशा रीतीनें इराक आणि इंग्लंड यांचें एक छोटें युद्धच तेव्हां जुंपलें. या युद्धांत आपल्याला जर्मनीचें साहाय्य होईल, अशी रशीदअलींची अपेक्षा होती. पण इराकांत जर्मनांचा प्रवेश झाल्या-नंतर तुर्कस्थानाच्या मनांत आपल्याविषयीं किंतु येईल या भीतीनें जर्मनीनें इराकांतिल भानगडींत पूर्ण तटस्थता स्वीकारली. यामुळें पुढें लौकरच ब्रिटि-शांनीं रशीदअलींचा कांटा काढून इराक देश पूर्ववत् आपल्या प्रभावक्षेत्रांत खेंचून आणला.

## हेसब्रिस्मार्कचीं साहसें

या वेळीं तुर्कांचें शत्रुत्व टाळण्याची जर्मनीला उत्सुकता असण्याचें मुख्य




जर्मन साम्राज्य १९४१ (पृ. २१७)

कारण म्हणजे जर्मनीच्या नेत्यांनीं रशियाविरुद्ध लौकरच युद्ध पुकारण्याचा निश्चय केला होता, हें होय. या युद्धांत तुर्कस्थानानें आपल्या वतीनें भाग घेतला नाहीं तरी त्यानें निदान तटस्थ रहावें अशी जर्मनीची खटपट चालली होती आणि ती लौकरच यशस्वीहि झाली. याच भावी रूसोजर्मन युद्धांत इंग्लंडनेंहि तटस्थता धारण करावी अशी जर्मनींतील एका प्रमुख पक्षाची इच्छा होती. ही तटस्थ राहण्याची कल्पना चर्चिल अधिकारावर असेपर्यंत विचारांत घेण्याच्या-हि योग्यतेची नव्हती. तरीसुद्धां मेच्या दुसऱ्या आठवड्यांत हेर हिटलेर यांचे एकनिष्ठ हनुमान हेर हेस हे एका विमानांत बसून एकटेच स्कॉटलंडला निघून गेले. तेथें ड्यूक ऑफ हॅमिल्टन यांची भेट घेण्याचा त्यांचा विचार होता. पण त्यांच्या विमानाला किरकोळ अपघात झाल्यामुळें त्यांना शत्रूच्या स्वाधीन व्हावें लागलें. हेर हेस हे जर्मनीच्या नेत्यांशीं भाडून इंग्लंडला आले असल्याच्या कंड्या तेव्हां इंग्रजांनीं प्रचारासाठीं उठविल्या. पण त्या साऱ्या खोट्या असल्याचें मागाहून आपोआपच सिद्ध झालें. हेर हेस यांना इंग्लंडशीं समेटाचीं बोलणीं चालू करतां आलीं नाहींत, तेव्हां इंग्लंडला समेटाची आवश्यकता पटविण्या-साठीं हेर हिटलेर यांनीं जर्मनीची ३५००० टनांची एकुलती एक युद्धनौका अटलांटिक महासागरांत पाठवून तेथील व्यापारी नौकांची वाहतूक थांबविण्याचा प्रयत्न केला. बिस्मार्कच्या बरोबर प्रिन्स आयगेन ही १०००० टनांची प्रहरी युद्धनौका होती. या जर्मन युद्धनौकांची आइसलंड आणि ग्रीनलंड यांच्यामधील डेन्मार्कच्या सामुद्रधुनींत ब्रिटिश नौदलाशीं गांठ पडली. तेव्हां इंग्लंडच्या प्रिन्स ऑफ वेल्स आणि ॲडमिरल हूड या अनुक्रमें ३५००० आणि ४२००० टनांच्या युद्धनौकांनीं बिस्मार्कवर तोफा डागल्या. या तोफांच्या भडिमाराला बिस्मार्कनें तेरा मैलांवरून प्रत्युत्तर देतांच ॲडमिरल हूडवरील दारूगोळयाच्या कोठारांतच गोळे पडून तेथें प्रचंड स्फोट झाला. त्याबरोबर ॲडमिरल हूडच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडून ती आपल्या साऱ्या नौसैनिकांसह तत्काळ रसातळाला गेली. या वेळीं प्रिन्स ऑफ वेल्सलाहि थोडा फार मार बसला होता. उलटपक्षीं शत्रूचे कांहीं गोळे बिस्मार्कलाहि लागले, पण त्या युद्धनौकेवर त्यांचा विशेषसा परि-णाम झाला नव्हता. या झटापटीनंतर बिस्मार्क आणि आयगेन या युद्धनौकांनीं शत्रूंना झुकांडी देऊन अटलांटिक महासागरांत प्रवेश केला. ही घटना २३-२४ मेला शुक्रवारीं रात्रीं घडली. ॲडमिरल हूडसारखी प्रचंड युद्धनौका बिस्मा-

केनें एका निमिषांत बुडविल्यामुळें ब्रिटिश नौदलांतील विमानांनीं बिस्मार्कचा अगदीं पिच्छा पुरविला. सरतेशेवटीं शनिवारीं रात्रीं एका ब्रिटिश विमानाला बिस्मार्कवर टॉर्पेडो सोडून तिचा वेग कमी करण्यांत यश आलें. पण याच वेळीं समुद्रावरील वातावरण बिघडल्यामुळें विमानांना बिस्मार्क युद्धनौका दिसेनाशी झाली. या धुक्यांत भटकतांना प्रिन्स आयगेन आणि बिस्मार्क यांचीहि ताटा-तूट झाली. पुढें पंधरा दिवसांनीं प्रिन्स आयगेन ब्रेस्त बंदरीं येऊन पोंचली. पण आपल्या बरोबरीच्या युध्दनौकेप्रमाणें बिस्मार्कवरील अधिकाऱ्यांनीं अटलांटिक महासागरांत दडी मारण्याचें सोडून ब्रेस्त बंदराकडे परत येण्याचा प्रयत्न केला. या प्रयत्नांत ती इंग्लंडपासून सरासरी ४५० मैल अंतरावर सांपडून विमानें आणि विनाशिका यांच्यावरील टॉर्पेडोंच्या साहाय्यानें बुडविली गेली. युध्दारंभीं 'ग्राफ स्पे'सारखी सामान्य युद्धनौका बुडविल्याबद्दल जर इंग्लंडमध्यें विजयो-त्सव झाला होता तर बिस्मार्क बुडविल्यामुळें चर्चिल आणि मंडळी यांना हर्ष-वायु झाला असल्यास नवल नाहीं. ॲडमिरल टिरपिट्झ सिध्द होण्यापूर्वीच बिस्मार्कला अभिमन्यूप्रमाणें जवळ जवळ एकाकीच शत्रुव्यूहांत धाडण्याचें साहस राजकीय कारणांकरितां हेर हिटलेर यांना करावें लागलें, हें वर सांगि-तलेंच आहे. पण बिस्मार्कच्या प्रमुखानें ती युध्दनौका इतक्या लौकर बंदराकडे कां परत आणली, याचें कारण अद्यापि उजेडांत आलें नाहीं. बिस्मार्कच्या अप-मृत्यूमुळें इंग्लंडला समेट करावयाला लावण्याचा हेर हिटलेर यांचा डाव फसला आणि पश्चिम युरोपाच्या संरक्षणासाठीं जर्मनी रशियाशीं झुंजत असतांना इंग्लंड पाश्चात्य संस्कृतीचा विश्वासघात करणार हें निश्चित झालें. जगाच्या इतिहासां-तील या दारुणतम रणाला २२ जून १९४१ या दिवशीं प्रारंभ झाला. रूसोजर्मन युध्दारंभापासूनच दुसऱ्या महायुध्दाला विश्वव्यापी स्वरूप प्राप्त झालें. याकरितां येथेंच दुसऱ्या महायुध्दाचा पूर्वार्ध संपविणें उचित होईल.



# महायुद्धांतील महत्त्वाच्या घटना

ता. सप्टेंबर १९३९.

१ जर्मनीनें पोलंडविरुद्ध युद्ध पुकारलें.

३ इंग्लंड आणि फ्रान्स यांनीं जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें.

४ ब्रिटिश विमानदलाची जर्मनविर पहिली स्वारी.

६ जर्मन विमानदलाची इंग्लंडला परतभेट. क्रॅकौचा पाडाव. ब्रिटिश सैन्याचें फ्रान्समध्यें आगमन.

७ वेस्टेरप्लाटचा पाडाव.

१४ डांझिगशेजारचें पोलिश बंदर जर्मनीनें जिंकलें.

१६ ब्रिटिश व्यापारी नौकांचा टोळ्यांनीं प्रवास चालूं झाला. जर्मनांनीं प्रेझमिस्ल घेतलें.

१७ रशियन सैन्याचा पोलंडमध्यें प्रवेश. करेजस ही इंग्लंडची विमानवाहक नौका बुडाली.

१९ रशियाचा व्हिल्नांत प्रवेश. हिटलेरची डांझिगला भेट.

२४ रुमानियाच्या मुख्य प्रधानांची लोहपथकाकडून हत्या.

२७ वार्साचा पाडाव.

२९ पोलंडची जर्मनी आणि रशिया यांच्यांत वांटणी. एस्टोनियाचें रशियापुढें लोटांगण.

ता. ऑक्टोबर १९३९

२ ब्रिटिश विमानदलाची बेर्लिनला भेट.

५ लाटव्हियाचें रशियापुढें लोटांगण.

६ हिटलेरचें आपण युद्ध थांबविण्याला उत्सुक असल्याचें भाषण.

१० लिथुआनियाचें रशियापुढें लोटांगण.

१४ स्कापाफ्लोच्या नाविक तळांत प्रवेश मिळवून जर्मन पाणबुडीनें रॉयल ओक ही युद्धनौका बुडविली.

१७ जर्मन विमानहल्ल्यांमुळें 'आयर्न ड्यूक' ही युद्धनौका नादुरुस्त. तुर्कस्थाननें रशियाशीं संधि करण्याचें नाकारलें.

१९ तुर्कस्थानाचा इंग्लंड-फ्रान्सशीं परस्परसाहाय्याचा संधि.
२७ अमेरिकेनें शस्त्रांच्या निर्यातीवरील निर्बंध काढून टाकला.

## ता. नोव्हेंबर १९३९

३ अमेरिकेच्या तटस्थतानिर्बंधांत बदल.
७ बेल्जमचे राजे लिओपोल्ड आणि हॉलंडची राणी विल्हेल्मिना यांची युद्ध थांबविण्याची संयुक्त विनंति.
८ म्यूनिच येथें हिटलेरच्या भाषणाच्यानंतर बॉंबस्फोट. या स्फोटा-पूर्वीच हिटलेर तेथून अन्यत्र गेल्यामुळें बचावतो.
९ बेल्जियन सीमेवर इंग्लंडचे प्रमुख हेर बेस्ट आणि स्टीव्हन्स यांना जर्मनांकडून अटक.
१३ रशिया आणि फिन्लंड यांच्यांतील संधीचीं बोलणीं थांबलीं.
२४ डायशलांडनें रावळपिंडी युद्धनौका बुडविली.
२६ रशियाचे फिन्लंडवर आरोप.
३० फिन्लंडवर रशियन सैन्याची स्वारी.

## ता. डिसेंबर १९३९

१ फिन्लंडसाठीं तोतया सरकाराची रशियांत स्थापना.
१३ प्लेट नदीच्या मुखाशीं झालेल्या लढाईंत ग्राफ स्पे या जर्मन युद्ध-नौकेचा विध्वंस झाला.
१४ फिन्लंडवरील स्वारीनिमित्त राष्ट्रसंघाकडून रशियाचा निषेध.
१७ ग्राफ स्पे या युद्धनौकेनें स्वतःलां बुडवून घेतलें.
२३ रशियाचे फिन्लंडमधलि सार्वत्रिक पराभव.
२४ पोपमहाराजांची शांतता प्रस्थापित करण्यासंबंधीं प्रार्थना.

## ता. जानेवारी १९४०

५ इंग्लंडचे युद्धमंत्रि होअर बेलिशा यांचें त्यागपत्र.
८ इंग्लंडांत शिधापद्धतीचा प्रारंभ.

ता. फेब्रुवारी

१ फिन्लंडमध्यें रशियन चढाई चालूं.

९ प्रे. रूझव्हेल्ट यांचे विशेष दूत मि. सम्नर वेलिस युरोपांत येणार असल्याची घोषणा.

२५ सम्नर वेलिस रोममध्यें.

ता. मार्च

१ सम्नर वेलिस बेर्लिनला जातात.

१२ रशिया आणि फिन्लंड यांचा संधि.

१८ हिटलेर आणि मुस्सोलिनी यांची ब्रेन्नेर खिंडींत भेट.

२० दालादिएमंत्रिमंडळाचें पतन.

२१ मो. रेनो नवें मंत्रिमंडळ बनवितात.

२८ संयुक्त राष्ट्रांच्या युद्धश्रेष्ठींची बैठक.

ता. एप्रिल १९४०

५ जर्मनीला नॉर्वेच्या समुद्रकांठानें प्रवास करूं न देण्याचा निश्चय अँग्लोफ्रेंच सरकारांनीं नॉर्वेच्या सरकाराला कळविला.

८ नॉर्वेच्या समुद्रतीराजवळ ब्रिटिशांनीं पाणसुरुंग पेरले.

९ जर्मनीची नॉर्वे आणि डेन्मार्क यांच्यावर स्वारी. आइसलंड द्वीपानें तात्पुरतें स्वातंत्र्य पुकारलें.

१० नार्व्हिकची पहिली लढाई.

११ जर्मनांनीं जिंकलेल्या नॉर्वेच्या विमानतळांवर ब्रिटिशांचे विमानहल्ले.

१३ नार्व्हिकची दुसरी लढाई.

१४ नामसोस येथें अँग्लोफ्रेंच सैन्य उतरलें.

१७ आदाल्सनेस येथें ब्रिटिश सैन्य उतरलें.

१८ ब्रिटिश आणि नॉर्वेजियन सैन्याचा संगम.

२३ जर्मनांनीं लिलहामेर येथील लढाईंत ब्रिटिशांचा पराभव केला.

२५ ट्रॉंढहाइम पासून नॉर्वेपर्यंतचा लोहपथ जर्मनांनीं जिंकला.

२६ अँग्लोफ्रेंचांची नॉर्वेमध्यें माघार चालूं.

| ता. | मे १९४० |
|---|---|
| २ | आंदाल्सनेस येथें उतरलेलें ब्रिटिश सैन्य परत फिरलें. |
| ३ | नामसोसमधीलहि सैन्य परत फिरलें. |
| ८ | ब्रिटिश पार्लमेंटांत नॉर्वेच्या माघारीवर चर्चा होऊन तींत चेंबरलेनचा विजय. |
| ९ | ब्रिटिश सैन्यानें आइसलँड व्यापलें. |
| १० | जर्मनीची पश्चिम युरोपांतील सार्वत्रिक चढाई चालूं. चेंबरलेनचें त्यागपत्र. चर्चिल प्रधानमंत्रि. |
| ११ | एबेन एमाएलचा पाडाव. |
| १३ | डच सरकार इंग्लंडला पळून गेलें. |
| १४ | जर्मनांचा रॉटरडॅमवरील बॉंबहल्ला, हॉलंडची शरणागति. |
| १४ | जर्मनांची पारीसकडे प्रगति. |
| १६ | पारीसमध्यें सैनिकी सत्तेचें राज्य. |
| १७ | जर्मनीनें ब्रुसेल्स घेतलें. बेल्जियन सरकार ओस्तेंदला गेलें. |
| १८ | अँटवर्पचा पाडाव. |
| १९ | जनरल वेगां हे मुख्य सेनापति होतात. |
| २१ | जर्मनसैन्य इंग्लिशखाडीवरील आबेव्हिल बंदरांत शिरलें. आरास आणि आमियां यांचा पाडाव. |
| २३ | जर्मनसैन्य बूलोन्यला पोंचलें. |
| २५ | कालेवर जर्मनसैन्याचा हल्ला. |
| २८ | लिओपोल्ड राजांची शरणागति. |
| २९ | ढुंकेर्कच्या लढाईचा प्रारंभ. अँग्लो-फ्रेंचांनीं नार्व्हिक घेतलें. |

| ता. | जून १९४० |
|---|---|
| १ | दक्षिण फ्रान्सवर जर्मनविमानदलाचा हल्ला |
| ४ | ब्रिटिश सैन्य ढुंकेर्क सोडून घरीं गेलें. जर्मनांचा ढुंकेर्कमध्यें प्रवेश. |
| ५ | सोमनदीवरील लढाईचा प्रारंभ. |
| ७ | अँग्लोफ्रेंचांची सार्वत्रिक माघार. |
| ८ | फ्रान्सच्या आघाडीचा चक्काचूर. |

९ जर्मनीनें रशॉ घेतलें.
१० इटालीनें अँग्लोफ्रेंचांविरुद्ध युद्ध पुकारलें.
१२ जर्मनांनीं मार्न नदी ओलांडली.
१४ जर्मनीनें पारीस नगरी हस्तगत केली.; स्पेननें तांजीर बंदर कबजांत घेतलें.
१६ रेनोमंत्रिमंडळाचा पाडाव. मार्शल पेतँ प्रधानमंत्रि.
१७ फ्रान्सची शस्त्रसंधीची मागणी.
१८ हिटलेर आणि मुस्सोलिनी हे फ्रान्सच्या मागणीसंबंधीं चर्चा करतात.
२० फ्रान्सनें इटालीकडेहि शस्त्रसंधीची मागणी केली.
२१ हिटलेरची फ्रेंच प्रतिनिधींशीं चर्चा.
२२ फ्रान्स आणि जर्मनी यांच्यांतील शस्त्रसंधि.
२३ जेनेराल द गोल यांनीं स्वतंत्र फ्रान्सची समिति स्थापली.
२४ इटाली आणि फ्रान्स यांच्यांतील शस्त्रसंधि.
२६ रशियाचा रुमानियाला बेसारेबिया आणि उत्तर ब्युकोव्हिना प्रांत देण्यासंबंधीं निर्वाणीचा संदेश.
२७ रुमानियानें बेसारेबिया आणि उत्तर ब्युकोव्हिना प्रांत रशियाला समर्पण केले.
२८ इंग्लंडनें इंग्लिश खाडींतील बेटांतून सैन्य काढून घेतलें.

ता. **जुलै १९४०**

१ इंग्लंडनें दिलेल्या निरुपयोगी हमीचा रुमानियानें त्याग केला.
३ ब्रिटिश बंदरांतील फ्रेंच युद्धनौका इंग्लंडनें आपल्या ताब्यांत घेतल्या. त्याचप्रमाणें आफ्रिकेंतील ओरान बंदरांतील फ्रेंच युद्धनौकांचा विध्वंस केला.
५ फ्रान्सनें इंग्लंडशीं असलेले राजनैतिक संबंध तोडले. फ्रेंच विमानांचा जिब्राल्टरवर हल्ला.
८ फ्रेंचांची रिशलीय ही युद्धनौका इंग्लंडनें निकामी केली.
९ अलेक्झांड्रियांतलि फ्रेंच युद्धनौका इंग्लंडनें निःशस्त्र केल्या.

१९ ब्रिटनला युद्ध थांबविण्याची हेर हिटलेर यांची सूचना.
२१ बाल्टिक समुद्रतीरावरील देशांनीं आपल्याला रशियन साम्राज्यांत समाविष्ट करून घेण्याची मागणी केली.
सर्व अमेरिकन राष्ट्रांची परिषद हॅवाना येथें चालूं.
२४ रुमानियन सरकारानें आपल्या देशांतील खनिज तेलाचे कारखाने स्वतःच्या ताब्यांत घेतले.
२६ रुमानियाच्या प्रतिनिधींची हिटलेर आणि रिब्बेनट्रोप यांच्याशी चर्चा.
२७ बल्गारियाच्या प्रतिनिधींशीं हिटलेरची चर्चा.

ता. ## ऑगस्ट १९४०

४ इटालीची सोमालीलँडवर स्वारी.
८ ब्रिटनवरील वैमानिक हल्ल्यांचा प्रारंभ.
९ रुमानियाची दक्षिण दोब्रुजा प्रांत बल्गारियाला देण्याला संमति.
१३ ब्रिटिश हमीचा त्याग करण्याबद्दल इटालीची ग्रीसकडे मागणी.
१४ उत्तर इटालीवर ब्रिटिश विमानांचा हल्ला.
१५ इटालीनें ग्रीक प्रहरी नौका बुडविली.
१६ ग्रीक नौकांवर इटालियन विमानांचा बाँबहल्ला.
१९ ब्रिटिशांची सोमालीलँडमधून माघार.
२० चर्चिलची अमेरिकेला तळ देण्याची सिद्धता.
२२ जर्मनीचा लंडनवरील पहिला विमानहल्ला.
२५ ब्रिटिश विमानांचा बेर्लिनवरील पहिला विमानहल्ला.
२६ बाल्टिक समुद्रतीरावरील देश रशियांत समाविष्ट.
३० ट्रान्सिल्व्हानियाची हंगारी आणि रुमानिया यांच्यांत विभागणी.

ता. ## सप्टेंबर १९४०

३ अटलांटिक महासागरावरील तळांच्या विनिमयांत अमेरिकेनें इंग्लंडला ५० विनाशिका देऊं केल्या.
६ कारोल राजांचा राज्यत्याग.

१३ इटालियन सैन्यानें इजिप्तवर आक्रमण करून सोल्लुम घेतलें.
१५ ब्रिटनवरील वैमानिक स्वारींत जर्मनीचीं १८५ विमानें एका दिवसांत पडली.
२३ जेनेराल द गोल हे स्वतंत्र फ्रेंच सैन्य आणि ब्रिटिश नौदल बरोबर घेऊन डाकार बंदरावर स्वारी करतात. फ्रेंचांची परतंत्र फ्रेंचांशीं चकमक.
२५ जेनेराल द गोल आणि ब्रिटिश नौदल यांची डाकारहून माघार.
२७ जर्मनी, जपान आणि इटाली यांचा त्रिराष्ट्रसंधि. ब्रिटनवरील स्वारींत जर्मनीचीं १३३ विमानें पडलीं.

ता. ऑक्टोबर १९४०

२३ हिटलेर आणि लाव्हाल यांची भेट.
२८ इटालीची ग्रीसवरील स्वारी.

ता. नोव्हेंबर १९४०

३ ग्रीसमध्यें ब्रिटिश सैन्य उतरलें. ग्रीक सैन्यानें इटालीच्या ताब्यांतील कोरिट्झा नगराला वेढा घातला.
११ तारांतो येथील इटालीच्या नाविक तळावर ब्रिटिश विमानांचा हल्ला. इटालियन नौदलाची प्रचंड हानि.
१४ कोव्हेंट्रीवर जर्मन विमानांचा हल्ला.
१८ कोरिट्झा येथें ग्रीक आणि इटालियन यांची निकराची लढाई.
२० त्रिराष्ट्रसंघांत हंगारीचा समावेश. ग्रीक सैन्याची इटालियनांवर सार्वत्रिक चढाई
२१ ग्रीसनें कोरिट्झा घेतलें.

ता. डिसेंबर १९४०

९ सर आर्चिबाल्ड वेव्हेल यांची मार्शल ग्राझियानींच्या सेनेविरुद्ध चढाई.
११ सीदी बराणीचा पाडाव.
१७ ब्रादि[illegible]च्या लढाईत इटालीचा पराजय.

१९ बार्दियाला ब्रिटिशांचा वेढा.

२९ लंडनवरील प्रचंड विमानहल्ला.

३० बार्दियाचा वेढा पुढें चालूं.

ता. जानेवारी १९४१

५ बार्दियाचा पाडाव.

८ ब्रिटिशांची तोब्रुकवर चढाई.

२० हिटलेर आणि मुस्सोलिनी यांची जर्मनींत भेट.

२२ तोब्रुकचा पाडाव.

२४ अमेरिकेंतील नवे ब्रिटिश राजदूत लॉर्ड हॅलिफाक्स यांचें स्वतः प्रे. रूझव्हेल्ट यांनीं स्वागत केलें.

२९ जनरल मेटाक्सस यांचा डॉक्टरांनीं गळा कापला.

३० देर्नाचा पाडाव.

ता. फेब्रुवारी १९४१

६ बेंगाझीचा पाडाव

ता. मार्च १९४१

२३ युगोस्लाव्हियाच्या राजपालांनीं जर्मनीशीं संधि केला.

२७ युगोस्लाव्हियाच्या सेनापतींनीं राजपालांविरुद्ध बंड करून अल्पवयी पीटर राजांना गादीवर बसविलें.

२८ मातापान येथील अँग्लोइटालियन नौयुद्धांत इटालीची प्रचंड हानि.

ता. एप्रिल १९४१

६ जर्मनीची ग्रीस आणि युगोस्लाव्हिया यांच्यावर स्वारी.

९ सालोनिकाचा पाडाव.

१० ग्रीक सैन्याचा विध्वंस. जर्मनीच्या हातांत ८०००० ग्रीक युद्धबंदी.

११ जर्मनीनें क्रोट वसतीचा प्रांत संपूर्ण जिंकला.

१३ बेलग्राडचा पाडाव.

१९ सराजेव्होचा पाडाव.

२३ अडीच लक्ष ग्रीक सैन्य जर्मनीला शरण गेलें.

२४ थर्मापेलीच्या लढाईंत ब्रिटिशांचा पराजय.

२७ अथेन्समध्यें जर्मनांचा प्रवेश.

ता. मे १९४१

१० हेर हेस यांचें स्कॉटलंडमध्यें आगमन.

१९ क्रीटच्या लढाईचा प्रारंभ.

२४ जॉर्ज राजे क्रीट सोडून जातात.

३१ ब्रिटिशांनीं क्रीट सोडलें.

# सूचि

## व्यक्ति व स्थळें


अमीयाँ ( अमीन्स ) ११४
अलेक्झांड्रिया १९३
अल्बानिया ५७,६५
अल्सास लोरेन १३९
अल्स्टर १८२
अस्वान १९२
ॲटली मेजर १२४
ॲडमिरलहूड ( नौका ) २१७
ॲमस्टरडॅम १०७
ॲलेक्झांडर १२७
ॲंटवर्प १०७, ११३
ॲंग्लोरशियन संधि ६७
आइसलँड १८२
आंडाल्सनेस ९५
आबेव्हिल १०६,१२३
आयर्नसाइड सर एडमंड ११८
आरास ११५
आर्क रॉयल १८१
आर्गोन्न १२३
आर्दान्न १३६
आर्नहेम १०८,१३५
आलबर्ट कालवा १४२
आव्हू ११६
इजिप्त १९१
इराक २१६
इलास्ट्रिअस २०४
इटली ५५,१२४
ईडन १९,६८,१२१,२०७
उंबेर्तो १६५
उस्कुब २०९
एडवर्ड ८ वे १६
एबेन एमाएल १००
एलेत कालवा १६०
एस्टोनिया ६६,८४
एस्न नदी ११२,१६०
ओरान १३०
ओटो–प्रिन्स ३८
आंतोनेस्कू मॉ. १८६
ऑर्स्टेड १११
ऑस्ट्रियाचीं शकलें ३८,४१
ऑस्लो ९२,९४
कानी २१२
कारेलियन ( संयोगभूमि ) ८५
कांडिया २१२
काले १०६,११८,१५६
कोरिझिस मॉ. २११
क्राइस्ट ७७,२१०
क्रॅको ७८
क्रिप्स् सर स्टॅफोर्ड ११९,१२२
क्रिस्टियानसुंड ९१
क्रीट १७२,२११,२१२
क्रीसी सर एडवर्ड ५
क्विसालिंग ९१
कुफ्रा १९३
कूपर मि. डफ १५३
कैरो १९३
कोराप ( जनरल ) १३६,१४५

कोरिट्झा २०२
कोल्मार १०६
क्रो सर आयर ८
कॅपोरेत्तो १६२
कॅरोल–रुमानियाचा राजा १८५
कॉर्फ्यू बेटें १६९
कॉर्सिका ५४
गायदा व्हर्जिनिओ ११८
गाल्लिना जनरल १९७
ग्राइसेनाऊ (मार्शल) ९६,१८०
ग्राफ स्पे १८१
ग्राझियानी मार्शल १९४
गॅलिशिया ७८
ग्लायडर २१३
गॅमेलँ जनरल १०६,१५१
ग्रीस ६५,२००
गुडेरियान ८०
गोएरिंग मार्शल ८५,९३,१८८
ग्लोरियस ९६
गॉर्ट (लॉर्ड) १५५,१५८
घेंत ११७
चार्चिल मि. विन्स्टन ६८,८९,९७,
१०८,११२,११८,११९,१२२,
१२५,२११,२१३
चियानो काउंट १९,५४,११४,१८५
चेंबरलेन सर ऑस्टिन ३८
चेंबरलेन मि. नेव्हिल ५४,६३,६८,
६९,७०७२,७३,९७,१०६
जर्मनी १
जिरो जनरल १०९,११५,१४१
जिब्राल्टर १९१
झीलंड १०९
झेकोस्लोव्हाकि ""चें राजकारण ४५,
४६,६२,६७,८०,१६७
टिरपिट्झ ९६
टोब्रुक १९३
टॉयनबी प्रो. २७,३५
टॉर्न ७८
ट्रान्सिल्व्हानिया १८५
ट्रॉंडहाइम ९४...
टयूनिस ५४,१२९,१६८
डान्झिग ६१,७६
डायशलांड १८१
डिफायंट विमानें १३८
डिल सर जॉन ११८,२०७
डेन्मार्क ८९
डॉंबास ९५
डोव्हर १७४
डॉल्फुस डॉ. ४०
तारांतो २०३
तुखाचेव्हस्की ७०
तूर्ने ११७
तूर्स १२४
तोमास्झेस्की ६१
त्सुदेरोस २११
द गोल १०३,१२३,१२६
दाकार १३१
दालादिए ८८,१०६,१२३
दार्दानेल्स १८९
दार्लां १२९
दिनान्त १०८
देन्ना १९७
दे बोनो जनरल १६५
डुंकेर्क (डंकर्क) ९६,११०,१२०,१३७
नाइल नदी १९१
नान्सी १०६
नामसोस ९४
नामूर किल्ला ११६,१४६

नारेव्ह ८०
नार्व्हिक ९१,९५
निश २०९
नीस व सॅव्हॉय ५४
नेपोलियन १६१
नॉर्वे ८९
पनामा २
पारिस १२५,१५१
पिल्सुड्स्की ६३
पीटर राजे ( बल्गेरिया ) २१०
पेताँ मार्शल १०३,१०४,११३,१२५
१२७
पेरोन ११४
पोप ७३
पोटेमकिन ६५
पोर्टलंड १७४
पोर्ट्स्माउथ १७४
पोलंड ४,६१,६५,६७,७१,७३,७४,
७५,७७
पोसेन ७८
प्राग ५७
प्रिउ जनरल १२०,१५७
प्रिपेट ८०
प्रिन्स पॉल २०६
प्रिन्स ऑफ वेल्स ( नौका ) २१७
प्रिन्स आयगेन ( नौका ) २१७
फारिनाच्ची सिन्योर १६५
फॅसिस्ट १६३
फिनलंड ८४
फिलिपाइन्सचा लढा २
फिलोफ मॉ. २०५
फिशर लुइ ४
फ्रे ग्नोनी सिन्योर १६६
फ्रांको जनरल १९१
फ्रेडरिक दि ग्रेट ३५
बसरा २१६
बाल्कन राष्ट्रे १८३
बाल्टिक समुद्र ६५
बास्फोरस १८९
ब्राइस ३
बिस्मार्क ३५
बिस्मार्क ( नौका ) २१७
बुलिट १२५
बुकबुक १९६
बुखारिन ३६
बुखारेस्ट १८६
बुग नदी ८२
बूलोन्य ११५,११६,११८,१५७
ब्रूजेस १५५
ब्रुसेल्स १०७, ११२
बेक कर्नल ६२
बेंगाझी १९७
बेलग्राड २०८, २१०
बेर्लिन १८७
बेल्जम ७३
बेर्श्टेसगाडेन परिषद ५०
बेसारेबिया १८६
ब्रेमेन ११३
ब्रेस्टलिटोव्हस्क ७८
बोक ७७
बादोल्लिओ जनरल १६५,१६६
बोरिस ( बल्गारियाचा राजा २०५ )
बोर्दो १२५
बोव्हे १२३
ब्लोंबर्ग मार्शल १०३
मज १०८

माजिनो तटबंदी ९८,१००.१२६
मातेओत्ती १६४
मान्नेर हाइम ( मार्शल ) ८५
मान्नेर हाइम ( तटबंदी ) ८६,८७
मायकेल प्रिन्स १८६
मालेमे २१२
मार्न १२४
माल्टा १२४
मास्ट्रिक्ट १०७
मुस्सोलिनी ५३,७४,१२०,१२१,१२६
१६३,१९२,२००
म्यूनिच परिषद ५०,६२,७२,१२६
मेटाक्सस् जनरल २००,२०४
मेमेल ६२
मोएर्डिक १०७
मोडलिन् ८१
मोबज ११७
मोलोटोफ ६९,७०,१८८,२०५
मोस्ले सर ओस्वाल्ड ११६
मॉनॅस्टिर २१०,२११
मॉस्को ८४
मोन्तमेदी १०८
युगोस्लाव्हिया १८३,२०६,२०९
रन्सिमन लॉर्ड ४९
रन्सिमनाशिष्टाई ४८
रशिया ३७,६५,६७,७१
रशीदअली २१६
राइनहार्ट ७८
राइशेनाउ ७७,११३,१४९
रॉडने ९६
रडार १७४
रॉटरडॅम १०७,१३५
रॉयल ओक १८१
रादोम ८०
रावलपिंडी १८१
राष्ट्रसंघ: ६८
रिड्झास्मिग्ली ६३
रिब्बेनट्रॉप १८,८४,१८५,१८८
रुंआँ १२४,१२३
रुंडस्टेड ७७,१३६
रुथेनिया ६२
रुमानिया ६४,६५,६७,८३,१८३
रूझवेल्ट ५१,५५.५७,५८,५९,१११,
११७,११८,१२५,१७७,
१८०.१८२
रेतेल १११, १२३
रेनो पोल मो १०६,१२३,१२५,१५०
रेम्स १२६
रोम्मेल ७७,१२८,१९९
ऱ्हाइन ५६
लंडन १७४
लंडन टाइम्स् २१
लंडनडेरी मार्क्विस १८
लादोगाचें सरोवर ८५
लाटाव्हिया ८४
लाव्हल ५५
लिओपोल्ड किंग (बेल्जम) १०९,११९
लिएज १०७
लिड्डेल हार्ट १०३
लिट्व्हिनॉफ ६५
लियुआनिया ८४
लिबिया १९२
लिस्ट फील्ड मार्शल ७७,२०८,२०९
लिल १०६
लुक्सेंबुर्ग १०८,१४५
लूव्हेन १४६
लेंबेर्ग ७८
लेनिनग्राड ८४
लोड्झ ७८
लोदियन लॉर्ड ११७

वाइट द्वीप १७४
वॅन्सिटार्ट सर रॉबर्ट १
वॉशिंग्टन परिषद ११
वार्सा ६१, ७६, ७८
वालहावेन १३५
विंकेल्मान ११०
विल्सन प्रे. ५९
वुलविच १७५
वेगां ( जनरल ) १०६,११३,१५४
वेमाउथ १७४
वॅव्हेल सर आर्चिबाल्ड १९४,१९८
२०४
व्हान झलिंड २१
व्हिएन्ना २०५
व्हिल्ना ६२
व्हिस्तुला ७९
व्होरोशिलोफ मार्शल ६९,७०
वार्टा ७७
शार्नहॉर्स्ट ९६,१८०
शार्ल जूलियाँ मास्सो १२२
शेरबुर्ग १२५
शेल्ट नदी १५४
शूश्निग ४१
श्लीफेनयोजना १३८, १४०
सम्नरवेलिस १७९
स्श्लेस्विगहोल्स्टाइन ९०
सँ केतँ ११३
साइस इन्क्वार्ट १२०
सालोनिका २०७,२०९
साउथ हँम्प्टन २०४
[illegible]यलेशिया ७८
सा[illegible]रब्रुकेन ९८
[illegible] १९०
[illegible]गेमं ९८
सीगफ्रीड व्यूह ४७,९८
सीदी बराणी १९५
सिवा १९३
सुएझ १२४,१९१
सुडेटेन ६२
सेदां १०८
सेनेगाल १३१
सेराजेव्हो २१०
सोफिया २०९
सोम नदी १२२,१५९
सोमाली लँड १९४
सोल्लुम १९३
सोव्हिएट संघ ३६
स्कागेरॉक सामुद्रधुनि ९२
स्टालिन १६,१७०
स्ट्रासबुर्ग ( युद्धनौका ) १३०
स्टोअेरेन ९५
स्ट्रुमिट्झा २०९
हब्बानिया २१६
हेस १७१,२१७
हल कॉर्डेल १११
हॅलिफॅक्स लॉर्ड ४३,११७
हॅमिल्टन ड्यूक ऑफ २१७
हांबुर्ग ११३
हार्थी अॅडमिरल १८४,२१०
हॉलंड १३४
हॅमर्टन सर जॉन १४१
हिटलेर ४५,५८,६०,७३,१२६,१३९
१४१,१६७,१७०,१८८
२००,२०५
हेग १०७
हेराक्लिआन २१३
होअर बेलिशा ८६
होअर सर सॅम्युअल ११७